

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका





# कै. दीनानाथ दलाल
## यांच्या स्मृतीस
## विनम्र अभिवादन

किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लिमिटेड,
एल्फिन्स्टन रोड, खडकी, पुणे-३.

## हरवलेले हास्य...

त्यांचे हे मोकळे हास्य,
यापुढे आपणासर्वांस
दिसणार नाही, कारण
परमेश्वराचे त्यांच्यावरील
प्रेम जास्त प्रभावी ठरले व
आज आम्ही त्यांना दुरावलो.
असह्य आहे ही ताटातूट!

दलालशेठ! आपल्या
मार्गदर्शनाची व स्नेहाची
आज आम्हांला अतीव
आवश्यकता असतांना
आपण.... असो!

शुभास्ते पंथानः सन्तु

[illegible]



संचालक व सेवक परिवार
**टॉम अॅण्ड बे (अॅडव्हर्टायझिंग) प्रायव्हेट लि,**
पुणे--मुंबई
यांचे वतीनें



# श्रद्धांजली विशेषांक




संस्थापक
कै. दीनानाथ दलाल • मार्च १९७१ • वर्ष २७ वे • मूल्य २ रुपये

## श्रे य ना मा व ली



**हरवलेला मधुचंद्र** — लेखक प्रभाकर पेंढारकर — **चालू कादंबरी**

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

**दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**





संपादक – मुद्रक – प्रकाशक – मालक : **सुमती दी. दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किमत २ रु. + रजि. पोस्ट १ रु. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RN No. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay-4.

# दुःखद--तरीही अपरिहार्य !!

माणसाला हवं असलेलं आयुष्य, हवे असलेले निर्णय, हवी असलेली सुखे त्याच्या वाट्याला यतातच असं नाही. क्वचित नियति विलक्षण चेष्टिते करते आणि काही क्षणात होत्याचे नव्हते होते. 'दीपोत्सवी' अमावास्या झाकळून येते. हास्याला अश्रूंचे हुंदके फुटतात आणि सुखाचा अवघा सागरच नियतीचा अगस्ति पिऊन टाकतो. ते सारं दिसतं, सहन होत नसतं, कल्पनेत वा स्वप्नातही नको असतं आणि तरीही प्रत्यक्षात मात्र नियतीचे ते निर्दय निर्णय माणसांना मानावेच लागतात.

एक निर्णय नियतीने निर्घृणपणे आणि तिच्या इच्छेने आणि लहरीने आमच्यावर लादला.

आज दुसरा निर्णय मात्र आम्ही दुःखद मनान आणि तरीही अपरिहार्य म्हणनच घेतलेला आहे आणि मोठ्या खेदाने तो आज आपणास कळवीत आहोत. मोठ्या दुःखापाठोपाठ घतलेला हा निर्णयही मोठा दुःखदच आहे हे आम्ही मान्य करतो. कारण व्यक्ती गेली तरी तिचे क्रियारूप व कलारूप स्मारक उरते, उरावे, जपावे, त्यावर श्रद्धेची, स्मृतींची, अश्रूंची आणि सेवेची फुले वहावीत असं मागे राहाणाऱ्या साऱ्यांनाच वाटत असतं. 'दीपावली'ची संस्थापना हा मराठी कला-साहित्याचे दृष्टीने एक 'भाग्य-योग' होता आणि त्यावर "मराठीतील पहिले वार्षिक" म्हणून जी 'भाग्यमुद्रा' ठोकली गेली आहे. ती मुद्रा चित्रांकित रंगांकित करणारा व पानापानांवर कलेची किमयागारी करणारा हात दुर्दैवाने गळून पडला आहे. 'साहित्य-कला-संस्कृती'ची ती ध्वजा आम्ही खांद्यावर साभिमान मिरवू म्हणून अनेक हात पुढे आले. कुटुंबाच्या स्नेहभावनेने भारावून ही माणसे पुढे आली त्यात ध्येयवाद, श्रद्धा, स्नेहाला जागण्याची कृतज्ञता होती हेही आम्हास ठाऊक आहे. काही धंद्याच्या हिशोबाने आवाहनेही आली.

परंतु--

दुःखद असला तरीही आम्ही निर्णय घेतला आहे.

प्रस्तुतच्या "श्रद्धांजली विशेषांका"नंतर 'दीपावली' मासिकाचे प्रकाशन स्थगित करण्याचे आम्ही ठरविले आहे. 'दीपावली' हे मराठीतले पहिले वार्षिक म्हणन जन्माला आले. सव्वीस वर्षे ते वार्षिक मराठी साहित्य-कला-रसिकांच्या भेटीला येत आहे. मासिक 'दीपावली'नेही एका तपाची साधना पूर्ण केली आहे. "दीपावली" वार्षिक व मासिकावर मराठी माणसाने अलोट प्रेम केले आणि आमच्यावर झालेल्या आघातानंतर पत्रे, तारांच्या रूपाने ती प्रेम-पुष्पे त्यांनी दीपावली-दलाल यावर वाहिली. या साऱ्यांनाच हा निर्णय कदाचित रुचणार-पटणार नाही. 'दीपावली' ही व्यक्ती नव्हती, संस्था होती असेही ते म्हणतील. त्यांच्यासाठी आम्ही एकच दिलासा देऊ इच्छितो की, 'दीपावली' ही सव्वीस वर्षे श्रद्धा-निष्ठेने जपलेली व रक्ताचे खतपाणी घालून वाढविलेली संस्था आम्ही बंद करणार नसून, फक्त तिच्या कार्यपद्धतीत मूळ रूपाबरहुकूम बदल करणार आहोत. 'दीपावली' हे वार्षिक म्हणून आले. 'वार्षिक' म्हणूनच यापुढे ते रसिकांच्या भेटीला प्रति-दिवाळीत येत राहील. हे 'शिवधनुष्य' आहे याची आम्हास जाण आहे. पण सव्वीस वर्षांची पुण्याई, कलेचा वारसा सांभाळण्याची जिद्द रसिक, हितचिंतकांचा लोभ आणि साहित्य कला-संस्कृतीची ध्वजा खाली न पडू देण्याची वा मलीनही होऊ न देण्याची ईर्षा यामुळे आम्ही ते शिवधनुष्य उचलू शकू असा आम्हास विश्वास वाटतो. एकलव्याची श्रद्धा आणि भगीरथाची प्रयत्नशीलता हेच आमचे या मार्गावरचे पाथेय आहे असे आम्ही मानतो. सव्वीस वर्षे ज्या स्नेहशीलतेने मराठी माणसाने "दीपावली" वार्षिक-मासिकाला लोभ दिला तोच लोभ त्यानी यापुढेही या 'दीपावली'च्या नव्या प्रयोग-प्रयत्नशीलतेलाही द्यावा अशी विनंती. 'दीपावली'ने खूपच पाहिले-सोसले. पण 'दीपावली' कधी लाचार झाली नाही. तिने तिची 'प्रकृती' कधी गमावली नाही. दिव्यातल्या तेलात कधी मिश्रण होऊ दिले नाही-तीच तिची प्रकृती निकोप, निरोगी व निर्मळ रहावी म्हणूनच हा वार्षिक भेटीचा अपरिहार्य निर्णय घेतला आहे. ज्या लेखकांनी, जाहिरातदारांनी, व्यंगचित्रकारांनी, एजंटांनी, वर्गणीदारांनी, हितचिंतकांनी, मित्र-सुहृदांनी 'दीपावली'ला आजवर स्नेहाचे तेल दिले त्यांनी ते याहीपुढे द्यावे अशी विनंती-नियतीचा निर्णयही अचानक पण अपरिहार्य-हा निर्णयही दुःखद पण अपरिहार्यच !

अचानकपणे येणाऱ्या आघातांनी सारेच काही उन्मळून पडते. 'दीपावली'च्या निर्णयानेही तसेच घडेल. पण लेखक, वर्गणीदार, जाहिरातदार, एजंट, मित्रसुहृद, हितचिंतक व 'दीपावली' कुटुंबियांनी आम्हास क्षमा करावी. मराठी रसिकते, मानुनि घे अमुचा हा मुजरा !!

संपादक





**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता
३५७७६५ DALALART


● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५; द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी ३० परदेशी वार्षिक वर्गणी रु. २०.

● **वर्गणी मनिऑर्डरने द्यावी.** चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवायचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातीचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल. साहित्य गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाही.


संस्थापक : कै. **दीनानाथ दलाल**
संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : **सुमती दी. दलाल** यांनी अशोक प्रिंटींग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.

# दीनानाथ दलाल – माझे मित्र



वीसेक वर्षं 'दीपावली'साठी मी नियमित कथालेखन करीत आहे. गेली साठ वर्षं दलाल व मी नियमित भेटत असू. हल्ली काही महिने आम्ही अधिक जवळ आलो होतो. एवढ्या दीर्घ व वाढत्या स्नेहासंबंधी सलगपणे काही लिहिणं आज अवघड आहे. विशेषतः परीपूर्तीचा आनंद अनुभवल्यावर व त्यानंतर लगेच दैवाचा प्रहराच सोसल्यावर——

श्री. दलालांच्या संपादकीय कारकीर्दीच्या पूर्वार्धीतत्यांचा माझा फक्त औपचारिक परिचय होता. त्यांना माझं लेखन आवडत असे; मला त्यांच्या वार्षिकाबद्दल आदर वाटे. पण माझ्या पुस्तकाची वेष्टणं रंगविण्याइतकाच आमचा संबंध राहिला.१९५४ साली आमचे उभयतांचे स्नेही श्री. ग. रा. कामत 'दीपावली'च्या संपादनात भाग घेऊ लागले. 'मौजेत' कामतांनी मला हेरून ठेवलं होतं. त्यांनी मला मौजेच्या मानकऱ्यातून दलालांच्या दरबारांत आणलं. कामत लवकरच सिनेमाच्या स्टडिओकडे वळले. मी दलालांच्या स्टुडिओतच शेवटपर्यंत रमलो. गुंतून, गुंगन गेलो.

लवकरच मी परदेशी जायला निघालो–जवळजवळ जोगवा मागून. दलालांनी मला विचारलं, "मी पैसे देऊ?"

"मला तुमच्या चित्रांच्या प्रती द्या–" मी म्हटलं. दलालांनी दिवाळी अंकांतील वेगवेगळ्या चित्रांच्या पन्नास साठ प्रती मला बांधून दिल्या. परक्या भूमीवर मैत्री जोडायला ती चित्रं व त्यांचे आल्बम्स मला फार उपयोगी पडले. आज अमेरिकेत पंचवीस एक घरातील दिवाणखान्यातून दलालांची चित्र फरेम करून दिमाखाने लावलेली आहेत.

माझ्याजवळ पंधरा सोळा कथासंग्रहांची मखपृष्ठं दलालांनी रंगवली आहेत. बिन्हाड थाटलं तेव्हां ती मूळ चित्रं फरेम करून मी घरभर लावून टाकली. दलाल घरी आले व तो देखावा पहात राहिले! मग त्या थोर चित्रकाराने माझ्या घरावर पाटी नव्हती म्हणून माझं नांव जाड कागदावर रेखाटून दारावर लावून दिलं.

दर वर्षी दीपावलीचा दिवाळी अंक तयार होई तेव्हां मी बहुधा मुंबईला यायचा. पहिल्या पहिल्या ओल्या ताज्या प्रती हाताळीत आम्ही बोलत बसत असू. मग लंच घेण्यासाठी आम्ही दोघच जात असू. परिसिअन, वे साईड इन्, नाहीतर ताजमहाल सुद्धा.

रौप्य महोत्सवी वर्षास प्रारंभ करणारा दीपावलीचा १९६९ चा दिवाळी अंक तयार झाला तेव्हां त्यांचा निरोप आला. मी स्टडिओत जाताना पंचवीस रुपयांचे पेढे घेतले व त्यांच्या पुढ्यात ठेवले. दलालांचे डोळे भरून आले. त्यांनी मूठभर पेढे माझ्यां हाती ठेवले. कार्यालयातील सहकार्यांना वाटले, घरी नेण्यासाठी ठेवले. मी म्हटलं, "तुम्ही घ्या ना–एक तरी खा–"

"मला आता जायचा नाही. माझी भूक भागलीय–" ते भारावून म्हणाले व माझ्यासाठी पेढ्याचा तुकडा तोंडात टाकू लागले.

मी मुंबईस स्थलांतर केलं आणि माझ्या दलालांच्या भेटी वारंवार घडू लागल्या. त्यांचा स्टुडिओ हे माझं एक विसाव्याचं स्थान होऊन बसलं. एव्हाना 'दीपावली' दर महा प्रकाशित होऊं लागलं होतं. मी मासिकात फारसं लिहीत नव्हतो. पण माझं सर्वोत्कृष्ट लेखन दीपावलीलाच देत होतो. मी साहित्य देईन ते चांगलंच देईन, अन् वेळेवर देईन याची त्यांना खात्री होती. माझ्या कथालेखनाबद्दल त्यांना कौतुक होतं; काळजी होती. मी काही सांगू लागलो की ते कुतूहलानं ऐकत; मी लेखनाबद्दल अनास्था दाखवली की ते काकुळतीला येत. कितीदा तरी आम्ही एखाद्या कल्पनेवर, प्रसंगावर, पुस्तकावर गप्पा मारीत असू. नव्या लेखकाबद्दल बोलत असू. नव्या योजना आखत असू.

**–अरविंद गोखले**

आमच्या दोस्ताच्या काय काय म्हणून आठवणी उगाळाव्यात! वेस्ट इंडिजची क्रिकेट मॅच झाली व चार दिवस आम्ही धमाल केली स्टेडियमवर. कधी कॉंटिनेंटल प्रकाशनचे कुलकर्णी असायचे तर कधी भिकू पै आंग्ले जेवणाचा गरम डबा घेऊन यायचे–अनेकदा आमच्या मैफली झडायच्या. कधी साथीला अच्युत बर्वे किंवा गोपालकृष्ण भोबे, अगर रामकृष्ण नाईक––फिलमस् डिव्हजनमध्ये चित्रपट पहायला–समुद्रावर नुसतं भटकायला––डेक्कन-क्वीनमध्ये–काय काय तरी सांगावं! कामाचा वाढता व्याप आणि विविध प्रकारच्या मित्रांचा वेढा–यातूनही ते माझ्यासाठी वेळ काढीत याबद्दल मला कृतज्ञता वाटे.

त्यातूनच 'दीपावली'च्या रौप्य महोत्सवानिमित्त संमेलन भरवावं अशी कल्पना स्फुरली. दीपावलीच्या सर्व दोस्तांचा एकमुखी होकार आला. दलाल संमेलनास तयार होते, पण सत्कार करून घेण्यास नाराज होते. 'सत्कार म्हणजे काही नाही हो ! आम्ही नुसता हार घालणार तुम्हाला!' मी त्यांची समजूत घातली: पण ते बिलकूल बधेनात. मीच तुम्हा सगळ्यांचा सत्कार करायला हवा खरा. तुम्ही सगळ्यांनी आजवर मला साथ केलीत––दीपावलीशी



अनुक्रमणिका

# एका मैत्रीला कायमचा विराम

**—जयवंत दळवी**

आपल्या निकटवर्ती मित्राच्या आकस्मिक निधनानंतर त्याच्यावर तावडतोब लिहायला बसणे हे मला अवघड आणि कृत्रिम वाटते. आपण स्वतः मनातल्या मनात दुःख सहन करणे हा खरा उत्तम उपाय. पण, तुम्ही त्यांचे मित्र, तुम्ही लिहाच असा आग्रह होतो. मग सुटचा सुटचा आठवणी घोळवाव्या लागतात. पण निधनाचे दुःख इतके जवळ असते की त्या आठवणींचा अर्थ लावणे कठीण असते.

'दीपावली'चे रौप्यमहोत्सवी वर्ष सुरू झाल्यानंतरची ही गोष्ट. एकदा मी आणि दलाल पुण्याहून दुपारच्या गाडीने मुंबईस येत होतो. नेहमीप्रमाणे अनेक विषयांवर हसत खेळत गप्पा चालू होत्या. बोलता बोलता मध्येच कसला तरी विषय निघाला आणि त्याच्या अनुषंगाने मी केवळ कुतूहल म्हणून दलालांना त्यांच्या बालपणासंबंधी विचारले. स्वतः संबंधी एक चकार शब्द बोलायचा नाही हा दलालांचा खाक्या मला माहीत होता. म्हणून गप्पांच्या ओघांत मी मुद्दाम तो प्रश्न विचारला होता. दलाल फक्त थोडेसे शुष्क हसले आणि त्यांनी आगगाडीच्या खिडकीतून बाहेर पाहिले. त्यांच्या सुदैवाने गाडी खंडाळा स्टेशनात थांबत होती. ते पटकन खाली उतरले. थोड्या वेळाने दोन मोठाली बटाटा-मटण पॅटिस घेऊन आले. प्रकृतीच्या स्वास्थ्यासाठी त्यांनी आहारावर निर्बंध घालून घेतले होते. त्यामुळे त्यांना बटाटा, तेल या गोष्टी वर्ज्य होत्या. त्यांनी ती दोन्ही पॅटिसे मलाच खायला लावली. "तुम्ही मांसाहार फार एंजॉय करता, ते बघून बरं वाटतं. मी फक्त बघतो..." वगैरे बोलून त्यांनी माझ्या खाण्याची इतकी स्तुती सुरू केली की, मी त्या मूळ प्रश्नावर त्यांना आणखी काही विचारू नये हे माझ्या लक्षात आले. मग आम्ही 'दीपवाली'वर खूप बोललो. त्याच आधी काही दिवस दलालांना 'दीपावली' मासिक बंद करायचे आहे असे मी कुणाकडून तरी ऐकले होते, म्हणून मी सहज विचारले. दलाल म्हणाले, "तसा विचार आहे खरा !"

"का?"

"सगळं साहित्य वाचून काढण्यात, छापून घेण्यात वगैरे इतका माझा वेळ जातो की मला तो वेळ मोकळा मिळाला तर घरच्या घरी मी पेंटिंगमध्ये रमलो असतो–"

"खरं आहे ! मासिक बंद करा'!"

"बघू!"

"त्यांत बघायचं काय?"

"त्याचं असं आहे, मासिक बंद झालं की, तुम्ही आणि तुमच्यासारखे दुसरे लेखक माझ्या स्टुडिओत कशाला याल? मग संबंध दुरावतील...!"

"छे! सगळे येतील."

त्यांनी नकारी मान हालवली आणि म्हटले, "बघू ! रौप्य-महोत्सवी वर्षाचा शेवटचा अंक काढीन आणि बंदही करीन!"

"शेवटच्या अंकात संपादकीय काय लिहाल?"

"काही सुद्धा लिहिणार नाही. पुढल्या महिन्यापासून दीपावली निघणार नाही एवढी चौकट मध्येच कुठे तरी छापीन. म्हणजे मन लावून वाचणारालाच कळेल. पण खप वाढत नाही...महागाई वाढली आहे, चांगले साहित्य मिळत नाही....असली रडगाणी मी गाणार नाही. मला रडणे आणि तोंड वेंगाडणे आवडत नाही!"

तरीही रौप्यमहोत्सवी वर्ष संपल्यानंतरही 'दीपावली' मासिकाचे अंक दरमहा निघत राहिले. स्टुडिओत मित्रमंडळी यावी म्हणून !

त्या स्टुडिओत आता आमचे पाय कधीच पडणार नाहीत! दिव्याच्या पाठीमागून येणाऱ्या प्रकाशातले दलाल दिसणार नाहीत! एका मैत्रीला कायमचा विराम ! ● ● ●

---

जवळचा संबंध आला त्या सगळ्यांना मलाच एकत्र बोलवायचं आहे एकदा–' ते म्हणाले.

दीपावलीच्या रौप्यमहोत्सवानिमित्त करावयाच्या संमेलनाची रूपरेषा मग दलालांनी माझ्या व अच्युत बर्वे यांच्या साहाय्याने आखली. त्यासाठी एका सकाळी आम्ही जुहूला बैठक घेतली. मी तीनतीनदा त्यांच्याकडे जाऊ लागलो. 'सगळं चांगलं झालं पाहिजे. खानदानी—' ते म्हणाले.

"नऊ जानेवारीला नको. नाताळच्या सुटचा संपवून सगळे नुकतेच परतले असतील. आपण सोळा तारीख ठरवूं–' मी सुचवलं.

"छे–छे, सोळा म्हणजे फार उशीर होईल–!' दलाल बोलून गेले.

समारंभाची सारी सिद्धता खरं म्हणजे दलालांनीच केली. ते समाधानात होते. मला त्या दिवशी उगाचच वाटत होतं की ते फार गंभीर आहेत. काय कमी आहे, मला कळेना! मग माझ्या लक्षात आलं व मी घाईने प्रभाकर अत्र्यांना म्हटलं, "तुमच्या समारोपाच्या भाषणात मोघ्यांचा व भाऊसाहेब जोगळेकरांचा उल्लेख करा–"

दलालांना हवे होते ते सारे सुद्धां जमले होते. न येऊ शकले-त्यांनी पत्रं पाठविली होती. पण दलालांना सर्वांत प्रिय असलेले भाऊसाहेब नि मोघे मात्र तो सोहोळा पहायला नव्हते !

समारंभ सोडून लोकल गाडीने मी व पु. भा. भावे परत जात होतो. भाव्यांनी पुनश्च मृत्युचा विषय काढला होता. मला भाऊसाहेबांची व मोघ्यांची आठवण होत होती; दलालांना सोडून आल्याची चुटपुट लागून राहिली होती. ● ● ●

---

**स्नेह सरे**



**–परि दीप घाळे**





अनुक्रमणिका

तव पदी वाहतो भाव सुमांची माला
तव स्मृती भाग्यदा सदा ठरो आम्हाला

आमचे स्नेहसर्वस्व रूप असलेले
कै. दीनानाथ दलाल यांच्या
पवित्र स्मृतीस अभिवादन

दलाल-दीपावलीचाच एक सुहृद्





अनुक्रमणिका



# आपडलंसे वाटणारे हरवून गेले

**—प्रभाकर पेंढारकर**

"दीनानाथ दलाल गेले, माहित नाही तुम्हाला ?"

"काय ?"

"दलाल गेले. मराठामध्ये छापून आलंय!"

क्षणभर साऱ्याचीच विस्मृति! एक विलक्षण सुन्नपणा...

डोळे आणि कान दोन्हीवरही विश्वास बसू नये अशी स्थिती!

३.... ५...... ७..... ७ .... ६ .. ५..

"हॅलो, मी दलाल बोलतोय"

उंच आवाजात तत्परतेने पलिकडून येणार उत्तर.

"नवीन काही....कादंबरी का? कधी आणता ?

उद्या संध्याकाळी...अवश्य... वाट पहातो."

छोटी छोटी वाक्यं. अगत्याची स्नेहाची!

३....५.....७...७ .... ६ ..... ५

बेल वाजते आहे.

कोणी फोन उचलत नाही....

पलिकडून त्या उंच आवाजातलं तत्पर उत्तर येत नाही.

दलाल आज खर्चीवर नाहीत.

फाईल्स...फिल्मस...

सफेद कोऱ्या पडद्यावर चित्र विचित्र रंग उधळताहेत.

त्यातून वेगवेगळ्या आकृत्या आकार घेत आहेत. स्त्रीच्या शृंगार नायिकांच्या..रागरागिणींच्या

फिल्म मध्येच तुटली.

पडदा परत सफेद झाला. सारेच रंग उडाले.

मी थिएटरमधून उठलो...

बाहेर चालू लागलो.

इथं ओळखीचं कोणीच कसं नाही? माझ्या ओळखी तशा कमीच. पण तरीही कोणी तरी इथं भेटायला हवं होतं.

मला पोहोचायला उशीर झाला आहे का? कोणीच कसं नाही इथं? धगधगते निखारे.

लाकडांचा धूर...एक विचित्र वास. मलूल रंगहीन वातावरण!

छेः दलाल इथं असणार नाहीत.

रंगहीन कोणत्याही जागी ते असणार नाहीत.

ते असतील तेथे रंग असतील. सौंदर्य असेल...शृंगार असेल... काव्य असेल.

इथं नसणारच ते ?

बाहेर दादरची चौपाटी. दुपारची वेळ. निर्जन चौपाटी. एकटी एकटी वाटणारी.

तेथेच बसलो.

वाळूवर निळ्या लाटा फुटत होत्या. रुपेरी फेस चमकत होता.

माड डुलत होते. वाऱ्यावरोबर साद घालत होते.

दूरवर शीडांची गलबतं...

निळ्या आकाशात पांढरे शुभ्र मेघखंड.

सागराचं प्रतिबिंब आकाशात पडलं होतं !

हरवलेले दलाल इथंच असावेत.

पोर्तुगीज चर्चच्या पलिकडं...

डाव्या हाताच्या गल्लीत...सहकार-निवास. तिसरा मजला.

दारावर पाटी आहे. 'दीनानाथ दलाल'

ही पहिल्यांदाच पहातो आहे.

काळी फियाट पोर्तुगीज चर्चजवळ थांबते.

"तुम्ही माहिमला रहाता ना?"

"हो, पण मी इथंच उतरतो."

"चला घरी, कॉफी घेऊ."

"आताच तर तुमच्याबरोबर घेतली."

"ती ऑफिसात. आज घरी घेऊ, चलता ?"

"नको. परत कधी तरी." ते आज परत कधी तरी-! बेल दाबायला हात पुढे जातो. थांबतो. मी तसाच जिन्याच्या पायऱ्या उतरतो. कुणालाच न भेटता !

गोतावळा मोठा आहे. पंचवीस, 'दीपावलीचे' स्नेहसंबंध आहेत. घरचं कार्य असावं अशा आपुलकीनं मंडळी जमली आहेत. जेवणाचा थाट आहे. कुठं कसलीही गोष्ट कमी पडू नये म्हणून जातीनं देखरेख आहे. अगत्यानं आग्रह आहे. विचारपूस आहे. आजवरच्या सहकाऱ्यांचं कौतुक आहे. ह्या लेखकात प्रथितयश सिद्ध हस्त लेखक आहेत, तसेच 'दीपावली'तून ज्यांनी लेखनाची पहिली पावलं टाकली अशी मंडळीही आहेत. मी त्यातलाच !

एक जादूचं अद्भुत दालन त्यांनीच मला खुलं करून दिलं. कादंबरीचं यश हा एक योगायोग. तिच्या पारितोषकाबरोबर लाभलेलं दलालांचं अगत्य लाखमोलाचं ! दीपावलीच्या कुटुंबियांपैकी मी एक झालो ! हे सर्व सांगायचं होतं. व्यासपीठावरुन ! नेरुरकरांनी दिलेल्या दीडदोन मिनिटांमध्ये. काही सांगितलं... बरंचसं राहून गेलं. मिस्कील स्वभावाच्या दलालांनी साऱ्यांनाच चकवलं. बाहेर पाटी लावली, 'दीपावली रजत महोत्सव रजनी'. पण कुणालाच पत्ता नव्हता. तो निरोप समारंभ होता.

प्रिय श्री. प्रभाकर पेंढारकर,

'दीपावली रजत महोत्सव रजनी' समारंभात आपण ज्या अत्यंत आपलेपणाच्या







# दलाल - एक रसिक मित्र

**प्रा. मं. वि. राजाध्यक्ष**

दीनानाथ दलालांनी खूप माणसे जोडली हे ते गेल्यानंतर अनेकांनी सांगितले. दलालानी जोडलेल्या लहान-मोठ्या माणसांत माझा अंतर्भाव होई याचा अभिमान वाटे. ते गेल्याचे कानी आल्या क्षणापासून त्यातून एक खंत टोचत असते. ती खंत अशी की पंधरा वर्षे त्यांच्याकडून लाभलेल्या जिव्हाळ्याची आपण पुरेशी फेड केली नाही. त्यांच्या फार जवळ जाण्याचे राहूनच गेले. संपादक म्हणून त्यांनी माझ्या लेखणीवर विश्वास टाकावा, आणि तिने विश्वासघात करावा असेही अनेकदा घडले– विशेषतः अलिकडच्या वर्षात. त्यांनी हे मानले नाही, असा त्यांचा जिव्हाळा सच्चा होता.

खरे म्हणजे दलालांशी स्नेह जडावा– आणि तोही एका आकस्मिक बैठकीत, याचे मला थोडे आश्चर्य वाटत आले. ती बैठक चांगली चार तासांची झाली. दादर ते पुणे या आगगाडीतील प्रवासात जमली. आश्चर्याचा भाग असाः पुस्तकांची मुखपृष्ठे सजविण्यात दलालांनी विलक्षण यश मिळविले; त्याच्या होषात काही प्रकाशकांनी दलालांच्या मुख-पृष्ठांवर आपली पुस्तके खपतात. लेखकाच्या मोबदल्यापेक्षा अधिक रक्कम आपण मुखपृष्ठावर खर्च करतो अशी बढाई मारीत पुस्तकांच्या किंमती चढवल्या. पुस्तकांची जाहिरात ही मुख्यतः मुखपृष्ठाची जाहिरात होऊ लागली. गुळगुळीत आर्ट पेपर, चार (की पाच) रंगी मोहक चित्र ...इत्यादि. चित्र अर्थात दलालांचे. पंचवीस-तीस वर्षांपूर्वीच्या दलालांच्या पहिल्या झळाळीचा तो काळ. त्यांची चित्रे डोळ्यात भरत–कागदाच्या गुळगुळीत-पणाशी त्याचा संबंध नसे. त्यांची व्यंग-चित्रे आवडत. पण त्यांच्या 'मोहक' मुखपृष्ठाने पुस्तक खावे या प्रकाशकी खाक्याने बिथरून जाऊन मी 'अभिरुची' मासिकातून त्यावर शस्त्र धरले. प्रकाशक संतापल्याचे समजले. ते अनोळखी; दलालही अनोळखी. त्यांचाही राग गृहित धरला. त्यातच 'मुखपृष्ठांची दलाली' असा काहीसा शाब्दिक विनोदही हातून घडला होता! ते औद्धत्यच. साहित्यातील महा-रथींचे तेव्हां दलालांभोवती कडे असे आणि माझ्यासारख्या एका वीतभर (साहि-त्यिक) मापाच्या नव्या लेखकाने असला वार करावा हे त्यांना लागले असणारच! म्हणून त्यानंतर काही वर्षांनी त्यांची भेट झाली तेव्हां, आणि पुढेही, किंचित धाक-धूक वाटे, आणि थोडेसे हसूही येई, की दलालांनी हा विषय काढला तर? त्यांनी कधी काढला नाही; कदाचित त्यांच्या तो स्मरणातही राहिला नसावा. मला कधी वाटे की आपणच दलालांना ती आठवण द्यावी, आणि त्या विशिष्ट विनोदाचा रोख त्यांच्या विरुद्ध नव्हता हे सांगावे, पण ते करण्याचे राहून गेले– आणखी कित्येक गोष्टी राहून गेल्या त्याप्रमाणे.

दलालांच्या हसण्याची आठवण आता अचानकपणे कधी कानात घुमते. त्यांच्या आवाजाप्रमाणे तेही वेगळे, थोडे चमत्कारिक होते. ते खळकन् थांबे– आकस्मिकपणे कशावर तरी अट्टाहासाने झाकण घातल्यासारखे वाटे. सदा हसरे, सदा आनंदी अशा जातीचे दलाल नसावेत. कित्येकदा, प्रसन्न वाटत, खुलतखुलवीत– पण मध्येच एखादा ढग येऊन जाई. कामाच्या अवधानाने असेल, कोठे काही खुपत असेल, की आणखी काही, कोण जाणे ? एवढे लौकीक यश मिळविलेला कलावंत! त्या यशाचा पिंजरा बनेल म्हणून धास्तावे. की त्या यशाचे रूपच मनातून उतरले म्हणून अस्वस्थ होई? कोण जाणे! याविषयी कधी त्यांना विचारावे असे वाटे–पण धीर झाला नाही. स्वतः विषयी बोलायचा त्यांचा रिवाज नव्हता आणि तसे बोलायला लावण्याइतका मी जवळ गेलो नव्हतो.

या क्षणी त्या थोर संपादक–चित्रकाराच्या चौरस रसिकतेच्या, त्याच्या औदार्याच्या, त्याच्या आपुलकीच्या आठवणी दाटीने येत आहेत; आणि मध्येच उठून दिसत आहे ती त्यांच्या रसिकतेच्या एका वेगळ्या, कोणाला विसंगत वाटेल अशा अंगाची– त्यांच्या क्रिकेट–वेडाची. एरव्ही स्टुडिओत जिवलग मित्रांशीही बोलताना हातातील कुंचला सहसा बाजूला न ठेवणारा तो माणूस क्रिकेटचा मोठा सामना आला की शाळकरी मुलांसारखा हुरळून जाई, तिकिटे मिळविण्यासाठी धावपळ करी –तीही आपल्या मित्रमंडळी समवेत बसून पहाण्याकरितां-आणि त्या दिवसांत केवढ्या उत्साहाने खेळाविषयी बोलत राही! तो उत्साह खरा होता; दलालांची सगळी रसिकता खरी होती. त्यांच्या लोभासारखी आणि औदार्यासारखी. त्या सगळ्यात दिखाऊपणाचा स्पर्शहि नसे असा खरा माणस होता. ● ● ●

---

भावना व्यक्त केल्यात त्यावद्दल आपले मनःपूर्वक आभार.

'दीपावली'चे आणि आपले स्नेहसंबंध कायम राहावेत ही सदिच्छा.

आपला

**दीनानाथ दलाल.**

ह्यातली 'प्रिय' आणि 'दीनानाथ दलाल' एवढी अक्षरं हिरव्या शाईतील! स्वतःच्या हस्ताक्षरातील !

हा उलटा न्याय ! तुम्हीच तर आपले-पणानं बोलावलंत, एवढं कौतुक केलंत. हे सांगायला भेटायला गेलंच पाहिजे.

काळ्या शेडचा दिव्याचा स्टँड अद्याप टेबलावर झुकलेला आहे. ब्रश रंगातून काढून नुकतेच पाण्यात बुडवले आहेत. रंगपेटीतील रंग अद्याप ओलेच आहेत. हँगरला नेहमीचा साधा बुशशर्ट टांगलेला आहे. स्टॅण्डवर घडी केलेली विजारही आहे. खोलीत कोणी नाही. दलाल पलिकडच्या खोलीत असावेत. येतील ... आता येतील. खुर्चीवर बसलो. फेब्रुवारीच्या अंकात नवी कादंबरी येत आहे. त्यातली रेखाचित्रं टेबलावर दिसतात.

"कशी वाटतात?"

"छान!"

"मी वाचली बरं का ? दार्जिलिंगचे काही फोटो आहेत का?"

"आहेत!"

"घेऊन या. कांचनगंगा पार्श्वभूमीला असू देत. नवीन काही तरी करू!"

"आहेत, तसेच आहेत."

"कॉफी ? अरे दोन कॉफी सांग!"

तो मधा पाण्यातून काढलेला ब्रश रंग मिसळू लागला आहे. पेपरवर शृंगार नायिका आकार घेत आहे. मी तन्मयतेने पहात बसलो आहे. इतक्यात दार उघडून प्रभाकर अत्रे आत येतात.

"आपले दीपावलीबरोबरचे संबंध तसेच ठेवायचे. दलालांच्या वरचा लेख हवाय. दलाल स्मृति–विशेषांकासाठी!" आणि फिरून सांपडलंसं वाटणारं सारं हरवून जातं. ● ● ●











# दलालांच्या स्मृतीस....

### सदानंद रेगे



गोष्ट तुम्हांला आवडेल की नाही ?
गोष्ट तुम्हांला आवडेल की नाही ?
तशीच टेबलावर टाकून पळालो
सांगून खोटं काही नाही...
नंतर तुमच्या डोळ्यात दामू पाहिला
तुमच्या पाणवल्या पापण्यात
रंग भिजवताना
त्या दिवशी तुम्ही पाठीवर न दिलेल्या
शाबासकीच्या स्पर्शाचं फूलपाखरू
अजून चंद्र कोरतं आहे
सावल्यांभंवती...

दोन्ही पाय घट्ट मातीत रोवून
कवच उभारून
लाडक्या स्वप्नाभंवती
तुम्ही उभे होता इथल्या चिखलात
तेव्हां तुमच्या पंखांना
न कळत आधार होता
अनन्ताच्या आकाराचा
मृगजळात प्रत्यक्ष डुंबायचा
तुमचा ध्यास
कळू न देता या कानाचा त्या कानाला
कडेकोट बंदोबस्तात
कण्हत कणाकणांत
तुम्ही वाट पहात होता
पंखांवर आकाश झेलण्याची....
आता तर तुम्हीच
आकाशमय झाला आहात !

त्या हसऱ्या, आनंदी गर्दीत
तुम्ही मधोमध पालखीत
मागे समुद्र चवऱ्या ढाळीत--
ढगांच्या हाती पालखीचा गोंडेदार दांडा
आकाश
क्षणाक्षणाला वेगवेगळं प्रकाशणारं
पण तुमची नजर मात्र
अनिमीष लागलेली क्षितिजाकडे
कधीच न मावळणाऱ्या

रात्रीची जत्रा नेत्रात भरून घेत...
चालता चालता वाळूत भसकन् पाय गेला
नि छातीत उगाचच धस्स झालं...

त्या दिवशी अबोलपणी
तुम्ही काय बोललात
ते वाऱ्यानं मला सांगितलंय्
तुम्ही म्हणालात

असा रंग
असा रंग
अशी आग
असा प्रकाश
असं झक्क भकास
असं भक्क झकास...
एकदाच... केवळ एकदाच
अकस्मात् जमून येते आरास
केवळ एकदाच...

त्या अंधाऱ्या खोलीतला अंधार
अजून तस्साच आहे होता तसा...
तुमचे ब्रश.. पेन्सिली.. कागदही जैसे थे...
कुणी धजतच नाही
त्यांना हात लावायला...
रंगरेषा अवकाशात दबा धरून बसलेल्या
फट् म्हणता
उगीच बंड करून उठायच्या...
पण दलालशेट...
व्याध्याच्या चांदणीला
रंग बदलायला लागतो
तेवढाच वेळ या
नि या तुमच्या... तुमच्या खुर्चीत
एकदा टाळी देऊन जा...

कधी कधी असं होतं म्हणतात
(तसं ते नेहमीच होत असतं
फक्त कधी कधी ते आपल्याबाबतीत
होत असतं. )
सारं भंवताल मरणाच्या तालावर
नाचू लागतं
नुसता हात वर केला तर
पुंजकाभर चांदण्या गळून पडतात.
नुसती जांभई दिली तर
पासरीभर आकाशाचा चुरा गळतो
पुसटशी जरी कल्पना असती

आम्हा जन्माच्या कर्मदरिद्र्यांना
तरी श्वास रोखून धरले असते सारे
जेव्हां असण्यानसण्याच्या उंबऱ्यापलीकडून
पुढे पुढे सरकत होते
चोरपावलांनी ते थंडगार वारे...

आता आपला उगीचच
अर्थ लावायचा मनाला येईल तो
नि चुटपुटत बसायचं...
त्या दिवशी मंगल मखरातून
अशी काय आकाशवाणी होत होती.. ?
खरं तर त्या गालबोटानं
गालाची खळी अधिक हसरी व्हायला
हवी होती...
पण आपण सारेच खोटे असतो
खरं बोलतांनाहि खोटेच असतो
जन्मापासून जन्मांतापर्यंत
आपण अभद्राचा राक्षस
खांद्यावरून मिरवीत असतो
नि परस्परांना तकलुपी धीर असतो
आपण सारेच
मरणापासून पळणारे
ढुंगणाला पाय लावून.. गालबोटं फाशीत...
दोनेकशे तरी फोटो
सहज निघाले असतील त्या रात्री..
प्रत्येकाला तुमच्या स्वाक्षरीसहीत
ते पाठवायचे होते तुम्हांला...
पण तुम्हांला ठाऊक आहे ?
त्यातला एक फोटो निघालाच नाही...
अजिबात नाही...
कुणाचा हा फोटो ?
कुणाला पाठवायचा ?
कुणाच्या स्वाक्षरीनं ?

चार लोकांना प्रेमभरानं बोलवावं
दोन गोड घास त्यांना जऊ घालावेत
प्रहरभर त्यांच्याशी शिळोप्याच्या
गप्पा कराव्यात
स्वप्नांचं दारूकाम करावं
नि दाराशी आलेल्या रात्रीची
शाल पांघरून
निवांत झोपी जावं
कधीच न संपणारे
रंग पहाण्यासाठी...

तुमच्या पिशवीतला मासा म्हणाला :
आज मी धन्य झालो
या माणसानं माझं सारं.. सारं
रंगरूप
आपल्या डोळ्यात
साठवून ठेवलंय्...
आता मला मरण नाही !

* * *






# इतके जवळ..... खूप दूर

आनंद साधले

दलाल स्वतःबद्दल अबोल. मी त्याच बाबतीत खूप बोलणारा. दलाल साऱ्यांना दूर राखणारे. मी एकदम झेप घेऊन जवळ जाणारा. विजोड विजा ओढल्या जाव्या तसे आम्ही जवळ आलो. दलालांनी जवळिक जुळविली तेवढे जवळ आलो. जितक्या हळुवार वृत्तीने ते चित्रात प्राण ओतीत तितक्याच हळुवार वृत्तीने त्यांनी ही जवळिक आकारली. या माणसाचे सारे जगणे हीच जणू कला होती. कुणावर रागावणे तर तीही कला. कुणाला तोडून टाकणे तर तीही कला. कुणाला जवळ घेणे तर तीही कला.

माझे दलालांवरील प्रेम हे प्रथम-दर्शनी प्रेमाहूनही अधिक उत्स्फूर्त होते. पहिली भेट झाली त्या आधीच मी त्यांच्यांत गुंतलेला होतो. पण हे गुंतणे एकपक्षी, पन्नास टक्के, होते. ते शंभर टक्के व्हावे अशी ओढ होती. खूप बोलावेसे वाटे. पण संधी मिळत नसे. दरबारात कोणी ना कोणी बसलेले असे. आवडत्या कुणाशीही तासचे तास बोलणे मला जमते. तिसऱ्याची मात्र मला नेहमी अडचण होते. माझी वाणी मग पडदा घेते.

अनेकदा अशी कुचंबणा झाल्यावर मी विचारले,

'दलाल, तुमच्या घरचा पत्ता काय?'

'कशाला पाहिजे?'

'तुमच्याशी मोकळेपणे बोलावेसे वाटते.'

'इथे बोला की.'

'इथे नेहमी जत्रा असते.'

'त्या जत्रेतीलच तुम्ही एक.'

हे बोलणे झाले तेव्हा अरविंद गोखले तिथे होते. ते माझ्याहून अधिक जुने, अधिक जवळचे, दलालांचे स्नेही. माझे अनवधानी बोलणे त्यांना दूर लोटणारे, जत्रेत टाकणारे होते. दलाल मोठे कलावंत. त्यांनी सारे सावरून नेले होते. त्यांनी मला जवळ तर येऊ दिले नव्हते. पण दूरही लोटले नव्हते. साऱ्या ग्रहगोलांना आपणाशी बांधून घेण्याची, पण तरीही त्यांच्या त्यांच्या जागी ठेवण्याची, जी जादूगार कला सूर्याच्या चित्शक्तीत आहे, तशीच कला दलालांच्या वर्तनात होती. या जादूची भूल पडायची ती नेत्रातून, हास्यातून, शब्दातून, स्वरातून. तशी ती माझ्यावरही पडली.

परिचयाच्या अगदी आरंभीच्या पर्वातील या प्रसंगी मी सावध झालो तरी त्या जादुगार भूलीत गुंतलो. माझ्यातील जे दलालांना जाणून घ्यायचे होते ते त्यांनीही जाणले आणि हळू हळू मला खूप जवळ घेतले. हे जवळ घेणे कळीच्या सहज उमलण्यासारखे एक सौंदर्य होते. यात पंखाखाली घेऊन उबवणे (Patronisation) नव्हते. तर माझ्यातील 'मी'ने स्वतंत्रपणे फुलावे, माझे मला मी सापडावे, माझा आत्मविश्वास वाढावा, माझी प्रतिष्ठा उंची रहावी, त्यांच्या आधाराने हे सारे व्हावे पण हा आधार कुठेही मला टोचू नये, अशा सौंदर्याने दलालांनी हे जवळ घेणे फुलविले. शेकडो बारिकसारिक प्रसंगांतून हे फुलणे उमलले. त्यातले एकदोन प्रसंगच इथे सांगायचे आहेत. एक प्रसंग असा. हा माझ्या रात्रपाळीशी संबंधित आहे!

मी सततची रात्रपाळी करतो हे जेव्हां लोकांना प्रथम कळते तेव्हा त्याची पहिली प्रतिक्रिया आश्चर्याची असते. त्याहून अधिक जवळ जातात ते मी सरकारी पगारावर झोपा काढत असणार असा स्वतःचा समज करून घेण्यात तृप्त असतात. त्याहून अधिक जवळ येतात ते एकतर 'मी आणि माझे कर्म' अशी उपेक्षा करतात नाहीतर 'हा मूर्खपणा मी तात्काळ बंद करावा' असा आग्रह आरंभतात. काहींच्या सुरात तर असेही जाणवते की, प्रसंगी रात्रपाळीचा परिणाम म्हणून मी मेलो-गेलो तर त्याना 'बघा, तरी मी याला नेहमी बजावत होतो' अशा शब्दात स्वतःच्या भविष्यवाणीची घोषणा करण्याचा आनंदही होणार असतो.

दलालांना ही रात्रपाळीची कहाणी प्रथम कळली तेव्हां यांनी विचारले,

'दिवसा चार तास तरी शांत झोप मिळते ना?'

दलालांचा हा प्रश्न मोठा जादूचा होता. जी सूचना मला करायची ती तर त्यात होतीच. पण जी काळजी करायची ती तीही त्यात होती. याहूनही फार मोठे सौंदर्य त्या सहज-प्रश्नात सहजी भरलेले होते. त्यात एक फार मोठी जाण होती.

मीही माणूसच होतो. सुखशांतीची जी ओढ माणसाला असावी ती मला असणे हेच नैसर्गिक होते. रात्रभर परांच्या गादीवर शांत झोप मला मिळाली असती तर ती मला नको होती असे नव्हे. इतके



अनुक्रमणिका

अजूनही मी झोपेवर पाणी सोडत होतो ते केवळ मूर्ख म्हणून नव्हते तर त्याला काही कारणे होती. नुसते जगण्यापेक्षा काहीतरी करावे अशी जी ओढ मला होती ती ओढ पुरविण्यासाठी मला जीवनाशी करावी लागलेली अपरिहार्य तडजोड म्हणजे माझी रात्रपाळी होती. पाच तास प्रवास आणि आठ तास नोकरी अशी सक्तमजुरी दिवसा केली तर रात्री झोपेशिवाय काही हाती लागत नाही. पण हीच गोष्ट रात्री केली तर सर्व दिवस झोपावयाचे म्हटले तरी झोपणे शक्य नसल्याने वाचनाला, अभ्यासाला, दिवसाचे तीन चार तास तरी सुटतात; हातून काही काम होऊ शकते; यासाठी जाणीवपूर्वक केली जाणारी, एका अर्थी साधना, अशीच ही रात्रपाळी होती. मी ती डोळे उघडून शहाणपणाने स्वीकारली असल्याने तिची जी फळे येतील ती भोगायला मी तयार होतो. तो माझ्या जीवननिष्ठेचा एक भाग असल्याने त्याला कोणी मूर्खपणा म्हणावे हे मला रुचणारे नव्हते.

अर्थात् हे इतके सारे जाणणे फार कठीण असते. दुसऱ्याच्या शहाणपणावर विश्वास ठेवण्याची सवय असणारा माणूसच हे सारे जाणू शकतो. दुसऱ्यातही काही शहाणपण असावे असे मानण्याचे शहाणपण फार दुर्मिळ असते. जिथे ते असते तिथे त्याचे दर्शन मोठे लोभस असते; सुखदायक असते; ज्याला ते घडते, त्याचा आत्मविश्वास पोसणारे असते. दलालांच्या त्या एका प्रश्नात हे सारे लोभस सौंदर्य मला दिसले. माझ्या जीवनदृष्टीवर विश्वास ठेवण्याची त्यांची ताकद आणि त्यावरोबरच साहजिकपणेच त्यांना वाटणारी माझी काळजी या दोघांचा मनोज्ञ संगम त्यांच्या त्या प्रश्नात होता. खूप न बोलताही दलाल त्या प्रश्नात खूप बोलून गेले होते. त्यांनी त्या प्रश्नाने मला जवळ बोलावले होते; जवळ घेतलेही होते. यातील काहीही मुद्दाम न करता अगदी सहजपणे केले होते. कारण त्या कलामूर्तीची प्रत्येक कृती हीच अशी सहजकला होती.

असाच दुसराही एक नाजूक प्रसंग.

हा जय नावाचा इतिहास आहे. या पुस्तकाला प्रतिष्ठा लाभली तेव्हा मी 'ललित'मधे 'हा जय नावाचा इतिहास आहे.' याच नावाचा एक लेख लिहिला. हा माझा जवळजवळ पहिला असा आत्मपर लेख. दलालांना आत्मपूजेचे वावडे. दलालांना माझा आत्मपर लेख आवडणार नाही याची मला खात्री होती. त्यांचा रोष कसा प्रकट होईल याचीही काही कल्पना नव्हती. जरा भीतच मी त्यांच्या समोर गेलो.

ते म्हणाले,

'या. तुमचा लेख वाचला. छान जमला आहे.

मी अस्वस्थच होतो. त्यामुळे काही बोललो नाही. माझ्याकडे रोखून पाहात तेच म्हणाले,

'एक मोठी काळजी घ्यावी लागते. तुमच्या बाबतीत ती काळजी मला नाही.' लाल शेऱ्यांनी भरलेले प्रगतीपुस्तक वडिलांना दाखवणाऱ्या मुलासारखा मी अजूनही चूप बसलो होतो. क्षणभर थांबून हसत ते म्हणाले,

'काहीतरी घडल्याचे समाधान माणसाला वाटायलाच हवे. सारे करून झाले असे मात्र त्याला वाटता नये. तुम्हाला तसे वाटणार नाही याची मला खात्री आहे.'

किती विलक्षण सुंदर असे हे बोलणे? या बोलण्यानंतर काय सांगायचे राहाते? असे सुंदर बोलणे, 'सारे जीवन हीच कला' अशा निष्ठेने जगणाऱ्यालाच जमू शकते. असे बोलणारे दलाल मला जवळ ये म्हणत होते. जवळ घेत होते.

असे शेकडो प्रसंग. अक्षरशः शेकडो. आता एकच सांगतो.

गेल्या मे मध्ये मी माझ्या मुलीचे लग्न ठरविले. हे लग्न मला शक्य तो माझ्या निष्ठांना अनुसरून करायचे होते. हॉलवर कुणाकडूनही काही घ्यायचे नाही अशी यातील एक निष्ठा होती. ही निष्ठा पाळल्याचे समाधान ही यातील जमेची बाब होती. पारंपारिक सोहळ्यातील सौंदर्याच्या सर्वांगीणतेत काहीतरी तृटी आल्याचे अनेकांना/जाणवणार, ही खर्चाची बाब होती. आमंत्रणेही जिव्हाळ्याने करता येतील तेवढीच मला करायची होती.

दलालांना मी त्यांच्या कार्यालयात आमंत्रण दिले. त्यांनी ते वाचले. ते म्हणाले,

'तुमच्या घरचे पहिले कार्य आहे. मी येणार आहे. पण मला सपत्निक घरी येऊन तुम्ही आमंत्रण द्यायला हवे. येताना मुलीला घेऊन या. मला तिलाही पहायची आहे.'

दलाल माझ्या निष्ठा तर मानणार होतेच. पण त्यांना जे करायचे होते तेही करणार होते. त्यांचा हेतू मी ओळखला, तरी त्यांच्यापुढे काही बोलायची माझी पद्धत नव्हती. त्यामुळे मी हो म्हणालो व त्यांच्या घरी वेळ ठरवून गेलो. त्यापूर्वी त्यांच्या घरी मी अनेकदा गेलो असलो तरी सहकुटुंब असे हे पहिलेच जाणे होते. सौ. उषा व चि. नंदा जरा दबलेलीही होती. त्यांचा सारा दबलेपणा दलालांच्या प्रसन्न कुटुंबात केव्हांच लोपला. त्यांचीही मने दलालांशी जुळून गेली.

आम्ही गेलो होतो ते मनाची तयारी करून गेलो होतो. 'देणे' हेच ज्यांचे शील होते ते दलाल काय करणार याबद्दल आमची काही कल्पना होती. ही कल्पनाही आम्ही आमची क्षुद्रता जमेत धरून केली नव्हती, तर दलालांचे मोठेपण जमेत धरून केली होती. पण प्रत्यक्षात दलालांनी आमच्या कल्पनेलाही लाजविले. माझी मुलगी त्यांची लाडकी पुतणी असती तर त्यांनी जे जे केले असते ते ते त्यांनी केले; जे जे दिले असते ते ते दिले. ओझे वाटणार नाही अशा जिवंत ममतेत भिजवून दिले. एका वेगळ्या नात्याच्या बासनात गुंडाळून दिले.

या नात्याच्या स्वरूपाचा एक शब्द कधी दलालांच्या तोंडून निघाला नव्हता. पण हे खूप जवळचे नाते होते. खूप पुढचा प्रवास झाला होता. 'त्या जत्रेतीलच तुम्ही एक' ही ती आठवण, त्या प्रवासाच्या एका टोकाला होती. तो आरंभ. हे प्रवासाचे जवळ जवळ दुसरे टोक. जिथे पोहोचायचे त्याच्या खूपच जवळचे.

आणखी पुढे जायचे होते. जाता आले असते. थोडे जाऊनही झाले होते.

आता सारे संपले आहे.

आजवर मृत्यू पाहिले नव्हते असे नाही. खूप मृत्यू पाहिले. पण ते सारे 'मरणं प्रकृतिः शरीरिणाम्' असे म्हणत पाहिले. अट्टाहासाने जे तत्वज्ञान पोपटपंची सारखे जवळ केले होते त्याच्या प्रकाशात पाहिले. एका अर्थाने ते मृत्यू नव्हतेच!

दलालांचा मृत्यू हाच माझ्या जीवनातील खरा मृत्यू. मृत्यूच्या अंगी तत्वज्ञान चिरायचे सामर्थ्य हवे. या मृत्यूने तत्वज्ञान चिरले आहे. तो आत गेला आहे. त्याने जखम केली आहे. अश्रूचे रक्त काढलेले आहे.

श्राद्धे करण्यावर माझा विश्वास नाही. वडिलांचे श्राद्ध मी केलेले नाही.

श्राद्ध हे घडावे लागते; घडते; याची जाण नव्हती; अनुभव नव्हता. तो मात्र या मृत्यूने आला आहे. आता रोज श्राद्ध घडत आहे—

दलाल नाहीत तिथले जगणे हे एक लंगडेपण वाटते. संदर्भा-संदर्भात त्यांची आठवण येते. इतक्या जवळ आलेला हा माणूस आता कायमचा खूप दूर गेला आहे या सत्याशी जमवून घेणे जमत नाही. जमेलसे वाटत नाही. ० ० ०



# त्यांच्या मृत्यूला कुरूप म्हणू नका!

**सुरेश वेंगुर्लेकर**

म्हणतात दलाल गेले. पण ते खरं वाटत नाही. त्यांच्या अंत्ययात्रेला गेलो. त्यांची चिता डोळ्यांनी पाहिली. पण त्या कशाचाच मनावर पक्का ठसा उमटू शकलेला नाही. सैरभैर झाल्यासारखे वाटले. पण मग गढूळ पाणी निवळून पुन्हा तळ दिसू लागावा तसे दलाल होते तेव्हाचे मनावरचे ठसे पुनः उजळू लागले. हे ठसे दलाल गेले हे मानूच देत नाहीत.

अगदी दलाल गेले तो दिवस. स्मशानातून बाहेर पडलो आणि सदानंद रेगे, श्रीराम कामत, वसंत सबनीस, मी आणि प्र. शी. नेरुरकर अच्युत बर्व्यांकडे आलो. बर्वे हबकलेच होते. आम्हाला पाहून एकदम गहिवरले. पण हे फार वेळ टिकले नाही. दलालांबद्दल आम्ही बोलू लागलो आणि जडता कशी ती हळूहळू विरतच गेली.

रविवारी बर्व्यांना बाहेर काढून खारला आशुतोषला (नातू) पहायला जाऊ म्हणणारे दलाल... अच्युतरावांसारखा जावई हवा म्हणून सौ. बर्व्यांना म्हणणारे दलाल..कामतांच्या घरी माशाच्या जेवणासाठी साहित्यिक मित्रांना घेऊन ठाण्याला पोचलेले दलाल. रोव्हर्सच्या फूटबॉलच्या फायनलला मला यायचंय हं म्हणून मला बजावणारे दलाल.. बस, दलालांच्या आठवणी मागून आठवणी येत राहिल्या त्या त्या अशाच. झाडांच्या सावलीतून वहाणाऱ्या ओहोळांच्या स्वच्छ पाण्यासारख्या. मनाला हळुवार गार स्पर्श करणाऱ्या. त्या स्पर्शाने मनावरचं खुद्द त्यांच्याच मृत्युचं सावट उधळून लावणाऱ्या.

यंदाचा दिवाळी अंक प्रसिद्ध झाल्यानंतर स्टुडिओत दलालांशी बोलत बसलो होतो. अलिकडे स्टुडिओत येताना ते गाडी आणत नव्हते. लोकलने...फर्स्ट क्लासने प्रवास करायचे. बोलता बोलता म्हणाले, 'हल्ली बघा फार पटकन चिडायला होतं. सगळं एकदम नको वाटतं. डब्यातून उडी घेऊन यातून मोकळं व्हावसं वाटतं बघा.'

मी दचकलो. आणि माझं दचकणं त्यांच्याही लक्षात आलं. लगेच इतक्या घाईने त्यांनी स्वतःला सावरले की मला यावर काही बोलण्याची संधीच न देता ते म्हणाले, 'काय हो, किर्लोस्करचा दिवाळी अंक पाहिलात की नाही?' आणि असं म्हणून त्या कुठल्याशा प्रदर्शनातल्या दगडांच्या रचनात्मक चित्राबद्दल नि जमुनोत्रीच्या पात्रात त्यांनी पाहिलेल्या त्या रंगीबेरंगी दगडगोट्यां-विषयी ते मग असे काही खुलून बोलत राहिले की क्षणापूर्वीचं नैराश्य कुठल्या कुठं नाहीसं झालं. एका कलाविषयक अनुभवाच्या आनंदात बघता बघता आम्ही बुडून गेलो.








# चैतन्यमूर्ती रंगरश्मी दलाल

**सोपानदेव चौधरी**

एकदा परिमलाला वाटले आपण वाऱ्यावरोबर दिगंतात विहरायला जावे, फुलाला न विचारताच परिमल दिगंतात निघून गेला. माग राहिले फक्त पार्थिव फूल! "परिमळु निघालिया पवनासाठीं, मागे ओस फुल राहे देठीं, तैसे आयुष्याचिये दिठीं, केवळ देह!" चित्रकार दीनानाथ दलाल या परिमळासारखेच कुणालाही न विचारता कायमचे निघून गेले. हा महान् चित्रकार अनंत रंग रंगविणाऱ्या श्रीरंगात विलीन झाला. दीनानाथ दलाल म्हणजे 'महाराष्ट्राचे राजा रविवर्मा'. रविवर्म्याने संस्कृति-संपन्न अशी भारतीय स्त्री निर्माण केली, त्याचप्रमाणे दलालांनी 'लावण्यगुण कुलवती' अशी महाराष्ट्रीय स्त्री निर्माण केली, की जिच्याकडे वघून असेच वाटावे–भयचकित नमावे तुज रमणी.–भारतीय स्त्री यापेक्षा आणखी निराळी कशी असू शकेल ?

श्री. दलाल यांच्यावर पाच वर्षांपूर्वी मी एक कविता लिहिली होती. एकदा गप्पांच्या ओघात मी एक कविता वाचून दाखवितो असे म्हणून ती कविता वाचू लागलो. कवितेचे शीर्षक 'दीनानाथ' आणि समोर बसलेले दीनानाथ ! त्यावेळी त्यांची स्थिती काय झाली असेल म्हणून विचारता ! दीनानाथ दलाल लाजून लाजून अक्षरशः सानेगुरुजी झाले ! हीच माझी कविता दीपावलीच्या रजतोत्सवप्रसंगी वाचून दाखविणार होतो. दलालांच्यासाठी नव्हे, तर त्यांच्या चाहत्या मित्रपरिवारासाठी ! परंतु या सभाप्रसंगी फक्त दीपावली मासिकासंबंधी बोलावे अट होती, करायचे काय? अशी मीही पडलो सभेचे नियम पाळणारा सभ्य! मनातले मनातच राहून गेले. साक्षात् नम्रतेनेही ज्यांच्यापुढे एखादेवेळी ताठर वृत्तीचे ठरावे असे चित्रकार दीनानाथ दलाल !

दलालांची ओळख होण्यापूर्वी मी त्यांना पाहिलेले नव्हते. सर्वांना वेड लावणारी अशी त्यांची काही चित्रे मात्र पाहिली होती. त्यावरून दलाल म्हणज चाळीशी उलटलेले, चाळीशी लावलेले असे कुणीतरी भारदस्त गृहस्थ असावेत अशी माझी कल्पना होती. तोच हा त्यावेळी विशीतला पोरसवदा तरुण वघून मी आश्चर्यचकित झालो. ही आठवण मी दलालांना अलिकडेच सांगितली. त्यावेळी ते मनापासून हासले आणि मग गंभीरपणे म्हणाले, 'सोपानदेव ! त्या काळात मी खराखुरा कलावंत होतो. आता ऑईल पेंटिंगची संधी येत नाही. कर्मांशिअल आर्ट मध्ये शिरून वॉटर कलरींग करावे लागत आहे. ती पूर्वीची मजा येत नाही. मी म्हणालो, 'दीनानाथ ऑईल पेंटिंग गेले तरी तुमच्यामध्ये ती स्निग्धता आहे. आणि आता वॉटर कलरिंग मध्ये आर्द्रता, ओलावा आहेच आहे."

जानेवारीच्या सरत्या आठवडयात मी पुन्हा आर्ट स्टुडिओत गेलो. श्री. पेठ आदी दलालांचे सहकारी आसवे पुसून धीमेपणाने कामाला लागले होते. 'दीपावलीचा दीनानाथ दलाल श्रद्धांजली अंक निघणार, या अनुप्रासित शब्दांनीही मला यातना झाल्या. दुःखाने सुखाचा आंगरखा घातलेले ते शल्य! टेवलालगतच्या खुर्चीवर मी बसलो होतो-समोरचे मुख्यासन रिकामे होते. टेबलावर रंग पेटी नव्हती, कुंचले नव्हते. दलालांच्या हातून चुकून पडलेला रंगाच एखादा डाग ! तोही दिसला नाही. निष्कलंक आसन! निष्कलंक जीवन ! एक महान् चित्रकार अचानकपणे कायमचा निघून गेला. दिन ढळण्याच्या आतच दुपारी तिपारी या रंगरश्मीनें मावळावे ! त्यांच्या स्मृति समाधीवर वाहिलेली हीच माझी अश्रुमय श्रद्धांजली. ●●●





अनुक्रमणिका

# दलाल-माझे गुरु

**प्रभाकर जोगदंड**

मला आता नक्की आठवत नाही पण ते ४९।५० साल असावं; माझ्या हातात 'निळे डोंगर तांबडी माती' पुस्तक आलं. लिखाणापेक्षा त्यातल्या चित्रांनी मी मोहित झालो. चित्रे काढण्याची आवड ४५।४६ सालापासून होती. त्यावेळी नियमाने "मौज" पहात होतो. "पहाणं" म्हणण्याचं कारण वाचनात विशेष गोडी नव्हती. "मौजे"त एखाद-दोन दलालांची चित्रं असतं. ज्याप्रमाणे एखाद्याला चित्रपट-सृष्टीचं आकर्षण असतं तसं मला चित्रकाराच्या सृष्टीचं होतं. मौजेतून व सत्यकथेतून 'माणदेशी माणसं' 'गांवाकडच्या गोष्टी' व 'शितू' क्रमशः येत तेव्हां तर वाटे आपण दलालांना एकदा भेटावंच. वाटायचं की प्रथम दलालांनी चित्र काढली व नंतर त्या चित्रांकडे बघून माडगूळकरांनी 'मुलाण्याचा बकस', "तांबोळ्याची खाला" वगैरे व्यक्तिचित्रे लिहीली. प्रथम दलालांनी चित्रं काढली नंतरच अप्पासाहेब दांडेकर यांना शितू भेटली असावी. प्रथम अंडं का प्रथम कोंबडी हे जसं समजणं कठीण त्याचप्रमाणे प्रथम 'शितू' लिहीली गेली की प्रथम दलालांनी चित्रं काढली असं त्यावेळी मला वाटायचं. मुंबईपासून दूर असल्यामुळे दलालांना भेटणं शक्य नव्हतं. पण त्याचवेळी मी मनातल्या मनात दलालांना गुरु मानलं होतं. तसा त्यांच्याशी पत्रव्यवहारही ठेवला होता. 'दीपावली' तर घेत होतोच. दलालांची चित्रं हेच माझा गुरु होते. एकलव्याप्रमाणे माझंही शिक्षण चालू होतं. मला वाटतं माझ्याजवळ दलालांची जितकी चित्रं आज आहेत तेवढी क्वचित कोणाजवळ असतील. दलालांचं चित्र मग ते कुठेही येवो मी संग्रही ठेवीत होतो, त्यापासून शिकत होतो. दलालांचा माझा असा अप्रत्यक्ष दृढ संबंध होता.

गेल्या १४-१-७१ लाच मी त्यांना भेटलो होतो. माझ्या कामाबद्दल त्यांनी चौकशी केली. माझी चित्रं माझ्यावरोबरच होती. दलाल म्हणाले, "आज माझी तब्येत ठीक नाही, फ्लू वाटत आहे, तुम्ही शनिवारी स्टुडीओत भेटा" मला आनंद झाला; पण तो शनिवार आलाच नाही. माझी चित्रं दलालांनी पहावी इतकं माझं भाग्य नव्हतं. चित्रांतील व्यक्तींच्या डोळ्यांतून अश्रू आले आहेत असं मला दिसलं, पण ते अश्रू माझ्याच डोळ्यातले होते.

"असावे लागते भाग्य हंसायाते न काय ते। रडाया तेही जीवाते या लोकी भाग्य लाभते ॥

माझं भाग्य नव्हतं.

---

( पान १४ वरून )

आजही त्या घटनेचा विचार करताना स्पष्ट लक्षात येतं आहे की दलालांनी त्या दगडांविषयी सांगायला सुरवात केली तेव्हा स्वतःला सावरण्याचा त्यांचा तो एक कृत्रीम प्रयत्न होता. पण त्या दगडांविषयी कलावंत म्हणून त्यांनी टिपलेला अनुभव इतका अस्सल होता की त्या प्रयत्नातल्या कृत्रिमतेवर मात करून त्या अनुभवातल्या सौंदर्यानं त्यांना नि मलाही बघता बघता सहज स्वतःत सामावून टाकलं. माणूस म्हणून जीवनात करावी लागणारी तडजोड दलालांनाही चुकली नसावी. पण मला वाटतं त्यांच्यातला कलावंत त्यांच्यातल्या माणसाला चुकवून घेऊन असा अनेकदा त्यांना घऊन भटकला असावा.

रंग आणि दलाल यांच्याविषयी खरं तर आम्ही बोलू नये. पण तरीही अर्थाची काहीना काही सांगड घालण्याचा खटाटोप करीत रहाणं हा तर आम्हा लेखकांचा धंदा. म्हणूनच दलालांच्या चित्रातल्या रंगांची जीवनाशी सांगड घालताना मला एका चित्रासंबंधीची आठवण येत आहे. (पुनः हेही चित्र मी स्वतः पाहिलेलं नाहीच.) माझे स्नेही नि आजचे आघाडीचे नेपथ्यकार रघुवीर तळाशिलकरांनी, त्यांनी पाहिलेल्या एका चित्राबद्दल मला सांगितले. त्या चित्रात चित्रकाराने एक डोळा काढला होता... नि त्या डोळ्यात अनेक रंगांची वर्तुळं दाखवली होती. तळाशिलकरांनी त्या चित्रातली कल्पना स्पष्ट केली ती अशी... की त्या चित्रकाराला म्हणायचं होतं, अरे जीवनात भरपूर रंग भरून राहिले आहेत. तुम्ही फक्त डोळ्यात रंग आणून त्याच्याकडे पहा. दीपावलीच्या रजतमहोत्सवात काणेकरांनीही दलालांचा चित्रविषयक दृष्टिकोन सांगितला. प्रत्यक्षातलं अथवा कल्पनेतलं त्यांनी पाहिलेलं मूळ सौंदर्य थोडं वाढवून मांडण्याचाच त्यांचा प्रयत्न असे. मला वाटतं त्या चित्रातल्या कल्पनप्रमाणे दलालांनीही जीवनातलं सौंदर्य डोळ्यात रंग आणून पाहिलं नि आपल्या कुंचल्याच्या स्वभावानुसार नेहमीच ते थोडं वाढवून मांडलं.

अगदी उदाहरण घेऊन हेच सांगायचं झालं तर दीपावलीच्या रजतमहोत्सवाचंच घेता येईल. पंचवीस वर्षं अखंडपणे दीपावलीचा दरबार भरवणाऱ्या दलालांचा सत्कार करावा ही दीपावलीच्या लेखक मित्रांची मूळ कल्पना. दलालांनी या कल्पनेतलं सौन्दर्य टिपलं नि आपल्या स्वभावानुसार ते वाढवून मांडलं. स्वतः कुंचला धरायला अलिप्त राहून दीपावली नि त्यांच्या लेखकांची सांगड घालणारी एक विलोभनीय संध्याकाळ जाता जाता ते रंगवून गेले.

म्हणूनच जीवनाकडे शेवटपर्यंत डोळ्यात रंग आणून पाहिलेल्या या कलावंताच्या बाबतीत मृत्यूचाही रूढ... कुरूप अर्थ लावला जाऊ नये, असं वाटतं. त्यांच्या जाण्या बाबत आपण मृत्यूलाही थोडं समजून घ्यायला हवं. माझ्या माहितीप्रमाणे भोव्यांपासून अनेक जवळच्या माणसांच्या जाण्याने, अलिकडे ते मनाने... कल्पनेने मृत्यूच्या आसपास वावरत होते. कुणी सांगावं त्यांच्यातल्या कलावंताला मत्यूतही काही सौंदर्य आढळलं असावं नि त्यांच्या स्वभावानुसार त्यांनी ते हे असं वाढवून मांडलं असावं.

त्यांच्या अवेळी जाण्याचा डोळ्यात रंग आणून आता हाच अर्थ लावायचा.

● ●

# दीनानाथ दलाल — माझ्या माहितीचे !



**डॉ. श्री. शां. आजगांवकर**

शुक्रवार दि. १५ जानेवारीची काळरात्र आठवली की अजूनसुद्धा काळीज अगदी चर्र होऊन जाते. रात्रीचे दहा वाजण्याचा समय होता. नुकताच मी जुहूला माझ्या घरी आलो होतो, इतक्यात दूरध्वनी (टेलिफोन)ची घंटा वाजली. श्री. दलाल यांचे जामात श्री. कारे यांचा फोन होता, की दलालांना बरे वाटत नाही, श्वास जलद लागतो आहे, घाम येत आहे. त्यांना पहायला यावे. त्यांनी सांगितलेल्या लक्षणांवरून परिस्थितीचे गांभीर्य तावडतोब ध्यानात आले. त्यांना मी आताच निघत आहे तोपर्यंत माझे चिरंजीव डॉ. विजय यांचा संपर्क साधून त्यांचा हृदयाचा आलेख (Ca diog am) घेण्यास सांगितले. मी श्री. दलाल यांचे घरी पोहोचतो तो श्री. दलाल यांचा "कार्डियोग्राम" घेऊन झाला होता. तो पाहिल्यावर श्री. दलाल यांना घरी ठेवून उपचार करणे अशक्य असे आमचे दोघांचेही मत झाले. आणि बॉम्बे हॉस्पिटलमधील हृदयविकाराच्या खास केंद्रामध्ये नेऊन त्यांना तेथे उपचार करण्याची योजना आखण्यात आली व तशी व्यवस्थाही करण्यात आली. श्री. दलाल यांना रुग्णालयात जाण्याची कल्पना मान्य नव्हती, पण शेवटी ते कबूल झाले. त्यांना न चालविताच खाली नेण्यात आले तरी पण त्यांना त्यावेळी बराच घाम येत होता. ॲम्ब्युलन्सची वाट बघणे शक्य नव्हते म्हणून त्यांना त्यांचेच गाडीतून जपून नेण्यात आले. तरीपण हृदय विकाराच्या वॉर्डमध्ये नेईतो त्यांना जरी चांगली शुद्धी होती तरी पण नाडी हाताला लागत नव्हती. त्यांना उपचारासाठी Int siv C. Unit मध्ये ठेवून प्राणवायू देऊन पुढील उपचार करता करताच त्यांची प्राणज्योत मालवली—आकाशाची कुऱ्हाड कोसळली. केवढ्या आशेने आम्ही काळाबरोबर शर्यत मारत होतो, पण शेवटी तोच जिंकला. आमचा प्रिय सुहृद "दीनानाथ" आपल्या कुटुंबियांचा आणि त्यांच्या स्नेही सोबत्यांचा शेवटचा निरोपही न घेता अनपेक्षित आणि अचानकपणे सर्वांना "दीन" करून निघून गेला. श्रीमती सुमतिताईंना कसे सांगायचे की "दीनानाथ" आता सर्वांना 'अनाथ' करून गेले. प्राप्त कर्तव्य कटू असले तरी नियतीने ते करण्याची पाळी माझ्यावर आणली.. ती काळरात्र अजून माझ्या डोळ्यांसमोर उभी आहे. वैद्यक शास्त्र कितीही पुढे गेले तरी 'काळा'-पुढे पुष्कळदा आपल्याला हात टेकावे लागतात याची पुनः प्रचिती आली.

श्री. दीनानाथ दलाल यांचा आणि माझा परिचय इ. स. १९५२ पासूनचा. आम्हा दोघांच्या आवडी, विचार आणि आचार यांत बरेच साम्य होते. त्यामुळे आम्ही एकमेकांकडे आकर्षिले गेलो. त्यानंतर श्री. दलालांच्या स्टुडियोमध्ये दर बुधवारी दुपारी त्यांची भेट घेतल्याशिवाय जाणे होत नसे. बंद झाले ते हल्ली केनेडी ब्रिजच्या दुरुस्तीमुळे काही वर्षे !

गाथासप्तशती, शृंगार नायिका, अमृतमेघ वगैरे वैशिष्ट्यपूर्ण रसिक अशी निरनिराळी प्रकाशने प्रसिद्ध करून श्री. दलाल यांनी मराठी वाङ्मय प्रकाशनामध्ये आपले एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान निर्माण केले. त्यांनी नुकताच प्रसिद्ध केलेला दीपावलीचा खास लंडन अंक हे तर त्यांच्या कल्पकतेचे आणि योजकत्वाचे अगदी अपूर्व उदाहरण होय ! श्री. दलालांची अनेक फार मोठी स्वप्ने होती. आपला स्टुडीयो मोठ्या प्रमाणावर त्यांना वाढवायचा होता. जागेची व्यवस्थाही केली होती.- पण नियतीचा डाव निराळाच होता!

मधुमेहाचे रुग्ण म्हणून त्यांनी आपला विकार गेले १८ वर्ष चांगला नियंत्रणाखाली ठेविला होता; पण आपल्याला हा विकार असल्याचा आपली प्रकृती बरी नसल्याचा गाजावाजा त्यांनी कधी केला नाही. आदर्श मधुमेही रुग्ण म्हणून त्यांना, मधुमेह पंधरा वर्षे असूनही ज्याना त्या विकाराचे कोणतेच उपद्रव नाहीत अशांना देण्यात येणारे सर्टिफिकेट देण्यासाठी मी त्यांचे नाव सुचविताच ते म्हणाले 'डॉक्टर, मला मधुमेह आहे हे कोणाला मी सांगितलेदेखील नाही. मला प्रसिद्धी नको.' आमच्या डायाबेटिक ॲसोसिएशनचे ते सुरुवातीपासूनचे आजीव सभासद होते, तसेच पहिल्या कार्यकारी मंडळाचे सभासदही. डायाबेटिक ॲसोसिएशनचे कोणतेही काम असो, ते अगदी आत्मीयतेने आणि सेवावृत्तीने करीत असत. त्यांना शब्द टाकण्याचा अवकाश श्री. दलालांचा होकार तयार—

असा सहृदय कलावंत, निस्पृह मित्र असणे भाग्याचे ! पण दलाल आमच्यातून निघून गेले—अगदी चटका लावून—अनपेक्षितपणे. नुकताच त्यांनी आपल्या मानसकन्येचा—'दीपावली'चा—रौप्यमहोत्सव केला. सर्वांना आवर्जून त्यांनी या समारंभाला बोलावले—माझी त्यांची त्या दिवशी अगदी घाईघाईत भेट झाली. (कारण मला त्या दिवशी त्याच वेळी दुसरीकडेही तेवढ्याच एका महत्त्वाच्या कार्यक्रमाला उपस्थित राहणे भाग होते) त्यावेळी ते फार थकलेले दिसले. त्यांचा तो नेहेमीचा उसळून येणारा उत्साह दिसला नाही. त्यांना फार ताण पडलेला दिसत होता. विश्रांती घेण्याचा आणि प्रकृती तपासून घेण्यास येण्याविषयी मी सुचविले आणि त्यांनी एकदोन दिवसात कामाचा व्याप आटोपल्यावर यतो म्हणून सांगितले.... पण— त्यानंतर योग आला तो वियोगाचा !

● ● ●

अनुक्रमणिका

# रंगांगात ‘दलाल’ आहेत

**लक्ष्मीदास बोरकर**

केनेडी ब्रिजवरील दलाल आर्ट स्टडिओ. नेहमीच्या आपल्या खुर्चीवर दलाल स्थानापन्न. हातात कुंचला. चेहऱ्यावर तेच स्मित. माझ्या डोळ्यावर विश्वासच बसेना. ते दृश्य खरंच वाटेना. आजच सर्व वृत्तपत्रांनी पहिल्या पानावर दिगंत कीर्तीचे चित्रकार दलाल दिवंगत झाले असल्याचे दुःखद वृत्त ठळकपणे छापलं आहे. असं असताना मला स्टुडिओत मात्र दलाल नेहमीच्या खुर्चीवर बसलेले दिसतात. हे कसं काय ? दलाल गेले हे वृत्तपत्रातील सनसनाटी वृत्त खरं मानायचं तर माझ्या दृष्टीसमोर धडधडीत दलाल दिसताहेत. खरोखरीच दलाल जिवंत आहेत की इहलोक सोडून गेले असा संभ्रम पडला. माझ्या मनातील गोंधळ दूर करून घेण्याच्या हेतूने मी खुद्द दलालांनाच चाचरत विचारलं,

‘काय हो, आपली तब्बेत ठीक आहे ना ?

‘ठीक नसायला काय झालंय ? माझी प्रकृती ठणठणीत आहे.’

‘नाही म्हटलं, आपल्या निधनाचं वृत्त कानी आलं म्हणून खात्री पटवून घेण्याच्या इराद्याने स्टुडिओत आलो. पण आपणच प्रत्यक्ष भेटलात. बरं झालं. आपल्या निधनाचं वृत्त प्रसिद्ध झाल्याने आपणास परमेश्वर दीर्घायु करील.’

‘कोण म्हणतंय दलाल निधन पावले ? दलाल जिवंत आहेत. दलालांच्या हातातली कला जिवंत असेपर्यंत दलाल कधीच मरणार नाही.’ इतक्यात माझं स्वप्न भंग पावलं. मी खडबडून जागा झालो. निधनाच्या दुसऱ्याच दिवशी दलालांचं स्वप्नात दर्शन घडलं. तथापि, स्वप्नातील संभाषणातील दलालांचे ते वाक्य अद्याप कानात घुमत आहे. अन् ते अक्षरशः खरं आहे. दलाल गेले शरीरानं. पण दलाल त्यांच्या कलाकृतींच्या रूपाने अद्याप जिवंतच आहेत. जिवंतच राहाणार आहेत. दलाल कधीच मरणार नाहीत.

श्री. दलाल यांचं नाव मी लहानपणापासून ऐकत होतो पण दलालांशी माझा निकटचा परिचय केनेडी ब्रिजवरील स्टुडिओत दलाल आल्यापासूनच झाला. त्यातच माझे मामा कै. प्रभाकर शिरवईकर हे त्यांचे जानी दोस्त असल्याने मी दलालांना अधिक जवळचा वाटायचो. कधी रस्त्यात भेटले तर स्टुडिओत भेटायला ये असं निमंत्रण द्यायला ते कधीच चुकले नाहीत. मी सवड मिळताच दलाल आर्ट स्टुडिओत जात असे. एकदा सहज बोलताना ‘लेडी चॅटर्लीज लव्हर’ या लॉरेन्सच्या गाजलेल्या अश्लील (की श्लील ?) कादंबरीचा विषय निघाला. त्यासंबंधी मी काही गंमतीदार गोष्टी त्याना ऐकविल्या. दलाल केवळ चित्रकार नव्हते तर चतुरस्र संपादक होते. त्यांनी लगेच मला ‘लेडी चॅटर्लीज लव्हर’वर लेख लिहायला सांगितला. खरं म्हणजे त्या कादंबरीवरील अभिप्राय मी वाचले होते. प्रत्यक्षात कादंबरी वाचलेली नव्हती. परंतु, दलालांनी सुचविताच मी ती कादंबरी मिळवून वाचून काढली. लॉरेन्सचं तत्त्वज्ञान समजून घेतलं अन् ‘दीपावली’ साठी लेख लिहून दिला. दलालांना लेख आवडला व त्यांनी तो लगेच प्रसिद्ध केला. अलिकडेही प्रचलित सामाजिक विषयांवर दलाल माझ्याकडून लिहून घेत असत.

ज्या दिवशी ‘दीपावली’ची रजत जयंती होती त्याच दिवशीं माझे मामा श्री. प्रभाकर शिरवईकर हे मृत्यूशय्येवर झुंज देत होते. अशा परिस्थितीत मला ‘दीपावली’च्या आनंद सोहळ्यात सहभागी होण्याचं मनात असूनसुद्धा शक्य झालं नाही. दोन तीन दिवसांनी माझे मामा वारले. त्यांच्या अंत्ययात्रेसाठी दलाल आले होते. अंगात स्वेटर घालून ते मकाटचाळ राघववाडीत उभे होते. त्यांचा चेहरा गंभीर होता. ती काही बोलायची वेळ नव्हती. आम्ही एकमेकांना पाहिलं तेवढंच. अन् तेच त्यांचं शेवटचं दर्शन. कारण एका दिवसाच्या अंतराने दलाल गेले हे कर्णकठोर वृत्त कानी पडलं. त्यामुळं रजत जयंतीला अनुपस्थित का राहिलो हे त्यांना भेटीत सांगायची संधीच मिळाली नाही.

एक आठवण मात्र मनाला बेचैन करून सोडते. एकदा मी दलालांकडे आलो असताना दलाल मला म्हणाले, ‘आता मी तुमच्या-जवळ राहायला येणार.’ मला आनंद झाला. मी वरळीला आदर्श-नगर या गृहनिर्माण मंडळाच्या वसाहतीत राहातो. ते आमच्या-जवळ राहायला येणार म्हणजे कुठं येणार ? मी त्यांच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेने पाहिले. ते पुढे म्हणाले, ‘तुमच्या कॉलनीजवळ समुद्रकाठी गुरुकृपा नावाची एक सहकारी कॉलनी झाली आहे. त्याच्या शेजारीच मी जागा घेतली आहे. दोन ब्लॉक जोडून घेतले आहेत. ऐसपैस जागा. स्टुडिओसाठी स्वतंत्र निवांत जागा राहील. समोर निळा निळा सागर. वर निळे निळे आकाश. अशा प्रसन्न ठिकाणी बसून कलेची आराधना करायला मिळेल.

परंतु निळ्या सागराला साक्षी ठेवून कलेच्या आराधनेत मग्न होऊ इच्छिणारा किमयागार मात्र आज आपल्यात वावरायला हयात नाही हे पाहून हृदयात कालवाकालव होते. मन सुन्न होतं.

• • •

# दीक्षागुरु–दलाल !

**मधुकर रा. केणी**

‘केणी ! बरा असा मुरे ? गोयांत भी गेलो ना ?’ मधून मधून दादर स्टेशनांत श्री. दलाल भेटले म्हणजे अशी थोडी बातचीत व्हायची, दिवस आनंदात जावयाचा आज काहीतरी विशेष घड ल्याचा आनंद होत असे. आजही रोज भाबडे मन स्टेशनात घुटमळते परत भेटून बोलतील ? पण आता ते कधीच भेटणार नाहीत. त्यांच्या सहवासातल्या प्रेमळ आठवणीने दुःख होत आहे. गुरुस्थानी असलेल्या दलालांकडे त्यांच्याच मित्राने ( कै. श्री. वैकुंठ घोडे ) दिलेल्या चिठीने श्री. दलालांनी १९२९ मध्ये मला ठेवून घेतले. अत्यंत प्रेमाने मुंबईत कसे वागायचे, राहायचे ह्या गोष्टी ऐकून माझा चित्रकलेचा खुर्चीखाली बसून श्रीगणेशा सुरू केला व लवकरच त्यांच्या कुटुंबातला मी मानला गेलो.

माझ्यासारख्या अनेक लहानमोठ्या चित्रकारांना त्यांच्या कलेचा वरदहस्त लाभल्यामुळे मुंबईत आर्थिक व सामाजिक स्थिरता लाभली. अशा या गुरुस्थानी महान चित्रकारास अश्रुपूर्ण श्रद्धांजली.

• • •









अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



# ह र व ले ला म धु चं द्र

[३]

चीज पकौड्याची चव अद्याप जिभेवर रेंगाळते आहे. फारच खाल्ले. तीन प्लेटस्. मृणालचा आग्रह! कितीतरी दिवसांनी असा मनसोक्त कार्यक्रम झाला. मुंबईत नाही शक्य होत. बरोबर कस्टमर्स असतात. तिथं काय एकदम तीन प्लेट पकौडे खाता येतात?

परत प्रेस आलाच डोक्यात! पुरे आता परत मुंबईला जाईपर्यंत प्रेसचा विषय एकदम बंद! मृणालला चहा आवडतो. करशाँगला एकदम 'लाईट-टी' मिळतो. मी म्हणालो, असल्या फिक्या चहानं तुझं समाधान होणार नाही. चांगला तीन कप पी.

करशाँगला थांबलो, बरं झालं! मुंबईची घाईगर्दी अंगवळणी पडलेली. इथं आरामात चहा घेण्यात, गरम पकौडे खाण्यात काही और मजा आहे. त्यात ही हवा. पंधरा वर्षात एकदा तरी माणसाला असं काही जीवन हवंच! सतत काम काम काम! ह्या पंधरा वर्षात मृणालला मी बाहेर नेलं नाही, हौसमौज केली नाही. तिनंही त्याबद्दल कधीही तक्रार केलेली नाही. ह्या खेपी प्रथमच ती म्हणाली, 'दार्जिलिंगला जाऊ या' आणि आपण केवढ्या रुक्षतेने वागलो तिच्याशी! निर्दयपणाच म्हणायचा हा! सुशिक्षित, सभ्य निर्दयपणा!

मी माझा हात मृणालच्या साडीवर ठेवला. तिनं हलकेच तिचा हात माझ्या हातावर ठेवला. बोटं एकमेकात गुंफली गेली. सारा आवेग त्यात उतरला होता. इथं ड्रायव्हर नसता तर--!

मृणालला समजलं. तिला बरं वाटलं तसं मलाही बरं वाटलं. आमचा सारा प्रवास रुक्ष झाला. फर्स्टक्लासचा डबा, त्यात कुपे मिळालेला! पण फार गरम होत होतं. विशेषत: लखनौला डब्यात बसवेना! त्यात विचार प्रसचे-नव्या







अनुक्रमणिका

**क...था...सू...त्र – अनंत केशव बर्वे म्हणजे विक्षिप्तच म्हटला पाहिजे. चांगला बी. ए. झाला; पण छापखान्यात कंपॉझिटरचं काम शिकायला गेला. तरी बरं, आधी ठरवल्याप्रमाणे क्लास फोर शिपायाचीच नोकरी धरली नाही...... लग्नाच्या वेळी मात्र त्यानं आई–वडिलांना धक्का दिला... त्यांनी पसंत केलेल्या सांगलीच्या मुलीशी तो निमूटपणानं लग्नाला उभा राहिला... त्याची पत्नी 'लिमी' (त्यानंच ठेवलेलं लाडकं नांव) त्याच्याबरोबर रत्नागिरीला मधुचंद्रासाठी निघाली, पण त्यानं तिला नेलं ते थेट हिमालयात... त्यावेळचं तिनं स्वतःच्या मनाच्या कप्प्यात जपून ठेवलेलं स्वप्न पंधरा वर्षांनी पुन्हा जगण्याची तिला इच्छा झाली आणि नवऱ्याला छापखान्याच्या व्यापातून बळेवळे ओढून काढून ती पुन्हा हिमालयावरील स्वारीला निघाली आणि मग......**

मशीनचे, त्याला लागणाऱ्या पैशांचे !

• विचारी मृणाल–! तिच्यामुळं निघावं लागलं म्हणून मी गप्प गप्प होतो. मनात कुठंतरी चीड असावी. पण आता ठीक आहे. करशांगच्या चहात काही औषध होतं • काय ? तेथून हवा बदलते, तसा मूडही बदलला. उगीचच रोमँटीक वाटतंय. मृणाल आता अधिकच सुंदर दिसतेय.

दार्जिलिंगला कधी पोहोचणार आम्ही ?

तशा आमच्या गप्पा रंगल्यात. पण मला एकदम बायको हवीहवीशी वाटू लागली आहे. माझ्या शरीराचा कणन् कन् आसूसला आहे. ही थंड हवा, धुकं आणि बारीक बारीक पडणारी पावसाची रिमझिम मला अधिकच आतूर करते आहे.

काहीतरी मी म्हणालो आणि मृणाल हसत सुटली. मग मीही हसू लागलो.

हसता हसता दार्जिलिंग कधी आलं समजलं नाही. ड्रायव्हरनं विचारलं–गाडी कुठं घेऊ–!

दार्जिलिंगला काही थोडे रस्तेच मोटारींच्याकरिता खुले ठेवलेले आहेत. बाकी सर्व हिंडावे लागते पायीच ! दार्जिलिंग वसले आहे हिमालयाच्या एका उतरणीवर. कोठेही सरळ सपाट जागा नाही. घरं, इमारती देखील ह्या उतरणीचा उपयोग करून बांधलेल्या आहेत. हॉटेल पॅरडाईझही असंच. खालच्या बाजूनं गेलं तर जो पहिला मजला तो वरच्या बाजूनं गेलं तर तळमजला असल्यासारखा !

पॅरडाईझ हॉटेलसमोर टॅक्सी थांबली तसा एक सिक्कीमी सफरचंदाच्या रंगाचा मुलगा पुढं झाला, त्यानं सलाम करून दार उघडलं. आम्ही खाली उतरलो.

हॉटेलचा लाऊंझ छोटासाच आहे, पण सुरेख आहे. सगळ्या भिंती, छत फार काय जमीनही लाकडी आहे. भिंतींना वॉलनट पॉलिश केलेलं आहे.

समोर काऊंटरजवळ अलिकडेच बनवलेली छोटीशी केबिन होती. तीनही बाजूनी काचा असलेली ! त्यात एक रुबाबदार तरुण गडद निळा सूट घालून बसला होता. त्याच्याकडे लक्ष जाताच मृणाल थबकली. तिनं माझ्याकडे पाहिलं. खरं सांगायचं म्हणजे कधी आपल्या खोलीत पोहोचतो असं मला झालं होतं. पण मृणाल म्हणाली,

"ओळखलंत ?"

"हो !"

"त्यानं ओळखलं असेल आपल्याला ?"

"बहुतेक नसावं !"

"आपण भेटून जाऊया त्याला ?"

## प्रभाकर पेंढारकर

मृणालबरोबर मी त्या तरुणाच्या केबिनमध्ये शिरलो. तो खुर्चीवरून उठल्यासारखं करत म्हणाला, Please be seated. What can I do for you !"

आणि त्यानं सगळ्या गिऱ्हाईकांकरीता वापरून वापरून गुळगुळीत झालेलं एक स्मित केलं.

इतक्या औपचारिक स्वागतामुळे मृणाल एकदम गप्प झाली. मी हॉटल पॅरडाईझचं आम्हाला आलेलं पत्र त्याच्यापुढं केलं.

त्यानं उघडून लक्षपूर्वक वाचलं. त्याखालची सही बहुतेक त्याचीच असणार. मग तो म्हणाला, "येस, तुमची खोली राखून ठेवलेली आहे. तुमचं सामान तिकडं पोहोचवायला सांगतो मी !"

मृणालला रहावेना. विचारायचं म्हणून तिनं उगाच विचारलं; "कोणती खोली आहे ?"

"नंबर 104 ! Facing Kanchanganga Ranges. You will love the view in the morning !" त्याचे उच्चार कॉन्व्हेन्टमध्ये त्याचं शिक्षण झालं हे दर्शवत होते. लहान वयात मोठा व्यवसाय करू लागलेल्या तरुणाच्या चेहऱ्यावर असते तसले, न शोभणारे गांभीर्य त्याच्या चेहऱ्यावर होते. मी उठणार होतो, एवढ्यात मृणाल म्हणाली,

"आम्ही पूर्वी आलो होतो इथं !"

"अस्स् !" ओढून ताणून चेहरा आनंदी करत तो म्हणाला, "केव्हा ?"

"बरेच दिवस झाले. आपले दादाजी बसायचे इथं. ही ग्लास-केबीनही नव्हती त्यावेळी !"

"मी मुद्दाम करवून घेतली ही ! फॉरेन टूरिस्ट येतात इथं, त्या दृष्टीने काही बदल मी स्वित्झलंडला जाऊन आल्यानंतर हॉटेलमध्ये करवून घेतले !"

ह्या सुधारणाबद्दल मृणालला औत्सुक्य नव्हतं. तिनं विचारलं,

"दादाजी भेटतील का ?"

"ते इथं नसतात सध्या."

"मग—?"

"खाली करशांगला रहातात."

"येत नाहीत का इकडे कधी ?"

"नाहीत. बीमार आहेत."








"काय झालंय् ?"

"पॅरलेसिस् ?" तो अस्वस्थ झालेला दिसला.

मागं वळून पाहिलं तर बाहेर एक गोरे परदेशी कुटुंब उभे होते. त्या तरुणानं टेबलवरच्या इंटरकॉमवरून बाहेर कुणाला तरी सांगितलं,

"ह्यांच्याकरिता रुम नं. 104 रिझर्व्ह केलीय. त्यांना त्यांची रूम दाखवायला सांगा !"

आणि आमच्याकडे वळून तो म्हणाला "Thanks, You are always welcome !"

आम्ही केबिनबाहेर पडलो. मृणाल एकदम गप्प झाली. हॉटेल मॅनेजमेंट परदेशांत शिकून आलेल्या ह्या तरुणाला स्वतःच्या वडिलांकडून माणुसकी शिकता आली नव्हती.

खोली मोजक्याच फर्निचरने सुरेख सजवलेली होती. खोलीला पूर्वेच्या बाजूस मोठ्या खिडक्या होत्या, त्यातून बाजारापर्यंतची छोटी छोटी उतरणीवरची घरे एखाद्या सुरेख निसर्गचित्रात काढल्यासारखी रेखीव दिसत होती. खोलीत आम्ही दोघेच होतो. इतका वेळ वाट पहात होतो तो एकांत आता लाभला होता, पण मृणालचा मूड राहिलेला नव्हता.

*

आम्ही संध्याकाळी फिरायला बाहेर पडेपर्यंत मृणाल तशीच गप्प गप्प होती. आम्ही मालवर आलो तशी ती एकदम



म्हणाली, "खरंच माणसं अशी काहो वागतात ?"

प्रश्नाला उत्तर नव्हतं. वागतात एवढं खरं !

"आपण कमी का पैसे देतो त्यांना ? अगदी त्या परदेशी कुटुंबाला जेवढा ते चार्ज करतील तेवढाच आपल्याला ते करणार आहेत. मग असं का ?"

मी बोललो नाही.

"का अद्यापही आपल्यातली गुलामगिरी संपली नाही. गौरवर्णाची भीती मनातून गेलेली नाही ? आपण केवढ्या आशेनं गेलो त्याच्याकडे. मी तर त्याला बबलू म्हणून हाकच मारणार होते. आठवतो ना तो तुम्हाला ?"

"आठवतो ना ! पण मृणाल काय झालंय्; तू अद्याप पंधरा वर्षापूर्वीच्या काळातच वावरते आहेतस. तो तो काळ केव्हाच विसरून गेलाय ! त्याची नजर पुढे आहे."

"असू देत ना ! भूतकाळातल्या चांगल्या गोष्टी जपायच्या मी प्रयत्न करते आहे. काळाच्या घड्याळाचे काटे उलट चालत नसतात हे मलाही समजतं. पण हा पुढचा प्रवास मागच्या चांगल्या स्मृती विसरूनच केला पाहिजे का ?"

"कोणी मुद्दाम थोडंच करतं ते ?"

"मी मात्र मुद्दाम प्रयत्न करते आहे. ही जी जुनी स्मृतीचित्रं आहेत त्यावरचा रंग टिकवण्याचा मी प्रयत्न करते आहे."

"खरंच—?"

मग मला सांग हा काळ्या उलनच्या वेषातला, गोल टोपी घातलेला पोलिस पहाताच, "अहो तो पहा पोलिस" म्हणून एकदम ओरडणारी आणि पोलिसांचं आणि त्याच बरोबर साऱ्या गर्दीचं लक्ष आपल्याकडे वेधून घेणारी ती लिनी कुठं आहे आता ?"

मृणाल एकदम गप्प झाली. चेहऱ्यावरचे भाव लपवण्यासाठी खाली कुठंतरी पाहू लागली. मला मोठी गंमत वाटली. मी म्हणालो,

"जाऊ दे ग, जग सुधारायचा मक्ता आपण घेण्याचं कारण नाही.

मी प्रेसच्या कटकटी विसरलो आहे. तू पूर्वी पाहिलेल्या बबलूला विसरून जा. परत जाताना आपण कारशांगला थांबू आणि दादाजींना भेटून पुढं जाऊ !"

"खरंच !"

"खरं !"

मालवरून आम्ही कांचनगंगा दिसते का पहाणाऱ्या गर्दीत सामील झालो. दूर क्षितिज ढगांनी झाकून टाकलं होतं. पर्वतांची ती हिमशिखरं त्यामागे अदृश्य झाली होती. कदाचित वारा सुटेल आणि घडलेच तर काही क्षण त्या रुपेरी शिखरांचं दर्शन होईल म्हणून काही लोक थांबले होते.

मृणाल म्हणाली, "चला आपण खाली टॅक्सी स्टॅंडवर जाऊया !"

"टॅक्सी स्टॅंडवर कशाला ?"

"सांगते. चला तर खरं !"

मुख्य रस्ता सोडून आम्ही डावीकडे वळलो. खाली उतरण्यासाठी पायऱ्यापायऱ्यांचे 'शॉर्टकट्स्' दार्जीलिंगला अनेक ठिकाणी केलेले आहेत. पाऊस पडून गेल्याने पायऱ्या ओल्या झाल्या होत्या. पाय घसरू नये म्हणून मी मृणालला हात दिला. तो मृणालनं तसाच धरून ठेवला.

आम्ही दोघे पायऱ्या उतरलो. पायऱ्या संपल्यावर उजव्या हाताला जो डांबरी रस्ता लागतो त्याने चालू लागलो.

दार्जिलिंगला लवकर अंधार पडतो. सूर्य पाचच्या सुमारास मावळतो. कदाचित त्याहीपेक्षा लवकर ! आठ-साडेआठपर्यंत रस्त्यावरची गर्दी अगदीच तुरळक होते. मधुचंद्राला दार्जिलिंग एवढं दुसरं योग्य स्थळ शोधून सापडायचं नाही.

आम्ही टॅक्सी स्टॅंडला पोहोचलो तेव्हा अंधार पसरू लागला होता. धुक्यामुळं तर तो जास्तच लवकर पसरला. रस्त्याच्या कडेचे निळे निळे दिवे धुक्यात




लुकलुकू लागत होते. त्यांचे प्रकाशकिरण वेगवेगळे होऊन प्रकाशताना दिसत होते.

मृणाल काहीतरी शोधत होती. विचारलं तर तिनं असंच उडवाउडवीचं उत्तर दिलं. रस्ता तिच्या नीट लक्षात येत नव्हता. आणि नवीन उघडलेल्या दुकांनानी तिचा गोंधळ करून टाकला होता.

आम्ही टॅक्सी स्टॅंडला पूर्ण वळसा घालून पूर्वी होतो त्याच जागेवर आलो. मी म्हणालो, "परतूया आता!"

"एवढ्यातच ?"

"जेवायला जायला उशीर होईल!"

"होऊ दे!"

परत मृणालचा शोध सुरू झाला. आणि ह्या खेपी नेमकी तिला जागा सांपडली.

दुकानावर पाटी होती :

"श्री साईनाथ मद्रास कॅफे."

"या, या ना!"

मृणाल मला बोलावित होती. मी येत नाही हे पहाताच माझा हात धरून ओढत ती म्हणाली, "काढलंच की नाही शोधून!"

मघा मी तिला म्हणालो, "पंधरा वर्षांपूर्वीची लिनी आता कुठं राहिली आहे ?" ती तेथेच होती. मलाच सापडत नव्हती. आता एकदम सापडली.

मी तिला परत पूर्वीचा अनुभव नको म्हणून सावध करण्यासाठी म्हणालो, "परत ओळख काढण्याचा उपद्व्याप करू नकोस!"

"या तर खरं!"

आम्ही दुकानात शिरलो. पंधरा वर्षांपूर्वी नवे वाटणारे दुकान आता चकाकी उडालेल्या मांडचासारखं वाटत होतं. काउंटरवर पंधरा वर्षांपूर्वी पाहिलेल्या काळ्याशार केसांच्या माणसाच्या डोक्यावर आता कितीतरी रुपेरी केस चमकू लागले होते; पण तोच चेहरा. बिल घेण्याची आणि पैसे देण्याची तीच पद्धत!

मृणाल एकदम म्हणाली, "काय करं काय ?"

ह्या मराठी हल्ल्यानं तो माणूस एकदम दचकला. मग मृणालकडे लक्ष गेल्यावर तो हसला आणि म्हणाला, "ठीक ठीक, बरं आहे!"

परमुलखात ते मराठी शब्द कानाला सुखावून गेले. मृणाल माझ्याकडे पाहून म्हणाली, "पाहिलंत, माझा अंदाज चुकायचा नाही!"

"कुठचे, मुंबईचे का?"

"हो. पण आम्हांला ओळखलंत का?"

तो माणूस गोंधळला. आठवण्याचा प्रयत्न करू लागला. शेवटी त्यानं पराभवाची कबुली देऊन टाकली.

"आम्ही इथं सामान ठेवलं होतं."

"कधी कधी ?"

"हे हॉटेल नुकतंच सुरू झालं होतं तेव्हा!"

"... हां, हां,—पंधरा वर्षांपूर्वीची गोष्ट! बसा ना! कॉफी घ्या!"

त्यानं दोन रिकाम्या खुर्च्यांकडे बोट दाखवलं.

आम्ही बसलो. "दोन कॉफी—" त्यानं पोऱ्याला ऑर्डर दिली.

"कुठं उतरलाय."

"हॉटेल पॅरडाईझ!"

"मग काय प्रश्नच नाही!"

तो म्हणाला. एवढ्यात गिऱ्हाईक आलं. त्याचं बिल, मोड वगैरे! मृणाल मला म्हणाली, "डोसा घ्यायचा होता."

"आता नको, तो कदाचित पैसे घेणार नाही."

"अहो पण मी मागवेन कसा ?"

कॉफी आली. त्या थंड हवेत गरम मद्रासी कडवट कॉफी घशाखाली गेली तसं बरं वाटलं. कॉफीचे पैसे गृहस्थ घेईना! मग इकडच्या तिकडच्या गप्पा करून आम्ही निघालो.

गर्दी बरीच विरळ झाली होती. हवेतला गारठाही वाढला होता. दुकानं बंद होत होती. दोन दिव्यांमधल्या अंतरात रस्त्यावर अंधार जाणवत होता. ह्या अंधारात मी मृणालचा हात हातात धरला. जेमतेम आठदहा पावलं चाललो असू एवढ्यात



मागून गाडीच्या प्रखर दिव्यांचा झोत पडला. मृणालनं हात सोडवून घेतला.

उत्तम मद्याचा नशा हलके हलके मागमावर चढतो तसा त्या वातावरणाचा माझ्यावर परिणाम होऊ लागला. प्रवासात केवळ कुंद हवा, थंडी आणि हिमालयाची वस्त्री मी अनुभवत होतो. येथे अंधार आणि एकांत त्यांच्या जोडीला आले.

मुंबईत अंधार कधीच होत नाही. कुठंतरी कुणाचा तरी दिवा जळत असतो. कोठून तरी प्रकाशकिरण आपल्या खोलीत येत असतातच. तीच गोष्ट शांततेची! कोठेतरी मोटार सायकल रात्री अवेळी वेगाने निघून जाईल. बसची घडघड ऐकू येईल, नाहीतर अगदी मध्यरात्री वेळी डोक्यावरून कानठळ्या बसवत इंटर-नॅशनल बोईंग निघून जाईल.

त्या रात्री हॉटेलात आमच्या खोलीत अगदी निर्भेळ शांतता पसरली होती. बिछान्यात पडून मी मृणालची वाट पहात होतो. टॉवेलला तोंड पुसत ती आत आली. मी उगीचच टाईमचा अंक उचलला. आणि वाचण्याचं सोंग आणलं. ड्रेसिंग टेबलसमोर ती कानातले इअरिंग्ज् आणि केसातल्या पिना् काढत असावी.

दोन मिनिटं गेली आणि तिनं वरचा दिवा मालवला. बेड–लॅम्पचे प्रकाशवर्तुळ माझ्या हातातल्या अक्षरावर पडले होते. एरवी खोली अंधारात बुडाली.

मृणाल कॉटवर बसली. ती झोपेल म्हणून थांबलो होतो; पण ती बसूनच राहिली. आणखीन् दोनएक मिनिटं गेली असतील.

माझा दम चढला गेला. मी हाक मारली, "मृणाल–!"

उत्तर नाही !

"मृणाल–"

मृणाल तशीच बसलेली.

मी गादीत उठून बसलो. मृणालच्या डोळ्यात अश्रू ओघळत होते. मी हतबुद्ध झालो. आता ह्यावेळी हे अश्रु कशाला?

"मृणाल. काय झालं काय ?"

मृणाल बोलेना, तशीच अश्रू ढाळत बसली.

"अग मी काय तुला रागावलो काय? काय झालं काय ?"

हुंदका आवरत मृणालनं मान हालवली. काही नाही.

तिचे दंड धरून मी म्हणालो, "काय झालं, मला तर सांगशील ?"

माझ्या खांद्यावर डोकं टेकत मृणाल म्हणाली, "मला आठवण येते."

"कुणाची ?"

"मुलांची ! अवी–मीनाची !"

"अग ती सांगलीला आहेत ना–!"

"अं, मीच पाठवलं त्यांना–!

मुलांना सोडून मी कशी राहिलेय काय ? आपण त्यांना आणायला हवं होतं."

आणि माझ्या खांद्यावर डोकं घासत मृणाल रडतच राहिली. मी हात लांबवून दिवा बंद केला.

हसावं की मृणालबरोबर आपणही रडावं मला समजेना.

## [४]

टॅक्सी स्टॅंडवर थांबली. पॅसेंजर मंडळी उतरली, ड्रायव्हरचे पैसे देऊन चालू लागली.

अनंता आणि लिनी तसेच उभे ! ड्रायव्हर त्यांच्याकडे आला, तसे अनंतानं खिशातून पैसे काढले आणि गाडी–भाड्याचे पैसे देऊन टाकले. ड्रायव्हर तसाच उभा ! अनंतानं विचारलं, "काय पाहिजे ?"

"माझा कोट !" ड्रायव्हर म्हणाला.

मग अनंताच्या लक्षात आलं की अद्याप आपण ड्रायव्हरचा कोटच घालून आहोत. तो खजील झाला. त्यानं कोट काढून ड्रायव्हरला दिला. परत परत Thank you, Thank you म्हणून सांगितलं. लिनी गालातल्या गालात हसत उभी होती. अनंतानं तिला विचारलं–"का काय झालं हसायला ?"

तो कोट वरा दिसत होता. मोठा मजेशीर. आपण दोघेही मावलो असतो त्याच्यात ! – सांगावं का त्याला ! पण नकोच. म्हणेल–फार जादा बोलते ! आणि कुणाला माहित–नवऱ्याला असं बोलायचं असतं का ?

लिनी हसायची बंद झाली. अनंताला वाईट वाटलं. तो म्हणाला, "काय आम्हाला नाही का सांगायचं !"

सांगू का, पण नकोच !

हमाल विचारत होता–सामान कुठं न्यायचं.

"जवळपास एखादं चांगलं हॉटेल आहे का ?"

"चला ना, दाखवतो !"

मुंबईसारखे येथले हमाल ओझं डोक्या-वर घेत नाहीत. एका मोठ्या टोपलीत भरतात आणि टोपली पाठीवर घेतात. दोरीनं ती अडकवून टाकतात.

टॅक्सी स्टॅंडजवळच्या पायऱ्या चढून ती दोघं हमालाबरोबर रस्त्यावर आली. आणि लिनी एकदम ओरडली–

"अहो ते पहा, ते पहा–!"

दचकून अनंता पाहू लागला. त्याला कुठं काही दिसेना !

"अहो तो पोलीस !"

केवढ्यांदा म्हणाली लिनी ! तो पोलिस देखील त्यांच्याकडे पाहू लागला. समोरून येणारी गाडी थांबली आणि पोलिसाचं लक्ष वेधण्यासाठी ड्रायव्हर हॉर्न वाजवू लागला.

पोलिसानं काळ्या रंगाचा वुलनचा गणवेश घातलेला होता. डोक्यावर छोटीशी वाटोळी टोपी हनुवटीभोवती तिचा पट्टा लावून घट्ट बसवली होती.

"काय झालं ?"

"काही नाही !"

"मग तो पोलिस काय दाखवत होतीस."






"हमाल पुढं गेला. चला ना–!"

दोघं झपाझप चालू लागली. हमाला-जवळ आल्यावर त्यानं परत विचारलं–

"काय झालं ?"

"कुठं काय ?"

"सांगणार आहेस का ?"

लिनी खाली मान घालून अद्याप आतून येणारं हसू आवरत होती. अनंतानं तिचा एकदम हात धरला.

"अहो हे काय ?"

"मग सांग–!"

"सांगते–पण प्रथम हात सोडा !"

कठीणच बाई हा माणूस ! लिनीनं हात सोडवून घेतला.

"हं सांग !"

"आमच्या पुस्तकात एक धडा होता. राजा माकडाची टोपी काढून घेतो. माकड चिडवतं राजा भिकारी–! राजा टोपी परत देतो."

"बरं मग?"

"त्या धड्यावरोबर एक चित्र होतं. माकड टोपी घालून बसलंय् असं !"

"हो हो मला आठवतंय !"

"त्यातल्या माकडाच्या डोक्यावर टोपी दाखवलीय ना तसली टोपी त्या शिपायानं घातली होती–!"

"करेक्ट, करेक्ट, अगदी बरोबर–!"

अनंता एकदम मोठ्यांदा हसू लागला. लिनी हसू लागली. हसता हसता अनंतानं एकदम तिच्या पाठीवर थाप मारली–

"Very good observation."

पण म्हणून काय रस्त्यात पाठीवर थाप मारायची ! लिनी एकदम हसायची थांबली. अनंताला पत्ताच नव्हता.

हमाल थांबला. हॉटेलवर पाटी होती–हॉटेल शालिमार !

अनंता म्हणाला, "चांगली जागा आहे. स्टँडही जवळच आहे चला !"

हमाल बाहेरच थांबला.

मॅनेजरनं सांगितलं, "माफ करा, जागा खाली नाही. सीझन आहे. अगोदर रिझर्व्ह करायला हवं होतं तुम्ही !"

अनंता बेफिकीर होता. हे नाही तर ते !"

शालिमारनंतर सनराईझ झालं, पार्कव्ह्यू झालं. त्या आसपासची सगळी हॉटेलं हिंडून झाली. उत्तर एकच–सीझन आहे. जागा नाही.

म्हातारा शेर्पा हमाल घामेजून गेला पण त्याच्या चेहऱ्यावरचं हास्य कायम होतं. हे त्या दार्जिलिंगच्या लोकांचं वैशिष्ट्य–! पाऊस, वारा, थंडी काही असो. ह्यांच्या चेहऱ्यावरचं हास्य कायम! हेच आपण शिकायला हवं. होऊन होऊन काय होणार आहे, जागा मिळायची नाही एवढंच ना ! आकाश तर कोसळत नाही–इति अनंता !

ते आणि कोसळायचं काय राहिलंय् ? चालून चालून पायाचे तुकडे पडायची वेळ आली. पोटात कावळे कोकलताहेत. कसं लक्षात येत नाही ह्या माणसाच्या ! स्वतः मात्र तीन प्लेट चीज का कसले पकौडे खाल्लेत. मला चालवतो आहे !





अनुक्रमणिका

लिनीला वाटलं आता आपल्याला रडू कोसळणार!

"साहेब जरा दूर आहे. पण एका हॉटेलात नक्की जागा मिळेल!"

"अरे एवढ्या वेळात पृथ्वीप्रदक्षणा झाली. दूर तर दूर–! मुंबईएवढं दूर तर नाही ना, चल!"

"पण साहेब महाग आहे हॉटेल!"

"असू दे! चल."

चल काय? महाग असेल तर कुठले पैसे द्यायचे! इथं ह्या हॉटेलात जागा नाही. तिथं जागा असली तर पैसे नाहीत. म्हणजे परत पायपीट. मी रस्त्यात बसेन आता.

"काय रे इथं पहाण्याजोगं काय काय आहे?"

स्वारीनं आता माझा नाद सोडला. हमालाबरोबर गप्पा चालल्यात!

"माल–"

"माल म्हणजे काय?"

"साहेब रस्ता आहे. सगळी माणसं संध्याकाळी फिरायला तिकडे जातात."

"जाऊ देत."

"गव्हर्नरचं घर, टायगर हिल."

"तिथं काय आहे?"

"कांचनगंगा दिसते साहेब तिथून. पण सूर्य उगवताना तिथं पोहोचायला हवं. सहा मल चालायला लागतं!"

"आणि काय?"

"चहाच्या बागा आहेत. झू आहे, रेस-कोर्स, ती माऊंटेनिअरिंगची शाळा आहे."

ते हॉटेल आजच्या दिवसात येणार आहे का? मी बसते ह्या बाकावर.

"अरे तुझं हॉटेल येतंय् की नाही? बाई आता रस्त्यातच बैठक मारतील."

मनकवडे आहेत. बोलायची चोरी सम-जत होते मी. तर आता मनात विचार यायचीही सोय नाही राहिली! आणि वर हसताहेत!

हॉटेल पॅरडाईझ–! सुरेख नाव आहे. जागा तेवढी मिळू दे!

—दोघं पायऱ्या चढून वर आली.

आजवर पाहिली हॉटेल्स् त्यापेक्षा भारीच दिसत होतं हे हॉटेल.

परवडणार आहे का आपल्याला?

"आईए आईए बैठिए!"

मृणालनं तेवढा शब्द ऐकताच खुर्चीवर बैठक मारली.

टेबलामागं एक ऐसपैस गृहस्थ बसला होता. वय पन्नाशीचं! केस सफेद झालेले. झुबकेबाज मिशा. एवढ्या थंडीतही फक्त नेहरूकुडता घातलेला!

"बोलिए साहब क्या कर सकता हूँ आपके लिए?"

जागा, जागा तेवढी दे. बाकी काही नको. अगदी डोंगराएवढे उपकार होतील बघ!

अनंतानं त्याला जागेबद्दल विचारलं!

सगळी आशा लिनीच्या कानात एक-वटली.

"नही साब. जगह खाली नही हैं!"

संपलं! संपलं! लिनीला उठावसं वाटेना. पायातली शक्तीच संपली.

"यहाँ टूरिस्ट ऑफिस है?"

"है साब, लेकिन वहाँ जाना बेकार है. अगर आपने पहिले नही लिखा होगा तो वह भी जगह नही दे सकेंगे!"

अनंतानं एक मिनीट विचार केला. लिनीकडे वळून तो म्हणाला.

"चल जाऊ या!"

"क्यूं बिटिया पानी चाहिए" मालकानं विचारलं.

अं हो; लिनीची मान हालली.

पाणी येईतो तेवढंच बसायला तरी मिळेल.

दोन ग्लास पाणी आलं! दोघं आधाशा-सारखं घटाघटा प्यायली.

हमाल विचारतो आहे, "काय झालं?"

"कुछ नही. जगह नही है!"

कुछ नही कसलं सगळंच नाही.

"अब कहाँ साब."

"जहाँसे आए वहाँ–टॅक्सी स्टॅण्ड!"

मेले आता! परत एवढं चालायचं!

उगीच आलो दार्जिलिंगला. त्यापेक्षा कोल्हा-पूरला गेलो असतो–तेथून गणपतीपुळ्याला. चेष्टा करत होता ना देवाची! अशी अद्दल घडते. पण देवा त्यांच्याबरोबर मला का ही शिक्षा?

अनंता लिनीजवळ आला.

"थकलीस ना! पाय दुखायला लागले, होय ना!"

काय सांगायचं?

"लाजू नकोस हं. सांग मला, रात्री चेपून देईन!"

आताच वरं वाटायला लागलं मला. ह्या तुमच्या शब्दांनी थकवा गेला माझा. समजतंय् ना तुम्हाला. शब्दात कसं सांगू?

लिनी अनंताकडे पाहून हसली.

"That's good! असं माणसानं हसत राहिलं पाहिजे. सगळी संकटं आपोआप दूर होतात.

हे पहा मी सगळा प्लॅन ठरवला आहे. खूप मजा करू आपण?"

आता आणखीन कसला प्लॅन ठरवला ह्यांनी! ह्यातून सुटका झाली की पुरे! सरळ मुंबईला परतू!

"पण हे पहा अगोदर आपण खाऊन घेऊ! पोटात कावळे कोकलताहेत ना!"

मनातलं बोललात!

"मी काय तीन प्लेट पकौडे खाल्लेत! आता ते केव्हाच पचून गेलेत म्हणा; पण तुला फार भूक लागली आहे–खरं ना!"

मघाशी मी ह्यांनी खाल्लेले पकौडे काढले–मनातल्या मनात; तेही समजलं वाटतं ह्यांना!

"आपण छान छान काही तरी खाऊ. तुझ्या आवडीचं, गरम गरम. मग चहा घेऊ. तू ताजीतवानी होशील. मग पुढचा बेत ठरवू!"

टॅक्सी स्टॅण्ड आला की! मघाशी केवढा लांब वाटला होता. आता बोलता बोलता केव्हा रस्ता संपला कळलंच नाही. खरंच ह्या माणसाबरोबर कितीही लांबचा प्रवास करायला मजा येईल. थकतच नाही हा, आणि दुसऱ्यालाही थकू देत नाही!






अनुक्रमणिका








अनंता एकदम थांबला, "ओ हो–वंडर-फुल–! ते पहा!"

हे वंडरफुल काय आहे?

लिनी पाहू लागली. रस्त्याच्या डाव्या बाजूला हॉटेलवर पाटी होती–

"श्री साईनाथ मद्रास कॅफे"

"वडा डोसा खायचा आहे!"

लिनीनं मान हालवली. वडा डोसाच काय, आता काहीही चालेल!

हमालाला सामानाजवळ थांबवून दोघं आत गेली. हॉटेल नवीनच दिसत होतं. टेबल खुर्च्या अद्याप स्वच्छ होत्या.

"डोसा मिलेगा?"

"मिलेगा, लेकिन देर लगेगी!"

"लगने दो. दो मसाला दोसा.

वह तैय्यार होता है तब तक दो प्लेट इडली, दो प्लेट वडा, दो प्लेट उपमा..."

पुरे पुरे, हे काय त्या बोर्डावर लिहिलेले सगळेच जिन्नस मागवणार आहेत का?

बॉय ऑर्डर घेऊन निघून गेला.

"वरं का लिनी, मी राष्ट्रपती असतो तर ह्या सगळ्या उडप्यांना एकेक रौप्य-पदक दिलं असतं–राष्ट्रीय एकात्मता साहाय्यावद्दल! दार्जिलिंगमध्ये वडा-सांबार–बस्–ह्या उडप्याला आपण कॉंग्रेच्युलेशन्स् दिले पाहिजेत!"

अनंतानं मागवलेले पदार्थ यायला सुरु-वात झाली. दोघे तुटून पडले. येईल त्या जिन्नसांचा फडशा पडत होता. स्वतःच्या आहाराचं लिनीलाच आश्चर्य वाटत होतं. पदार्थ स्वादिष्ट होते. गरम होते. पोटात अग्नी पेटलेला होता. एकेक आहुतीबरोबर तो शांत होत चालला.

शेवटी चहा आला. गरम वाफाळलेला!

चहा घेत असताना अनंतानं विचारलं–

"तू ताजमहाल पाहिलायस्?"

"नाही! का?"

"आपण आग्र्याला जाऊ."

"कुठं?"

"ताजमहाल कुठं आहे, आग्र्याला! प्रेमाचं प्रतीक आहे म्हणे ते! पाहून घेऊ! आज रात्रीची गाडी पकडू!"

—चहाचा घोट लिनीच्या घशात अड-कला. घास घशात अडकतात, पण चहा-देखील अडकू शकतो हे लिनीला प्रथमच समजलं.

* *

## [५]

अनंत केशव ह्यांचा आग्र्याला जाण्याचा बेत अफलातून विलक्षण असला तरी त्या-मागे त्याची स्वतःची तर्कशुद्ध कारणमीमांसा होती. आणि ती इतरांना पटो अथवा न पटो, ती खोडून काढणं तितकंच कठीण होतं.

दार्जिलिंगमध्ये रहाता येत नाही हे आता नक्की झालं आहे. सरळ मुंबईला परत जाण्याऐवजी लखनौला उतरू. तेथून आग्रा केवळ काही तासांचा प्रवास! म्हणजे तसा फारसा जादा खर्च करायचंही कारण नाही. नाहीतरी मुंबईहून केवळ ताज पहाण्यासाठी एवढ्या दूरवर येणं थोडंच शक्य होणार आहे?

अनंतानं लिनी नको नको म्हणत असता चहाचा आणखीन एकेक कप मागवला.

"आग्र्याला खूप उन्हाळा असेल हे मान्य! पण म्हणूनच तेथे सहज जागा मिळेल. तिकडचे लोक, टूरिस्ट सगळे उन्हाळ्यात हिल स्टेशन्सना जातात. म्हणून तर आपली ही स्थिती!

एखाद्या साध्या हॉटेलात आपण एक छोटीशी स्वतंत्र खोली घेऊ. खिडक्यांना वाळ्याचे पडदे लावून टाकू. मी त्यावर तासातासानं पाणी मारेन. खोली थंडगार होईल. दुपार आणि रात्र आपल्याला बाहेर उन्हाळा आहे ह्याचा पत्ताही लागायचा नाही. सकाळी लवकर उठून आपण बाहेर पडू. सिकंदरा, लाल किल्ला, शिवाजी महा-राजांना अटकेत ठेवलं होतं ती जागा, इत्मतदौल्ला पाहू. दयाळबागेत सुरेख काम चाललं आहे. पूर्ण झाल्यावर ती ताजइतकीच सुंदर होईल, म्हणतात. ती पाहू. संध्याकाळी, उशीरा, चंद्र वर आला की ताजमहाल पहायला जाऊ. चांदण्यात न्हाऊन निघा-लेला ताज़ मनाची तृप्ती होईपर्यंत पहात बसू..."

.....हा माणूस बोलतो तेव्हा वाटतं की साऱ्या विश्वाची राणी मीच आहे. माझा नुसता शब्द निघायचा अवकाश, हा आकाशीचा चंद्र आणून हाती देईल. शब्दाशब्दाबरोबर एक अद्‌भुत, स्वप्नमय जादूची सृष्टी हा निर्माण करत जातो. ह्यात स्वतःला हरवून जायला होतं.

"येशील तू आग्र्याला...!"

येईन रे बाबा येईन. आग्र्यालाच काय अगदी सहारा वाळवंटात नेलेस तरी मी तुझ्याबरोबर येईन. पण तू असं बोलत रहायला हवंस्. बोलायचा थांबलास ना तर तो ताजदेखील एक रुक्ष, शुष्क निर्जीव देह पुरलेलं थडगं होईल.

"ए कुठल्या तंद्रीत हरवली आहेस? चहा निवून चाललाय्."

लिनीनं दुसरा चहाचा कप उचलला, ओठाला लावला.

"साखर वरोबर आहे ना! आणखीन हवी का तुला?"

अगदी स्वतःच चहा करून आणल्याजोगं विचारतायत!

"मग जाऊया आग्र्याला!"

मी तर केव्हाच पोहोचले तिथं. तुझ्या-बरोबर ताजमहाल पहात होते आता–चांदण्यात न्हाऊन निघालेला.

लिनीनं होकारार्थी मान हालवली.

अनंता आनंदला.

दोघे उठले. अनंतानं काऊंटरवरच्या माणसाकडे बिल आणि पैसे दिले.

माणूस हसला, शुद्ध मराठीत म्हणाला, "बस फक्त पैसेच दिलेत. मला वाटलं तुम्ही मला रौप्यपदक देताय राष्ट्रीय एका-त्मतेच्या कार्याबद्दल?"

अनंता, लिनी दोघे गार झाले. ह्या पर-मुलखात मराठी जाणणारा कोणी भेटेल ह्याची कल्पनाच नव्हती. ह्यानं काय सगळं आपलं बोलणं ऐकलं?

तरी बरं मी निव्वळ मानेनं होकार दिला. सगळं हेच बोलत होते. हॉटेलवालाच सांगू लागला, "मुंबईला बरीच वर्षं होतो मी! तुम्हीही मुंबईचेच ना!"

"हो!"

"कुठं उतरलाय्?"

"तीच अडचण झालीय्. कुठंही जागा मिळत नाही!"

"सीझनमध्ये हीच अडचण असते.

अद्याप मलाही जागा मिळालेली नाही. ही सहा पोरं, आचारी आणि मी, आम्ही





सगळेच इथं हॉटेलातच झोपतो. टेबलाला टेबल जोडून! रात्री अंगावर उंदीर उड्या मारतात. इलाज नाही?"

"जाऊ दे. तुम्ही काळजी करू नका! आम्ही प्रश्न सोडवून टाकलाय्!" अनंता हसत म्हणाला.

"तुम्हाला काँग्रॅच्युलेशन्स् द्यायला हवेत. म्हैसूर ते मुंबई, मुंबई ते दार्जिलिंग! वाः गटस् आहेत."

हॉटेलवाला हसला.

"तुम्ही गैरसमज करून घेणार नसला तर एक सूचना करू काय?" अनंता म्हणाला.

"बोला ना!"

"मघाशी डोसा खाल्ला. फर्स्ट क्लास. ह्या हवेतही कडक, कुरकुरीत! ह्या डोशामध्ये बटाटयाच्या भाजीऐवजी खिमा भरा. एक नवीन डिश. हे बंगाली, पंजाबी वेडे होतील पहा. नॉनव्हेज डोसा!"

हॉटेलवाल्याच्या चेहऱ्यावरचं हास्य वितळलं.

"ते ही एकदम पटायचं नाही तुम्हाला. सावकाश विचार करा. पहा!"

हॉटेल मालकानं दिलेली म्हैसूर सुपारीची पुडी घेऊन अनंता बाहेर पडला. लिनीला म्हणाला,

"गाडीला अद्याप चार तास अठ्ठावीस मिनिटं आहेत.

बोल तुला काय काय पहायचं आहे— माळ, गव्हर्नरचा बंगला, रेस कोर्स, बुद्ध मंदिर...."

हिय्या करून लिनीनं प्रथम तोंड उघडलं—

"शेर्पा तेनसिंग इथं रहातात ना?"

"ओ हो. वंडरफुल कल्पना! हात मिलाव!"

अनंतानं लिनीचा हात हातात घेतला.

"मला वाटलं कल्पना फक्त मलाच सुचतात. वाः तुलाही सुचतात तर. अगदी योग्य जोडीदारीण भेटलीस बघ—!"

अजून हात हातातच? काय हे; लग्न झालंय् म्हणून काय झालं? रस्ता आहे हा! सांगलीत असं हात धरून उभे राहिलो तर सरळ वर्तमानपत्रात छापून येईल— "नवऱ्यानं बायकोचा चक्क रस्त्यात हात धरला!"

लिनीनं हलकेच हात सोडवून घेतला. अनंताचं असलं वागणं पाहून तिनं तोंड उघडून काही सांगायचा घसकाच घेतला. नाहीतर बोलावं असं फार मनात येत होतं.

अनंता म्हणाला, "आणखीन काही विचार आहे का मनात!"

बाप रे! म्हणजे ह्याला हेही समजलं काय? शुक्राचार्यांच्या पोटात कच जाऊन बसल्याचाच प्रकार दिसतोय!

"सांग, सांग!"

अनंतानं तिच्या खांद्यावर हात ठेवला.

"अहो, असं काय? हात काढा ना!"

"सांगतेस ना!"

"सांगते! पण हातबीत नाही धरायचा!"

"नाही धरत. सांग!"

बोलायची पाळी आली तशी लिनी गोंधळली. दार्जिलिंगमध्ये फार नाही एक रात्र काढावी, असं तिच्या मनात फार होतं.

पण सांगायचं कसं तुमच्या कुशीत शिरून मला इथं एक रात्र झोपू द्या!

अडखळत लिनी म्हणाली, "आपण उद्या सकाळी निघूया येथून!"

"हात्तिच्या! उद्या सकाळी निघू! सकाळी सहा वीसला पहिली गाडी आहे, तिनं निघू!"

देवाजवळ वर मागावा, "माझी एवढी झोळी सोन्याच्या दाण्यांनी भरून दे!" आणि देवानं म्हणावं, "बस् एवढंच. मागून मागून हेच मागितलंस?"

तशा भाषेत हा माणूस बोलतो. काहीच कसं त्याला अशक्य वाटत नाही.

"पण रात्री रहायचं कुठं?"

"पाहू, मिळेल जागा. आणि नाहीच मिळाली तर स्टेशनवरची वेटींगरूम आहे!

वेटींगरूममध्ये झोपायचं तर आज रात्रीच निघालेलं काय वाईट! अगदीच कसा हा असा?—लिनीही हिरमुसली.

मघाच्या ओळखीवर अनंतानं त्यांचं सामान उडप्याकडे ठेवलं आणि दोघे तेनसिंगना भेटायला निघाले.

हिमालयन मॉऊंटेनिअरींग इन्स्टीट्यूटच्या प्रवेशद्वारापाशीच एका मल्या मोठ्या भिंतीवर दोन गिर्यारोहक शिखरांवर चढत असल्याचं दृश्य आहे. त्यावर काळ्या अक्षरात लिहिलं आहे

May you climb from peak to peak.

पलिकडे मोठा चौक होता. त्या चौकाच्या डाव्या कोपऱ्याच्या खोलीच्या दरवाजावर पाटी होती.

तेनसिंग नॉर्के

डायरेक्टर ऑफ फील्ड ट्रेनिंग.

ह्या बंद दारापलिकडे शेर्पा तेनसिंग असतील. लिनीच्या डोळ्यासमोर न्यूजरीळमध्ये पाहिलेला त्यांचा हसरा चेहरा उभा राहिला. त्यांच्या भेटीच्या कल्पनेनं ती थरारून गेली.

आजुबाजूला कोणीच नव्हतं. अनंतानं दार वाजवलं, कानोसा घेतला, आतून उत्तर आलं नाही. तेव्हा त्यानं हालकेच दार ढकललं.

—खोली रिकामीच होती. दोघांचेही चेहरे उतरले.

शेजारच्या खोलीतुन गडबडीनं प्यून आला. अनंताला म्हणाला,

"क्या करता है?"

"तेनसिंगसाबको मिलना था!"

प्यूननं मान हालवली. काहीशा घुश्श्यात त्यानं सांगितलं, तेनसिंगसाहेब अद्याप आलेले नाहीत. आता इतका उशीर झाला आहे की येतील किंवा नाही हे सांगता येणार नाही.

अनंता शांतपणे म्हणाला, "ठीक आहे. येतील तेव्हा सांगा. तोवर आम्ही थांबतो!"

वेळ घालवण्यासाठी दोघं तेथल्या म्युझियममध्ये आले. छोटसंच म्युझियम. पण सुरेख लावलेलं. गिर्यारोहणाची माहिती, फोटो, छोटी छोटी मॉडेल्स्. साहित्य फार काय एक छोटासा तंबू जसा पर्वतावर उभा करतात तसा केलेला.

लिनी आणि अनंता दार्जिलिंग विसरले. निरनिराळ्या गिर्यारोहकांबरोबर वेगवेगळी शिखरं चढू लागले. त्या बर्फाळ, धोकेबाज, फसव्या आणि अद्‌भुत प्रवासाची थरारी अनुभवू लागले.

एका जागी गिर्यारोहकाचे कपडे चढवून एक शेर्पाचा पुतळा उभा केलेला! अगदी






खराखुरा शेर्पा वाटावा असा ! लिनी प्रथम फसलीच त्याला पाहून !

मल्या मोठ्या काचेच्या कपाटात शेर्पा तेनसिंगनी एव्हरेस्टवर चढताना वापरलेले कपडे आणि इतर साहित्य मांडून ठेवलेलं होतं. केवढं अवजड सामान हे ! हे घेऊन पर्वतावर चढायचं. पावलागणिक इथं सहनशक्तीची कसोटी लागते. जगातल्या सर्वात उंच शिखरावरून विश्वाचं दर्शन घ्यायचं ! कदाचित येथूनच धर्मराजानं स्वर्गावरोहण केलं असेल. त्यांच्या पावलांच्या खुणा सोडल्या तर ह्या भूमीला अद्याप मानवाचा स्पर्श झालेला नाही. धर्मराजानंतर तिथं पोहोचणारे केवळ आपणच— ! काय वाटत असेल त्यावेळी माणसाला ?

प्यूनने सांगितलं—तेनसिंग आलेत. पाचच मिनिटं थांबणार आहेत.

त्याच भारलेल्या मनःस्थितीत दोघे तेनसिंगच्या खोलीत पोहोचली. अभावितपणे दोघांनी तेनसिंगना नमस्कार केला. तेनसिंगनी पुढं केलेला हात दोन्ही हातांच्या ओंजळीत भक्तिभावानं पकडून अनंतानं हस्तांदोलन केलं.

तेनसिंग म्हणाले, "बसा— !"

अनंता बसला नाही. लिनीला काय करायचं समजेना !

"उभे का, बसा ना !" तेनसिंग इंग्लिशमध्ये बोलत होते. त्यात सफाई नव्हती; पण उच्चारावर ब्रिटीश भाषेची अस्पष्टशी छाप होती.

"आम्हाला उभेच राहू द्या. आदर व्यक्त करायची ही आमच्याकडची पद्धत आहे !" अनंता म्हणाला.

तेनसिंग हसले. प्रसन्न, मनमोकळं हास्य !

"मुंबईचे ?"

"होय !"

"किती मुक्काम आहे ?"

"आज रात्री जाऊ— !"

"काय काय पाहिलं !"

"आपल्याला पहातो आहोत. इतके दिवस सिनेमाच्या पडद्यावर, फोटोत पहात होतो. आज प्रत्यक्ष पाहिलं."

तेनसिंग फिरून हसले. म्हणाले,

"काही पहाण्याजोगं नाही.

मी काही मोठा माणूस नाही. तुमच्यांसारखाच, इथल्या अनेक शेर्पांच्या सारखाच एक !"

"——एव्हरेस्टवर चढलेला पुरुष भारतात दुसरा नाही !"

"त्यातही काही विशेष नाही. माणसाला जिद्द हवी. तो काहीही करू शकेल. कशाकरिता तरी वेडं होण्याची जिद्द !

मी एव्हरेस्टवर चढण्याचा तीन वेळा प्रयत्न केला. अयशस्वी झालो. पण ते एक वेडच होतं मला. वेडी माणसंच अशी वर पोहोचतात !"

लिनी, अनंता भारून गेलेले होते.

विषय बदलत तेनसिंगनं विचारलं, "कधी आलात दार्जिलिंगला ?"

"आजच ! दुपारी !"

"आणि आजच चाललात ?"

"जागा मिळेना ! पण आता दार्जिलिंगला येण्याचं सार्थक झालंय् ! आम्हाला परत जायला दुःख नाही !"

"जागा नाही म्हणून तुम्ही जाताय् ?"

अनंता बोलला नाही; पण लिनीनं मान हालवली.

तेनसिंगनी पॅड पुढं ओढलं. वेड्यावाकड्या अक्षरात दोन ओळी लिहिल्या आणि अनंतापुढं कागद करत सांगितलं——

"ही चिठ्ठी पॅरडाईझ हॉटेलच्या मालकांना द्या. ते व्यवस्था करतील !"

दोघांनाही बोलायचं सुचेना. नमस्कार करून ती बाहेर पडली.

* *

आज दुपारीच ही दोघे आपल्याला भेटून गेली आहेत ह्याचा दादाजींना पूर्ण विसर पडला होता. एक गोरापान गोबऱ्या गुलाबी गालाचा मुलगा त्यांना घरी चलण्याची घाई करत होता. त्याला थांबवत ते म्हणाले,

"नॉकॆसाहबको मैं ना कैसे कहूँ ? लेकिन हमारे यहाँ सच कहता हूँ, बिलकुल जगह नही है !"

"हॉटेलातच पाहिजे असं नाही, कुठंही चालेल ! रात्री पडण्यापुरती मिळाली तरी चालेल !"

"चलिए ना दादाजी"—मुलगा त्यांचा परत हात ओढू लागला.

"ठहरो बेटे" आणि दादाजी परत अनंताला म्हणाले,

"माफ किजिए, जगह खाली नही है !"

"दादाजी उनको रमेशभैयाकी जगह देदो नं खाली पडी है।"

गोबऱ्या गालाचा मुलगा म्हणाला.

निघालेले दादाजी थबकले. लिनी आणि अनंताला म्हणाले——

"एक जागा आहे. पहा आवडली तर !"

हॉटेलच्या एका बाजूस छोटीशी खोली होती. सगळीच लाकडी ! अरुंद ! एक छोटं टेबल, खुर्ची, काचेची मोठी खिडकी आणि एका बाजूस रेल्वेच्या डब्यासारखा रॅक ! खाली अडीच फुटाचा एक बर्थ आणि त्यावर तीन फुटावर दुसरा !

रात्री जेवणानंतर लिनी खालच्या त्या अरुंद बर्थवर पहुडली. अनंतानं विचारलं, "पाय दुखतात. दाबू— ?"

लिनी संकोचली. उठून बसत म्हणाली, 'नको !'

अनंता तिच्याजवळ आला. म्हणाला, "झोप. झोप. थकलीस ना !"

लिनीनं लहान मुलीसारखी मान हालवली. अनंतानं तिच्या केसावरून हालकेच हात फिरवला. लिनीच्या शरीराचा कणन् कण मोहरून उठला. त्या स्पर्शाबरोबर तिचं हालकं फुलकं रुईचं फुल झालं. जमिनीवरून पाय सुटले. ती तरंगू लागली.

अनंता वळला, त्यानं दिवा बंद केला आणि तो रॅकवर चढून वरच्या बिछान्यात झोपला.

हवेत थंडी वाढत होती. खिडकीबाहेर धुकं दाटलं होतं, अन् खोलीत अंधार !

लिनीच्या जिवाची लाही लाही झाली. ज्याकरिता ती एवढी आसुसली होती ती मिठी दूरच राहिली. तो स्पर्श हातात आल्यासारखा वाटला अन् दूर झाला. मग कशाला केला हा उपद्व्याप ! आलो कशाला इथं एवढ्या दूर ! निर्दय, दुष्ट . . .

(पान ६० वर)



# दहा लाखांची

## चित्रकथा आणि सत्यकथा

• गुन्हाअन्वेषण शाखेचे इन्स्पेक्टर सुरेश पेंडसे यांनी प्रिन्सेस स्ट्रीट पोलीस स्टेशनकडून आलेले कागद पुनः पुनः चाळून बघितले. फिर्याद वाचून बघितली. क्षणभर, आपण पोलीस अधिकारी आहोत याचा त्यांना विसर पडला. एखादा रहस्यमय चित्रपट पहावा आणि त्यातल्या धाडसी नायकाच्या (अथवा गुन्हेगाराच्या) अचाट कृत्याचे कौतुक स्तिमित नजरेनं करावं असा भाव त्यांच्या चेहऱ्यावर उमटला. त्यांना हसू आवरेना. 'दहा लाख...' ते स्वतःशीच पुटपुटले. त्यांना पुनः पुनः छापला जाणारा मराठी जोक आठवला. एक मराठी माणूस बँकेतल्या कारकुनाला विचारतो आहे—'एक लाख म्हणजे एकावर किती शून्य हो?' मनातल्या मनात त्यांनी डॉ. शर्माला धन्यवाद दिले...

मग लगेच ते मानावर आले. पेंडशांनी तावडतोब आपल्या सहकाऱ्यांकडे कामे वाटून दिली. पहिली गोष्ट म्हणजे त्यांनी सर्व बँकांना तातडीचे संदेश दिले. फिर्यादीने उल्लेखिलेल्या नोटांचे नंबर उपलब्ध होते. त्या नोटांपैकी एखादी नोट जरी त्या बँकेत आली तर पोलीसांकडे त्यांनी वर्दी द्यावी म्हणून. गुन्हेगार या नोटांची अदलाबदल करण्याची खूपच शक्यता होती. पेंडश्यांच्या बाजूला आणखी दोन गोष्टी महत्त्वाच्या होत्या. एक म्हणजे गुन्हेगार ज्ञात होता आणि त्याचा साथीदार मलकानी अटकेत होता.; दुसरी गोष्ट म्हणजे, गुन्हेगाराचे निवासस्थान माहीत होते. मलकानीला त्यांनी खूप छेडून बघितले; परंतु त्याला या व्यवहारातील पैशातून काहीच मिळालेले नव्हते. आपण शर्माचे कस्टोडियन म्हणून काम करीत होतो हीच रेकॉर्ड त्याने पुनः पुनः लावली. मलकानी हा एक इस्टेट एजंट होता. गरजू लोकांना फ्लॅटस् भाड्याने मिळवून देणे हा त्याचा धंदा. त्यावर त्याला कमिशन मिळे. वर्तमानपत्रात त्याच्या नेहेमी जाहिराती यायच्या. अशाच एका जाहिरातीवरून शर्माने त्याला गाठले होते. मलकानीच्या मध्यस्थीने शर्माला शेरमन् बिल्डिंग मधील फ्लॅट मिळाला होता. तो होता सीअॅट् टायर कंपनीच्या एका डायरेक्टरच्या पत्नीचा: ती इटलीला जाणार होती म्हणून काही काळापुरता तो तिला भाड्याने द्यावयाचा होता. मलकानीनेच हा व्यवहार जुळवून दिला होता. साडेचार हजार रुपये डिपॉझिट व तेराशेपन्नास रुपये मासिक कॉंपेंसेशन् (भाडे) असा करार झाला होता. तीस एप्रिल एकोणीसशे एकोणसत्तर रोजी फ्लॅटचा ताबा शर्माला देण्यात आला. शर्माने सगळे पैसे चुकते केले होते. पुढे काही दिवसांनंतर शर्माच्या सांगण्यावरून मलकानीनेच भायखळ्याला ससेक्स रोडवरील गुदाम मिळवून दिले होते. ते एका इन्कमटॅक्स ऑफीसरच्या बायकोच्या मालकीचे होते. त्याचे भाडे महिना

रु. ८४४ ठरले. हेही पैसे शर्माने चुकते केले होते. या दोन्ही व्यवहारात मलकानीला तीन हजार रुपये कमिशन मिळाले होते. मलकानीचा अशा तऱ्हेने शर्माला उत्तम उपयोग झाल्यामुळेच की काय, शर्माने त्याला ऑगस्ट महिन्यात कस्टोडियन म्हणून नेमले होते. कुलूप उघडून गिऱ्हाइकाला पिंपे दाखवायची एवढेच त्याचे काम. पेंडश्यांनी ही सर्व पिंपे ताब्यात घेतली होती व ती उघडून बघितली होती. प्रत्येक पिंपाच्या झाकणाखाली आणखीन् एक झाकण बेमालूमपणे बसवले होते. या दोन झाकणांच्या मध्ये जी पोकळी होती त्यामध्ये एक प्लॅस्टिकची पिशवी ठेवली होती. त्या पिशवीमध्ये जेमतेम शंभर-दोनशे ग्रॅम वजनाइतका रंग भरून ठेवला होता. वरच्या झाकणाला मधोमध एक भोक पाडलेले होते. त्या भोकातून आतल्या प्लॅस्टिकच्या पिशवीचा एक कोपरा बाहेर आणून सोडला होता. झाकण गच्च बसवले होते. व्यासला सॅंपल् देताना शर्माने ब्लेडच्या साहाय्याने प्लॅस्टिकच्या पिशवीचा वर आलेला भाग कापून त्यातून थोडीशी रंगाची पावडर सॅंपल् म्हणून दिली होती. त्याच पद्धतीने इतर अनेक पिंपांतील नमुने खुद्द व्यासने काढून घेतले होते. त्यामुळे प्रत्येक पिंपात रंग भरलेला आहे यात शंका येण्यासारखे काही नव्हते. मलकानीला आत काय आहे हे माहीत नव्हते. ( निदान असे तो सांगत होता ) व्यासने सर्व सॅंपल्स मलकानीच्या देखतच नेलेली होती. मलकानीने या दिलेल्या माहितीचा फारसा उपयोग नव्हता. त्याची कोठडीत रवानगी करून, पेंडसे यांनी शेरमन बिल्डिंगकडे कूच केले.

'शेरमन'च्या पहिल्या माळ्यावरील बारा नंबरच्या फ्लॅटला कुलूप होते. तेथे आसपास चौकशी करता डॉ. शर्माला कुणीच ओळखीत नसल्याचं दिसलं. तेथल्या लिफ्टमनलादेखील फारशी माहिती नव्हती; पण त्याच इमारतीत दुसऱ्या एका फ्लॅटमध्ये आयाचे काम करणाऱ्या सिसिल आणि जेसी या दोन तरुणींच्या-कडून मात्र काही महत्त्वाची बातमी मिळाली. त्या दोघींनीही शर्माच्या घरात काम केले होते. सोळा जूनपासून त्या कामाला लागल्या होत्या. सिसिलने मोठी गंमतीदार हकीकत सांगितली. शर्माने आपल्याला बायको व मुले असल्याचे तिला सांगितले होते. पण घरात तर कुणीच राहात नव्हते. शर्मा सबंध दिवस आतल्या खोलीत विजेच्या उपकरणांची तयारी करीत बसे. बायकामुले घरी नसलेल्या माणसाच्या घरी राहण्यास या दोन्ही मुली कां कू करू लागल्या. तेव्हा आपली बायकामुले पुण्याला आहेत व ती एक-दोन दिवसात येणार असल्याचे शर्माने त्यांना सांगितले. एक दिवस शर्मा एका तरुण बाईला—मेरीला—व अन्तोनीअम्मा नावाच्या वयस्क बाईला घेऊन आला. मेरी ही शर्माची बायको असावी अशी सिसिलची कल्पना झाली. मुले केव्हा येणार असे विचारता, मेरी 'दोन दिवसांनी' असे हसून उत्तर देई. तिला मुलेच नाहीत असे पुढे अन्तोनीअम्माकडून सिसिलला समजले. शर्माच्या घरी काम करताना हेमंत व्यास, रजनीमाई शहा वगैरे मंडळी येत असताना सिसिलने पाहिले होते. रंगाची भांडी सिसिलला घासावी लागत

**श्री. ना. व्यं. देशपांडे यांनी आपल्या विशिष्ट शैलीने वर्णन केलेली 'दहा लाखाची चित्रकथा' आपण फेब्रुवारीच्या अंकात वाचलीत. मुंबईतल्या साईनाथ इंडस्ट्रीजचे हेमंत यांना लफंग्या डॉक्टर शर्मा याने कसे हातोहात बनविले याची हकीगत आलेली आहे. त्यानंतर मुंबईच्या चतुर गुप्त पोलिसांनी डॉ. शर्मा याचा कौशल्याने कसा तपास केला वगैरेबाबतची सत्यकथा येथे उद्धृत केली आहे....**

असत. पुढे काही दिवसांनी लीना या नावाची मेरीची मैत्रिण किंवा बहीण ही देखील येऊन राहू लागली.

जुलै महिन्यात शर्माने रंगाची काही पिंपे विकत आणली होती. त्यातल्या रंगाची थोडी थोडी पावडर वेगवेगळ्या प्लॅस्टिकच्या पिशव्यांमध्ये भरण्याचे काम या सर्व मुलींनी केले होते. एकदा तर एक रंगाचे आख्खे पिंप चादरीमध्ये गुंडाळून जिन्यावरून गडगडत खाली नेताना सिसिलने पाहिले होते. पाच व सहा सप्टेंबरला शर्माने आतल्या खोलीत सुसज्ज केलेले यंत्र काढून टाकण्यास सुरवात केली. त्या कामी त्या चौघींनी मदत केली होती. विजेचे कनेक्शन तोडून टाकण्यात आले. रबरी नळ्या, काचेच्या नळ्या सुट्या केल्या. सारे काम पुरे करण्यास तब्बल दोन दिवस लागले. सहा सप्टेंबरला हे सर्व सामान चादरीमध्ये गुंडाळून शर्मा कोठे तरी निघून गेला. नंतर आपले इतर सामानही घेऊन आपण काही दिवसांसाठी बाहेर जात असल्याचे सांगून तो निघून गेला. आता घरात काही काम नसल्याने सिसिल व जेसी या दोघींनी आठ सप्टेंबर रोजी काम सोडले; पण त्याच इमारतीत त्यांना दुसरीकडे काम मिळाले. नऊ सप्टेंबर रोजी मात्र लीना व मेरी यांच्यासह शेरमन बिल्डिंगमधून बाहेर पडताना शर्माला सिसिलने पाहिले होते. शर्माच्या मोटारीत बसून ती सर्वजण कोठे तरी बाहेर गेली होती. दहा सप्टेंबरला हेमंत व्यास शर्माच्या घरी आल्याचे सिसिलने पाहिले होते. त्याच दिवशी संध्याकाळी पाच सव्वा पाच वाजता शर्मा, व्यास व आणखी चार-एक माणसे शेरमनमधून बाहेर जाताना सिसिलने पाहिली होती. ही मंडळी म्हणजे अर्थातच मलकानी, ठक्कर, मधुकर दाते हीच असली पाहिजेत यात शंका नव्हती.

सिसिलच्या जबानीवरून एक मजेदार तर्क संभवत होता की शर्मा हा नुसता पैशाचा लोभी नसून तरुण पोरींचाही भोक्ता आहे ! आता मेरी आणि लीना या दोन पोरींचा पत्ता शोधून काढणे प्राप्त होते. आणखीन एक धागा मिळण्यासारखा होता. तो म्हणजे WBG 7668 या मोटारीचा पत्ता काढण्याचा. पेंडश्यांनी याबाबतीत सर्व पोलीस स्टेशनांना सूचना देऊन ठेवल्या होत्या.

शर्माच्या एकंदर वागणुकीवरून तो सराईत गुन्हेगार असावा असा पेंडसे यांनी जो तर्क काढला होता तो काही अगदीच चुकीचा नव्हता. कारण गुन्हेगाराची छबी आहे तरी कशी हे पाहण्याच्या दृष्टीने सराईत गुन्हेगारांच्या फोटोचे आल्बम् त्यांनी फिर्यादीपुढे



कुलाब्यावरील गाव-गौळणींसमवेत त्यांचा लाडका कृष्ण-डॉ. शर्मा

सरकवले. ते चाळता चाळता फिर्यादी व्यासने एका फोटोवर बोट ठेवले. त्या शर्माच्या जोडीलाच एक स्वामीजींचा फोटोही लावला होता. डोक्यावर जटा वाढलेल्या. चेहेरा सुशोभित दिसेल अशी दाढी, अध्यात्मिक ज्ञानाची खोली वाढविणारा तो चष्मा! अहो आश्चर्यम्! हा शर्मा म्हणजेच एकेकाळचा स्वामी योगेश्वरानंद! मुक्ती मिळविण्यासाठी गुरु असावा तर हाच, अशी ती छबी होती. शर्माचा ऊर्फ योगेश्वरानंदाचा फोटो पोलीस आल्बममध्ये कसा? याच सी. आय्. डी. शाखेच्या सन १९६०-६१ साली नोंदलेल्या फसवणुकीच्या आरोपाच्या गुन्ह्याखाली या स्वामीजींना शिक्षा झाली होती. त्या केसच्या निमित्ताने नोंदला गेलेला, गुन्हेगाराचा पूर्ववृत्तांतही थोडाफार उपलब्ध होता. अहमदाबाद येथे पाच लाखाची फसवणूक केल्याबद्दल एक केस नोंदली गेली होती. त्यामुळे शर्माला जयपूर येथे अटक करण्यात आली होती. तेथे जेलमधून पळून जाण्याचा त्याने प्रयत्न केला होता. वगैरे वगैरे वृत्तांत पाहावयास मिळाला. ही हकीकत वाचताना 'माझा तर्क अगदी बरोबर निघाला!' असे पेंडश्यांच्या मनात आल्यावाचून राहिले नाही. 'स्वामी योगेश्वरानंद' या नावाच्या जोडीनेच आणखी दोन नावे उपलब्ध झाली. ती म्हणजे एस्. के. गुप्ता व विक्रमभानु गुप्ता! म्हणजेच डॉ. शर्मा यांची बिरुदावली वाढत चालली. डॉ. सुशीलचंद्र शर्मा एम्. एस्सी. पी. एच्. डी. ऊर्फ स्वामी योगेश्वरानंद ऊर्फ एस. के. गुप्ता ऊर्फ विक्रमभानु गुप्ता...!!

बारा सप्टेंबरला दादर पोलीस स्टेशनावरून बातमी आली की, WBG 7553 ही गाडी सापडली. सी. आय्. डी. चे अधिकारी तेथे त्वरेने धावून गेले. त्यांना वाटले आता सापडणार हा मुरटा! पण कसचे काय? दादरच्या बोरकरवाडीतील एका वाण्याच्या दुकानासमोर ही गाडी टाकून दिलेली दादर पोलीसांना आढळली होती. वाण्याने हकीकत सांगितली ती अशी की, दहा सप्टेंबर रोजी संध्याकाळी एक इसम या मोटारीतून आला व बोरकरवाडीत थांबला. त्याने लगलीच एक टॅक्सी बोलावली. मोटारीतून एक भले मोठे बंडल काढून त्याने टॅक्सीत टाकले आणि टॅक्सीतून तो निघून गेला. पोलिसांनी मोटारीची तपासणी केली. मोटारीच्या डिकीमध्ये दोन नंबर प्लेटस् मिळाल्या. त्यावर APD 8365 असे नंबर होते. यावरून काय प्रकार आहे हे ध्यानात यायला वेळ लागला नाही. आता नंबर WBG 7668 हा तरी खरा कसा मानायचा? पोलीस चक्रावून गेले. त्यांनी दोन्ही नंबर टिपून घेतले. गाडी ताब्यात घेऊन ते ऑफीसला परतले. शर्मा टॅक्सीतून निघून गेला होता म्हणून टॅक्सी युनियनकडे पोलीसांनी माहिती कळविली व त्यांनी सहकार्य देण्याची विनंती केली... पण छट्... पोलीस हात चोळत बसले.

अहमदाबादेत ज्या फसवणुकीच्या गुन्ह्याची नोंद केली होती त्या प्रकरणातील कागद तपासून पाहता, त्यावरील शर्मा हा MRZ 4417 नंबरची गाडी वापरीत होता अशी माहिती मिळाली. या गाडीचा शोध करता करता फ्रेंच ब्रिजवरील इंडो ट्रेडिंग कंपनीचे भागीदार प्रेमनाथ मेहरा यांच्याकडे तिचा पत्ता लागला. या कंपनीने फ्रेंच मोटार कंपनीकडून ती अँबॅसडर गाडी घेतलेली होती. तीच गाडी त्यांनी शर्मा याला १९६५ मध्ये १८,०८८ रुपयाला विकली होती. शर्माने आपले नाव सुशिलकुमार गुप्ता असे दिले होते. मोटारीच्या मालकीचे हस्तांतर होण्यासंबंधीचे सर्व कागदपत्र श्री. मेहरा यांनी सह्या वगैरे करून शर्माच्या स्वाधीन केले होते; पण त्याने मोटार रीतसर आपल्या नांवावर बदलून घेतलीच नाही. १९६७ पर्यंत मोटारीचा कर मेहरा यांच्या नांवेच भरत होता. १९६७ नंतर मात्र त्याने कर भरावयाचे बंद केले. कारण १९६७ मध्ये या गाडीला अपघात झाला. त्यानंतरच त्याने मोटारीला खोटचा नंबर प्लेटस् लावायला सुरवात केली. एथपर्यंतच्या तपासात WBG 7668 = MRZ 4417 हे समीकरण तेवढे पोलिसांना लाभले!

शर्माजवळ राहिलेल्या इतर दोन पोरींचा तलास लावणे एवढा एकच धागा पोलिसांजवळ आता शिल्लक राहिला होता. चौकशी करता करता एकदाचे त्या मेरीचे आईबाप कुलाब्याला सापडले. त्यांच्या चार मुलींपैकी एकीचे नांव राजमणी होते, दुसरीचे नांव रूथमेरी (म्हणजेच मेरी) होते. मेरी ही घरकामासाठी म्हणून शर्माकडे राहायला गेली ती अद्याप परत आलीच नव्हती. राजमणी ही ग्वाल्हेरला राहात असल्याचे समजल्यावरून ग्वाल्हेरकडे एका अधिकाऱ्याला पिटाळण्यात आले. मेरी व लीना या दोन मुलींचा पत्ता कदाचित तेथे

अनुक्रमणिका



वेष संन्याशाचा
नि कृती...?



मोटारचा सारथी?
नव्हे अट्टल दरोडेखोरांचा साथी



डॉ. शर्माचा आणखी
एक अवतार

लागला असता. मेरीच्या बापाकडे चौकशी करत असताना शर्माच्या आणखी एका निवासस्थानाचा पत्ता लागला. कारण मेरी सुरवातीस त्या बिल्डिंगमध्ये जात असे. त्यावेळी कुलाबा येथील सुनीता बिल्डिंगमधील फ्लॅटमध्ये आपल्या बायकोमुलांसह शर्मा राहात असे. पोलिसांनी सुनीता बिल्डिंगमध्ये चौकशी केली तेव्हा तो फ्लॅट बंद असल्याचे त्यांना आढळले. हा फ्लॅट नारायण गोकळदास चैनानी या एका व्यापाऱ्याच्या बायकोच्या नावावर होता. शर्माने तो अकरा महिन्यांच्या भाडेकराराने महिना चारशेसाठ रुपये भाड्याने घेतला होता. कराराची मुदत होती २४-१२-६८ ते २३-११-६९. ऑगस्ट १९६९ पर्यंतचे भाडे शर्माने भरलेले होते. सप्टेंबरचे भाडे भरलेले नसणार हे उघड होते!

ससेक्स रोडवरील गुदामाची मालकीण श्रीमती समापती यांची जबानी घेताना पोलिसांना आढळून आले की शर्माने युनायटेड कमर्शियल बँकेच्या कुलाबा शाखेमध्ये आपले खाते उघडले होते. पोलसांनी तावडतोब बँकेचे मॅनेजर मखिजानी यांना गाठले. त्यांच्याकडे चौकशी करता शर्माने त्या बँकेत एक नव्हे तर चार खाती उघडलेली आढळली. डिसेंबर १९६८ मध्ये ही खाती उघडली होती. पहिले खाते हे मेसर्स रामचंद्र आणि कंपनी, मॅन्युफॅक्चरर्स ऑफ ऑटोपार्टस्, घोडबंदर रोड, ठाणे या नाव-पत्त्यावर होते. दुसरे खाते (नं. २३४) हे मेसर्स टेक्स्टाईल्स अँड ट्रेड इंडिया, ट्रेडर्स ऑफ टेक्स्टाइल गुडस् अँड ऑटोपार्टस्, या नांवावर होते व पत्ता होता 'सुनीता' कुलावा. खाते नं. २३५ हे इलेक्ट्रिक इंजिनिअरिंग अँड कंपनी, मॅन्युफॅक्चरर्स ऑफ ऑटोपार्टस्, इलेक्ट्रिक कॉंपोनेंटस्, घोडबंदर रोड ठाणे या नाव-पत्त्यावर होते. चौथ्या खात्याचे (नंबर २३१) मालक मेसर्स मिश्रीलाल इंजिनिअरिंग कंपनी, ऑटो इंजिनिअर्स, मॅन्युफॅक्चरर्स अँड ऑटोपार्ट डीलर्स हे होते व या कंपनीचा पत्ता वागळे इस्टेट, ठाणे असा होता. खाते नं. २३४ चा पत्ता सोडला तर बाकीचे सारे पत्ते बनावट होते. या चारही खात्यांमधून २८०००, ३२००० यासारख्या रकमांचे ड्राफ्ट वटवले गेले होते. पण तपासाच्या वेळी मात्र चारही खात्यांची एकंदर रक्कम पाचसहाशे इतकी जेमतेम भरत होती. दहा सप्टेंबरला शर्माने मखिजानी यांस फोन केला होता तो मात्र खरा होता; पण तो हेमंत व्यास याला मूलमुलैय्या करण्यासाठी केला होता. मखिजानी यांनी त्याप्रमाणे दुपारी साडेचार पावणेपाचपर्यंत त्यादिवशी वाट पाहिली होती. शर्मा न आल्यामुळे बँक बंद करून ते निघून गेले होते.

ग्वाल्हेरला पाठविलेला अधिकारी काही हात हालवीत परत आला नाही. त्याने ग्वाल्हेरला राजमणीचा पत्ता शोधून काढला. तेथे रूथमेरी आणि लीना कार्डोझ् या दोन्ही पोरी राहात होत्या. त्या दोघींना घेऊन सब इन्स्पेक्टर सूर्यवंशी एकोणीस सप्टेंबरला ऑफिसमध्ये येऊन दाखल झाले.

मेरीच्या बापाने सांगितलेल्या हकीकतीप्रमाणे शर्मा हा 'सुनीता' बिल्डिंगमध्ये बायकोमुलांसह राहात असतानाच मेरी त्याच्याकडे कामाला लागली. मेरीने त्यापुढची हकीकत आपल्या जबानीत सांगितली. तिने व लीनाने, आपण दोघी ग्वाल्हेरपर्यंत कसे आलो याबद्दल सांगितलेली हकीकत मोठी विस्मयजनक आणि तशीच मनोरंजक होती. 'सुनीता' बिल्डिंगमध्ये मेरी कामाला लागली खरी; पण शर्माच्या पत्नीने तिला तिच्या वर्तनाबद्दल संशय येऊन कामावरून काढून टाकले. तिचा संशय देखील काही अनाठायी नव्हता. कारण तिला हाकून दिल्यानंतर देखील तिचे गुणी यजमान मेरीला फिरायला घेऊन जात, मजा करीत हिंडत. जून १९६९ मध्ये तर शर्माने तिला शेरमन बिल्डिंगमध्ये पुन्हा कामावर घेतले. आता शर्माच्या बायकोचा ससेमिरा नव्हता. तेव्हा कसलाच अडसर नव्हता. शर्माने मेरीला खरोखरच 'ठेवून' घेतली. मेरीच्या जोडीला तिची मैत्रिण 'लीना' ही देखील राहू लागली. अशा रीतीने 'शेरमन' बिल्डिंगमध्ये

अनुक्रमणिका

स्वामी योगेश्वरानंद, उर्फ एस. के. गुप्ता, उर्फ विक्रमभानू गुप्ता, उर्फ शिवनाथ जयस्वाल, उर्फ अरुणकुमार बसर, उर्फ डॉ. सुशीलचंद्र शर्मा इत्यादि अनेकानेक नावांनी वावरणारा हाच तो फरारी ठक

'गोकुळ' वाढले. मेरी आणि लीना या दोघींनीही हेमंत व्यास वगैरे मंडळी शेरमन बिल्डिंगमध्ये शर्माला भेटायला आलेली पाहिली होती. शर्माचे चाललेलें उद्योगही निरखले होते.

आठ सप्टेंबरला शर्माने शेरमन बिल्डिंगमधील सामान-सुमान बांधायला सुरुवात केली तेव्हा तर मेरीला आश्चर्यच वाटले. तिने 'हे सामान कुठं नेणार' असे विचारताच 'नंतर तुला सांगतो' असें त्यानें उत्तर दिले होते. त्याच दिवशी त्याने जेसी व सिसिल या दोन मुलींना रजा दिली. दुसऱ्या दिवशी म्हणजे नऊ सप्टेंबरला या दोन सुंदरींना घेऊन शर्मा मरीन लाइन्सवरील 'वेण्टले हॉटेल'-मध्ये एक रात्र राहिला. "घर असताना हॉटेलमध्ये कशाला राहावयाचे?" या त्या मुलींच्या प्रश्नाला 'घरी मोठमोठ्या व्यापारी मंडळींची मिटींग आहे म्हणून' हे शर्माचे मासलेवाईक उत्तर ! या हॉटेलमध्ये दोन दिवस राहा असे सांगून शर्मा सकाळीच निघून गेला; पण दहा सप्टेंबरला रात्री आठ वाजता तो पुनः आला आणि या दोघींना घेऊन विलेपार्ले येथील 'कृपानगर हौसिंग सोसायटी'च्या फ्लॅटमध्ये आला. आठ सप्टेंबरला शेरमन बिल्डिंगमध्ये बांधलेलें सामान येथे आणून टाकल्याचे मेरीला आढळले.

पोलिसांनी, मेरीच्या जबाबाचा पडताळा घेण्यासाठी वेण्टले हॉटेलला भेट दिली तेव्हा तिची हकीकत खरी असल्याचे आढळून आले. हॉटेल रजिस्टरमध्ये शर्माने आपला पत्ता काय दिला होता ठाऊक आहे ? '१६, एग्मोर हायवे, मद्रास'!

पार्ल्याच्या बिऱ्हाडात या तिघांचा जवळ जवळ आठवडा-भर मुक्काम होता. मुंबईचे सी. आय्. डी. पोलीस जेव्हा मुंबापुरीचे केस अक्षरशः विंचरून काढीत होते त्यावेळी स्वामी योगेश्वरा-नंदजी आपल्या शिष्यिणींसमवेत पार्लेकर बनून कालक्रमणा करीत होते. आणि खरोखरीच गीतेतील स्थितप्रज्ञासारखे श्री. शर्माजींचे वर्तन त्यावेळी चालले होते. शर्मा आपले व्यवहार रात्रीच करीत असे. रात्र पडून सर्वत्र काळोख पडला की अंधारामध्ये शर्मा भाजी वगैरे सामानसुमान आणण्यास बाहेर पडे. एकदा एका रात्री त्याने बाजारातून चार सूटकेसेस् विकत आणल्या. सूटकेसेस-मध्ये नोटांची बंडले भरून ठेवली असल्याचे मेरी व लीनाने पाहिले होते. पार्ल्याला असे दिवाभीतासारखे का राहायचे असा वारंवार मेरीला प्रश्न पडे. एकदा शर्माला तिने याबाबत विचा-रले देखील. त्याने लागलीच एक कथा रचून सांगितली : "हे बघ मेरी. माझ्याकडे रेखा नावाची एक मुलगी शेरमन बिल्डिंगमध्ये येत होती ना ? तिला हेमंत व्यास आणि अजित रामचंदानी यांनी ठोकून काढले आहे. तिने पोलिसात फिर्याद दिली आहे. पोलिसांनी हेमंत आणि अजित या दोघांना अटक केली आहे. रेखाचा आणि माझा संबंध असल्याने पोलिस माझ्या मार्गावर आहेत. म्हणून आपण अशा तऱ्हेने राहात आहोत. सातआठ दिवसात हे लफडे मिटेल. मग आपण पूर्वीसारखे राहू लागू." एके दिवशी शर्माने बाजारातून खाकी चड्डी, खाकी सदरा, खाकी टोपी खरेदी केली. त्याचप्रमाणे एक पांढरा झब्बा, पायजमा आणि गांधी टोपी विकत घेतली. कशासाठी, कुणास ठाऊक ?

या दिवाभीतासारख्या जगण्याला दोन्ही पोरी कंटाळून गेल्या. कारण शर्मा त्यांना कोठेही जाऊ देत नसे. सदैव आपल्या-भोवती खिळवून ठेवी. शेवटी सतरा सप्टेंबरला शर्मा आंघोळीला न्हाणीघरात गेला असता या दोन्ही पोरींनी आपापले चंबूगबाळे गोळा केले. कसलाही आवाज न करता त्यांनी तेथून पोबारा केला, बोरीबंदर गांठले आणि त्या सरळ ग्वाल्हेरीला रवाना झाल्या !
कृपासागर हौसिंग सोसायटीतला हा फ्लॅट श्री. दौलतराम सदारंगानी या एका सिंधी गृहस्थाच्या मालकीचा होता. तो भाड्याने द्यावयाचा होता. ऑगस्ट १९६९ मध्ये एका इस्टेट एजंटामार्फत श्री. शर्माजी याला भेटायला आले होते. पंधराशे रुपये डिपॉझिट व महिना पाचशे रुपये भाडे या करारावर शर्माने फ्लॅट २७–८–६९ पासून ताब्यात घेतला. एक महिन्याचे भाडे व डिपॉझिट शर्माने भरले. सदारंगानी यांच्या जबाबा-प्रमाणे त्यांनी हा फ्लॅट श्री. शशिकांत महेश्वर, प्रोप्रायटर आनंद टेक्स्टाइल्स, डिलाईड रोड, मुंबई यांना दिला होता ! ताबा घेतला तरी हे श्रीयुत महेश्वर राहायला आले नाहीत म्हणून एकदा सदारंगानी डिलाईड रोड धुंडून आले. डिलाईड रोड बिचारा जागे-वरच होता! आनंद टेक्स्टाइल्स आणि महेश्वर यांचा पत्ता नव्हता. पोलिसांनी शर्माचा फोटो दाखवताच सदारंगानी उद्‌गारले "अरेच्या! हाच तो शशिकांत महेश्वर !" नवरात्रात घरावर दररोज एक माळ चढते त्याप्रमाणे शर्माच्या घटावर या नव्या नावाची आणखी एक माळ चढली !

कृपासागर हौसिंग सोसायटीच्या फ्लॅटचे दार जबरदस्तीने उघडून पोलिसांनी झडती घेतली. तेथे त्यांना असंख्य कागदाचे कपटे, विजेचे सामान, काचेच्या व रबराच्या नळया, काचेची भांडी, स्विचेस्, प्लगस्, स्क्रू, नटबोल्टस् वगैरे सामान मिळाले. ते सर्व जप्त

करण्यात आले. एका खोलीत गणपतीची स्थापना त्याचे विसर्जन होण्यापूर्वीच शर्माला पलायन करण्याची प्रेरणा त्या बुद्धिदात्याने दिली असावी. या वस्तूंबरोबरच अनेक धार्मिक ग्रंथ आणि पदार्थ-विज्ञानशास्त्रावरील पुस्तकेही पोलिसांना मिळाली.

सप्टेंबरची वीस तारीख उजाडली. शर्माचा अजून पत्ता लागत नव्हता. चारी दिशांना गेलेले एकेक पोलिस अधिकारी आता परतू लागले. सूर्यवंशी यांनी एक धागा चांगला पकडला होता. शर्माची उर्फ नावे वरीच उपलब्ध झाली होती. आता शर्माचा फोटो प्रसिद्ध करणे आवश्यक होते. पेंडशांनी त्याची पण व्यवस्था केली. एव्हाना जयपूरला गेलेल्या सब-इन्स्पेक्टर वागळे यांनी एक छोटीशी पण महत्त्वाची कामगिरी बजावली होती. जयपूरमध्ये [illegible] अपघाताबाबत (निष्काळजीपणे व बेदरकारपणे गाडी हाकल्याबद्दल) व कैदेतून पळून जाण्याचा प्रयत्न केल्याबद्दल शर्मावर खटला भरण्यात आला होता. शर्माची जामीनावर सुटका झाली होती. शर्माची सासू त्यावेळी जामीन राहिली होती. सासूचे नाव होते पद्माराणी. ती नवी दिल्लीमध्ये सरोजिनी नगर येथे राहात असे.

कुलाब्याच्या 'सुनीता' बिल्डिंगमधील फ्लॅटची झडती घेताना पोलिसांना तारेची एक पावती मिळालेली होती. त्या पावतीच्या अनुरोधाने त्यांनी तारखात्याच्या कलकत्त्याच्या मुख्य कार्यालयातून मूळ तार मागवून घेतली होती. ती तार शर्माने दिल्लीच्या पत्त्यावर केली होती. तो पत्ता आणि त्याच्या सासूचा पत्ता एकच होता. तार पाठविणाऱ्याचे नाव होते:'शिवनाथ जयस्वाल C/o.एस्. सी. शर्मा, सन्. अँड सँड्. मुंबई.' तारेत पुढील मजकूर होता : "Reaching Delhi at 6.45 p.m. on 16-6-69 by flight No. 406. Send somebody else to Palam Air Port." दिल्लीत ठाण मांडून बसलेल्या सब इन्स्पेक्टर कुळकर्णी यांना हा पत्ता कळविण्यात आला व दिल्लीत तपास करण्यास सांगितले.

शर्माबद्दल जेवढी माहिती मिळविता येईल तेवढी मिळविण्याची पोलिस पराकाष्ठा करीत होते. शर्माच्या पत्नीचाही तपास लागला. उत्तर हिंदुस्थानात 'सेमला' या खेडेगावात ती राहात होती. तिचे एक चुलते मनमोहन सूदन हे हिस्सार येथे प्रासिक्यूटिंग इन्स्पेक्टर म्हणून काम करीत होते. त्यांच्याकडून व खुद्द शर्माची बायको झनक हिच्याकडून पोलिसांना बरीच माहिती मिळाली. शर्माच्या सासू व सासऱ्याने १९६४ मध्ये नवी दिल्ली येथे एक 'डान्सिंग स्कूल' चालविले होते. एक दिवस श्रीयुत जयस्वाल तेथे येऊन टपकले. आपण इंजिनिअर असून अमेरिकेत राहून आलो आहोत, आपले आईवडील अमेरिकेत असतात वगैरे बाता त्याने नेहमीप्रमाणे झोकल्या. श्रीयुत जयस्वाल डान्सिंग स्कूलमध्ये जाऊ लागले. अर्थातच श्री. सूदन यांच्या मुलीबरोबर त्यांची दोस्ती होणे साहजिक होते. स्नेहाची परिणती प्रणयात आणि प्रणयाची परिणती परिणयात या क्रमानुसार श्री. जयस्वाल एकदाचे चतुर्भुज झाले!

दिल्लीतील वास्तव्य संपवून शर्माजी झनक हिच्यासह मुंबईस राहाण्यास आले. पहिले काही दिवस मरीन ड्राइव्हवरील हॉटेल नटराजमध्ये राहिले. त्यानंतर त्याने झनकला माहेरी पाठविली. तिला आता एक मुलगा झाला होता. एप्रिल १९६६ मध्ये शर्माने तिला पुनः मुंबईस आणले. शर्माने यावेळी बिऱ्हाड बदलले. नटराज हॉटेलजवळील 'स्नेहसदन'मध्ये राहू लागला. त्यानंतर, खारला झनक हिची एक नातेवाईक श्रीमती इंदिरा गोस्वामी राहात असे, तिच्या बिऱ्हाडी काही दिवस शर्माने तळ दिला. नंतर अहमदाबादला प्रयाण केले. तेथे एस्. के. गुप्ता या नावाने राहू लागला. त्याच मुक्कामात अहमदाबादच्या एका व्यापाऱ्याला ठकविले. मग तेथून जयपूरास प्रयाण. तेथे अटक व पलायन. त्यानंतर झनक पुनः दिल्लीस व त्यानंतर सेमल्यास जाऊन राहिली. यजमान अधून मधून भेटत होतेच. डिसेंबर १९६८ मध्ये शर्माने तिला पुनः मुंबईला आणले त्यावेळी ते कुलाब्याच्या 'सुनीता' बिल्डिंगमध्ये राहात होते. आता शिवनाथ जयस्वाल किंवा एस्. के. गुप्ता हे अवतार लोप पावले. डॉ. सुशीलचंद्र शर्मा हा नवाच अवतार प्रगट झाला. 'तुम्ही आपली नावे सारखी का बदलता ?' असे तिनं विचारताच 'बिझिनेससाठी असं करावं लागतं' अशी मूलथाप देऊन त्यानं तिला गप्प बसवलं होतं. सुनीता बिल्डिंगमध्ये असता झनक पुनः गरोदर राहिली होती. त्यावेळी मेरी घरकामासाठी म्हणून कामाला लागली होती. तिच्याबरोबर आपला नवरा मजा करीत असल्याचे झनकने एकदा पाहिले. तेव्हा मेरीला तिने कामावरून काढून टाकले. पुढे, शेरमन् बिल्डिंगमध्ये एक नवा फ्लॅट घेतल्याचे तिला समजले. तिने पुनः नवऱ्याला छेडण्यास सुरवात केली. आता हिची रवानगी माहेरी केलीच पाहिजे असे शर्माने ठरविले असावे. कारण तिला न विचारता सवरताच त्याने १६-६-६९ रोजी दिल्लीचे विमानाचे तिकीट काढले व तिची बोळवण केली. वर उल्लेखिलेली तार झनकच्या विमानोड्डाणासंबंधीच होती!






सप्टेंबर महिना संपत आला. शर्मा अद्याप पोलिसांना चकवीत होता. त्याच्याबद्दल पुष्कळ माहिती मिळाली होती. त्याच्या पूर्वीच्या हालचालीही कळल्या होत्या. परंतु एकाद्या भूलभुलैय्यात शिरल्यागत झालं होतं. तेथे फिरता येत होते; पण बाहेर पडता येत नव्हते. पेंडसे अगदी कातावून गेले होते. त्यांनी आपल्याकडून शिकस्त केली होती; पण अद्याप यश येत नव्हते. फ्री प्रेस बुलेटिनमध्ये व नंतर टाइम्स ऑफ इंडियामध्ये शर्माचे फोटो आता प्रसिद्ध झाले होते. या गळाला तरी कोठे मासा लागतो की काय याची ते वाट पाहात होते.

तीन ऑक्टोबरला मात्र इन्स्पेक्टर पेंडसे यांचे भाग्य फळफळले ! त्या दिवशी हरीश कुलकर्णी या नावाचा एक इसम सी. आय. डी. ऑफीसमध्ये येऊन ठाकला. शर्माचा फोटो वर्तमानपत्रात पाहून तो त्याची माहिती देण्यासाठी तेथे आला होता. ताडदेव येथील 'वेलार्ड व्ह्यू' या इमारतीत के. शांतीलाल आणि कंपनीचे मोटारीचे दुकान होते. या कंपनीचे एजंट म्हणून कुळकर्णी काम पाहात असत. तारीख सतरा सप्टेंबर रोजी दुपारी एक वाजता शर्मा हा एका टॅक्सीतून तेथे आला होता. एखादी मोटार विकावयाची आहे काय याची चौकशी त्याने केली. ज्या मोटारीचे सर्व कागदपत्र तयार आहेत अशीच मोटार त्यास पाहिजे होती. त्यावेळी दुकानात बऱ्याच मोटारी होत्या; पण फक्त एकाच मोटारीचे कागदपत्र तयार होते. ती शेव्हरोलेट एअरकंडिशण्ड कार होती. तिचा नंबर होता M R X 4888. कुळकर्ण्यांनी ही मोटार दाखविली. शर्माने तिची ट्रायल घेतली आणि मोटार पसंत केली. विक्रीची किंमत चाळीस हजार ठरली. फारशी घासाघीस न करता शर्माने शंभर शंभरच्या नोटा कुळकर्ण्यांच्या हातात ठेवल्या. मोटारीचे कागदपत्र ताब्यात घेतले. डिलिव्हरी चलनावर आपली सही केली आणि पत्ता लिहिला—"अरुणकुमार बसर, २१४२ वसंत विहार, घोडबंदर रोड, ठाणे." मोटार ताब्यात घेतल्यानंतर शर्माने टॅक्सीतून चारपाच सूटकेसेस बाहेर काढल्या व मोटारीत ठेवल्या. एवढी लगबग आणि घाई पाहून कोणत्याही विक्रेत्याला आश्चर्यच वाटले असते; पण त्याबद्दल प्रश्न विचारण्याची संधी न देताच अरुणकुमारने सांगितले, "मला फार घाई आहे. काय करायचं सांगा ? माझा एक नातेवाईक परदेशातून येणार आहे. बडी मोठी आसामी आहे. त्याचं लग्न ठरलेलं आहे. त्यालाही कार मला आहेर म्हणून द्यायची आहे. म्हणून ही लगीनघाई !" एवढं बोलून अरुणकुमार पसार झाला सुद्धा !

कुळकर्ण्यांकडून ही नवी आणि महत्त्वाची बातमी मिळताच पेंडसे यांनी पुनः नव्या जोमाने हालचाली सुरू केल्या. पुनः आपल्या हाताखालील हुशार अधिकाऱ्यांना चोहो दिशांना पिटाळलं. त्यांपैकी सब-इन्स्पेक्टर देशमुख हे मोटारच्या रस्त्याने दिल्लीकडे निघाले.

सहा ऑक्टोबरला सकाळी अकरा वाजता पेंडसे यांच्या टेबलावरचा फोन खणखणला. "गुड मॉर्निंग सर. मी सब-इन्स्पेक्टर देशमुख नाशिकहून बोलतोय."

"बोला. बोला..." पेंडशांचे कान अधिर झाले होते.

"व्हेरी गुड न्यूज सर." देशमुख बोलू लागले. "येथल्या एका पेट्रोलपंपावर १९ सप्टेंबर रोजी M R X 4888 ही गाडी पेट्रोलसाठी आली होती. सर. गाडी शर्माच चालवीत होता. शर्माचा फोटो पंपवाल्यानं ओळखलाय्. त्यामुळं शंकाच नको. त्याच्याबरोबर चार मुली होत्या. त्यांच्या एकंदर वर्णनावरून त्या प्रॉस असल्या पाहिजेत नक्की. ॲक्ट्रेस शशिकलेचा आपण ड्रायव्हर असल्याचे त्याने पंपवाल्याला सांगितले. आपण पिकनिकला जात आहोत असे तो म्हणाला. पंपवाल्याकडून त्याने गाडीचा बिघडलेला सायलेंसर दुरुस्त करून घेतला...."

फोनवरील संभाषण ऐकत असतानाच पेंडसे समोरच्या कागदाच्या तुकड्यावर टिपणे घेत होते. त्यांनी पंपवाल्याचे नाव, पत्ता वगैरे टिपून घेतला. फोन बंद झाला.

आतापर्यंत उपलब्ध झालेल्या हकीकतीवरून शर्माचा दुसरा 'नाद' कोणता होता हे पेंडश्यांच्या कधीच लक्षात आले होते. त्यामुळे त्या गाडीतील त्या नटारंगी मुली 'प्रॉस' असाव्यात, या देशमुखांच्या मताला त्यांच्या मनाने तावडतोब दुजोरा दिला. त्यांनी लगेच आपल्या काही सहकाऱ्यांना मुंबईमधील सर्व कुंटणखाने पालथे घालण्यासाठी हुकूम सोडले. संध्याकाळपर्यंत एका अधिकाऱ्याने कुलाब्यातील चार पोरी पेंडसे यांच्यासमोर आणून हजर केल्या. एकीचे नाव होते निम्मी, दुसरीचे भारती, तिसरीचे लता व चौथीचे राधा. त्यांचा गोपाळकृष्ण मात्र हरवला होता. पण त्याचा सी. आय. डी. ऑफिसमधील फोटो त्या सर्वांनी ओळखला. या चार वारयोषितांनी सांगितलेली हकीकत मनोरंजक तशीच गुलाबी होती. अठरा सप्टेंबरला रात्री अकरा वाजता शर्मा कुलाब्यात येऊन दाखल झाला. (आदल्या दिवशीच पार्ल्याच्या बिऱ्हाडातून मेरी व लीना यांनी पलायन केल्यामुळे तो स्त्रीसहवासाला वंचित झाला होता. पण त्याची त्याला काय फ़िकीर होती? जवळ पैशाची ऊब होती ना ? असल्या डझन लीना आणि मेरी मिळाल्या असत्या.) एका ठिकाणाहून या चौघीना गोळा केले. "चला माझ्याबरोबर दोन दिवस मजा करायला. मुंबईबाहेरही जायचंय् आपल्याला." शर्मानं फर्मावलं.

"पण शेठ, पैशाची बात....

"किती हवेत तुम्हाला ? ? दोन दिवसांसाठी प्रत्येकीला बाराशे रुपये देईन. आहात कबूल ? अगं पैशाची कशाला बात करता ? चला लौकर."

बाराशे रुपयांचा सौदा करणारं अवलिया गिऱ्हाईक या पोरींना प्रथमच भेटलं असावं. त्या कशाला कां कू करतील ? शिवाय दलालीचा मुदंड नाही. त्या लगेच मोटारीत जाऊन बसल्या.







अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

शर्मा त्यांना घेऊन जुहूच्या एका आलिशान हॉटेलात गेला. 'रात्र थोडी सोंगे फार' याचा अनुभव त्या रात्री शर्माला नक्की आला असणार! दुसऱ्या दिवशी सकाळी साडेदहाला त्याने सर्वांना तयार राहण्यास सांगितलं. त्या दिवशी म्हणजे एकोणीस सप्टेंबर रोजी या कृष्णकन्हैय्याची राधा वगैरे गोपिकांसह सफर निघाली! पॉश् एअर-कंडिशण्ड कारमधून! 'स्वर्ग असलाच तर तो हाच, तो हाच!' असे त्या पोरींना वाटल्यावाचून राहिले नसेल. शर्मा गप्पा मारीत होता. त्यांना सुखवीत होता. कोठे जायचे हे त्यांना सांगितलेच नव्हते. मोटार नाशिक रस्त्याला लागली होती. अभिनेत्री शशिकला ही देखील आपल्याला येऊन मिळणार आहे. ती पाठोपाठ येतच आहे. आपण खूप गंमत जंमत करू अशा वार्ता शर्मा ठोकीत होता. नाशिकमध्ये सायलेन्सरमध्ये बिघाड झाला. तेथे एका पेट्रोल पंपावर त्याची दुरुस्ती झाली. नाशिकला मुक्काम घडला नाही; पण रस्त्यावरच काळोख झाला. तेव्हा जंगलातच मोटारीमध्ये मुक्काम झाला आणि वनमहोत्सव साजरा झाला! वीस तारखेला मंडळी इंदूरला पोचली. एकवीसला ग्वाल्हेर गाठले. प्रवासात शर्माने एके ठिकाणी पोशाख बदलला. पूर्वीच्या ऐटबाज पोशाखाऐवजी सूटकेसमधून त्याने खाकी गणवेश काढला. आता तो चक्क ड्रायव्हर शोभू लागला व त्या वेशात गाडी चालवू लागला. एकवीस किंवा बावीस सप्टेंबरला भारताच्या राजधानीत ही मंडळी पोचली. त्यावेळी दुपारचे साडेतीन वाजले होते. "आता कुठं जायचं? कुठं उतरायचं?" असा चिवचिवाट त्या पोरी करू लागल्या. शर्मानं क्षणभर विचार केला. "आता तुम्ही तावडतोब मुंबईला परत जा," तो म्हणाला, "मी तुम्हाला विमानानं परत पाठवितो." त्या पोरींच्या आश्चर्याला पारावार उरला नाही. दुपारी साडेतीन वाजता राजधानीत येतो काय आणि आपली तात्काळ बोळवण होते काय? त्यांना काहीच कळेना. विमानाने मुंबईस परतायचे ही कल्पना मनात येताच त्या रडकुंडीला आल्या. कारण विमानाच्या प्रवासाला साजेसे कपडे त्यांच्याजवळ नव्हते. त्यांच्याजवळ नव्हत्या फॅशनेबल चपला! त्यांनी तोंड गोरेमोरे केले. त्यांच्या सख्याहरीला, मुरलीमनोहराला त्यांची कणव आली. "गोपींनो, तुम्ही अशा कष्टी, उदास होऊ नका! कपड्यांची, चपलांची काय क्षिती! चला माझ्यावरोबर" अशा तऱ्हेच्या शब्दात त्याने त्यांची समजावणी केली. त्या तावडतोब बाजारात गेल्या. साड्या चपलांची खरेदी झाली. मग मोटार पालम विमानतळाच्या दिशेने धावू लागली. त्यांचे हिशोब पटवले गेले. निम्मीच्या हातात विमानाच्या तिकिटांचे पैसे शर्माने ठेवले. तिने चार तिकिटे खरीदली. विमान रात्री ८॥ वाजता निघणार होते. ते तयारच होते. विमानाने मुर्कन आकाशात झेप घेतली. रात्री साडेअकराला त्या चौघींचे पाय मुंबईच्या भूमीला लागले! त्या चौघींचे एक अद्भूत रंगीबेरंगी स्वप्न संपले. त्या चौघींची कहाणी ऐकताना सी. आय. डी. शाखेतील पोलीस अधिकारीदेखील गुंग होऊन गेले; पण त्यांना त्या स्वप्नात मश्गुल होऊन चालण्यासारखे नव्हते. तावडतोब सबइन्स्पेक्टर दुधाट व तर्टे यांची दिल्लीला रवानगी झाली. देशमुख तर दिल्लीला तळ देऊन बसले होते.

नवी दिल्लीमध्ये हे तिघे अधिकारी डोळ्यात तेल घालून फिरू लागले. धनुर्विद्या शिकविताना द्रोणाचार्यांनी प्रत्येक शिष्याला विचारले: "तुला समोर काय दिसते?" फक्त अर्जुनालाच तेवढा पोपटाचा डोळा दिसत होता. तसलाच प्रश्न त्यावेळी या तीन अधिकाऱ्यांना केला असता तर त्यांनी अर्जुनाप्रमाणेच उत्तर दिले असते: "सर, आम्हांला फक्त MRX 4888 दिसते!"

दहा ऑक्टोबरला एकदाची ही गाडी त्यांच्या नजरेला पडली. नवी दिल्ली येथील महाराणी पार्कमधील 'पार्क ॲव्हेन्यू' या इमारतीजवळ ही गाडी उभी होती. गाडीच्या मालकाचा पत्ता नव्हता. दुपारी साडेतीनला स्वामी योगेश्वरानंद ऊर्फ शिवनाथ जयस्वाल ऊर्फ एस. के. गुप्ता ऊर्फ विक्रमभानु गुप्ता ऊर्फ अरुणकुमार बसर ऊर्फ डॉक्टर सुशीलचंद्र शर्मा यांची स्वारी डुलत डुलत मोटारीजवळ आली. काय होतं आहे हे कळण्याच्या आतच तिन्ही अधिकाऱ्यांचा गराडा त्यांच्याभोवती पडला. शर्माला कळून चुकलं: "आता आपण सापडलो."

पंधरा मिनिटातच मुंबईला फोन लावला गेला. सी. आय. डी. शाखेत आनंदीआनंद झाला. डेप्युटी कमिशनर श्री. कुळकर्णी यांनी श्री. पेंडसे आदि सर्व अधिकाऱ्यांचे अभिनंदन केले. इतकेच नव्हे तर इन्स्पेक्टर पेंडसे, इन्स्पेक्टर वाकटकर आणि सब-इन्स्पेक्टर गौड यांना तावडतोब दिल्लीला जाण्याची आज्ञा दिली. इतक्या महान व्यक्तीला सन्मानाने आणायला नको का?

इकडे दिल्लीमध्ये डॉ. सुशीलचंद्र शर्मा यांची झडती चालली होती. त्याच्या अंगावरच हजाराच्या सात नोटा आणि शंभराच्या चौदा नोटा मिळाल्या. या पोलिसपाहुण्यांना घरात नेल्याशिवाय गत्यंतर नव्हतेच. पार्क ॲव्हेन्यू नं. २ च्या तळमजल्यावरच शर्माजींचे बिऱ्हाड होते. दिवाणखान्यातील एका लाकडी कपाटाचे दार शर्माने उघडले. त्यातील एका ब्रीफकेसमध्ये शंभराच्या पंचाण्णव नोटा मिळाल्या. दहा रुपयांची चार बंडले मिळाली. प्रत्येक बंडलामध्ये शंभर रुपये होते. या बॅगेत इतर कागदपत्रेही होती. त्यातील महत्त्वाचे कागद म्हणजे फ्लॅटचे मालक श्री. राजीवलोचन यांची डिपॉझिट रिसीट शर्माने त्यांना आपले नाव व ठिकाणा जसा दिला होता तसा लिहिला होता: 'श्री. शिवनाथ विक्रमनाथ, नाथनिवास' महात्मा गांधी रोड अमृतसर.", दुसरा महत्त्वाचा कागद म्हणजे गाडी नं. MRX 888च्या व्यवहारासंबंधीचा. नंतर शर्माने त्या घरातील कोठीघराचे कुलूप उघडले. आतून एक सूटकेस काढून हजर केली. त्यातून पाच हजाराच्या दहा नोटा, हजाराच्या चौसष्ट नोटा, शंभराच्या नव्या करकरीत नऊ नोटा मिळाल्या. शिवाय




शंभर रुपये नोटांची सदुसष्ट बंडले मिळाली. प्रत्येक बंडलात शंभरच्या शंभर नोटा होत्या. सर्व रोकड मिळून एकंदर नऊ लाख एकोणतीस हजार सातशे एकतीस रुपये मिळाले. याशिवाय असंख्य पत्रे आणि इतर कागदपत्र मिळाले. पंचनामा दुपारी साडेबाराला सुरू झाला तो रात्री अकराला संपला. मुंबई पोलीसांनी बाजी जिंकली.

पेंडसे, वाकटकर आणि गौड हे त्रिकूट लागलीच तेथे येऊन पोहोचले. अकरा ऑक्टोबरला हा सर्व ताफा डॉ. सुशील शर्मा, या सुटाबुटात असलेल्या अवलियाला घेऊन मुंबईस पोचला.

डॉ. सुशीलचंद्रांचा अवतार संपला! त्याला त्याच्या गोपी पुन्हा मुंबईस भेटल्या; पण त्या कैद्याची ओळख पटविण्याकरिता आल्या होत्या. एवढाच फरक! शर्माच्या सहाय्याने मधुकर दाते [illegible]त बँक ऑफिसरही मिळाला. त्याचे खरे नाव होते मधुकर [illegible] कार्लेकर. तो बँक ऑफिसर वगैरे काही नव्हता. जी. पी. ओ. समोरील स्टॉलसमध्ये जे अनेक टायपिस्ट बसतात तेथला एक टायपिस्ट होता. पत्रे टाईप करण्याच्या निमित्ताने शर्माची आणि त्याची ओळख झाली होती. शर्माने त्याला मधुकर दाते आणि बँकेचा ऑफीसर बनवला. त्याला दहा सप्टेंबरला घरी बोलावले. हेमंत व्यासकडून घेतलेले पैसे बँक ऑफीसरच्या नात्याने त्याच्याकडे सांभाळण्यास दिले. बँकेला जाण्याच्या निमित्ताने त्याने कार्लेकरला मोटारीत घेतले. बिल्डिंगमधल्या वॉचमनलाही घेतले. वरळी नाक्यावर त्या दोघांनाही त्याने उतरवले व त्यांना जा म्हणून सांगितले. त्यांनी केलेल्या मदतीबद्दल वॉचमनच्या हातावर २३० रुपये व कार्लेकरच्या हातावर शंभर रुपयांचे गूळखोबरे ठेऊन शर्मा पसार झाला होता. कार्लेकरला या गुन्ह्याची पार्श्वभूमी काहीच माहीत नव्हती. त्याचा गुन्ह्याशी एवढ्यापुरताच संबंध आला होता. त्याच्यावर खटला भरण्यात काहीच स्वारस्य नव्हते. खटल्यामध्ये त्याची साक्षीदार म्हणून साक्ष झाली. त्याचप्रमाणे सुरुवातीला अटक केलेल्या मलकानीवरदेखील फसवणुकीच्या अरोपाबद्दल तसा काही पुरावा नव्हता. पोलीसांच्या अर्जावरूनच त्याला कोर्टाने सुरुवातीलाच सोडले. त्याचीही साक्ष या खटल्यामध्ये झाली. ज्यांच्याकडून शर्माने खऱ्याखुऱ्या रंगाची काही पिंपे खरेदली होती ते व्यापारी, ज्यांच्याकडून रिकामी पिंपे, खडी, गोणपाटे खरीदली होती ते ते सर्व व्यापारी शर्माने पोलीसांना दाखविले. त्यांच्या जबान्या घेतल्या गेल्या. कोर्टामध्ये त्यांच्या साक्षी झाल्या. शर्माने तयार केलेले यंत्र म्हणजे शुद्ध धूळफेक होती. पदार्थविज्ञानशास्त्र आणि रसायन शास्त्राची थोडीफार माहिती असलेल्या कोणासही अशा यंत्राची सिद्धता करता आली असती. यंत्राच्या एका भागात अगोदरच विकत घेतलेला शुद्ध रंग ठेवून त्यात विशिष्ट प्रकारच्या वायूच्या मिश्रणाने त्या रंगाचे द्रवीकरण शर्मा करीत असे व तो द्रवपदार्थ वाळला की आपण इलेक्ट्रॉनिक पद्धतीने तो रंग तयार केलेला आहे असे भासवी.

डॉ. शर्माची कहाणी संपली!

पोलीसांनी फसवणुकीच्या आरोपाखाली—दोन कलमांखाली आरोपपत्र सादर केले. पहिला आरोप कलम ४२० खाली होऊन व्यास ह्या फिर्यादीची फसवणूक करून त्याच्याकडून पैसे लुबाडल्याबद्दल होता. दुसरा आरोप कलम ४१९ खाली म्हणजे आपण स्वतः डॉ. सुशीलचंद्र शर्मा नुसता, एम्. एस्सी. (इंग्लंड) एम्. टेक्. पी. एच्. डी. (यू. एस्. ए) या पदव्या मिळालेल्या नसताही आरोपीने तसे असल्याचे भासवून फसविले हा होता. हा खटला प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट श्री. धुरंधर यांच्यापुढे प्रदीर्घ काळपर्यंत अतिशय कंटाळवाणेपणाने चालला. शर्माजवळ सापडलेल्या नोटांचे नंबर फिर्यादी हेमंत व्यासने आपल्या फिर्यादीत दिलेले होतेच. हे सर्व पैसे फिर्यादीचे असल्याचे निर्विवादपणे सिद्ध होत होते. शिवाय आरोपीचे चमत्कारिक वर्तन, वारंवार नावे बदलण्याच्या तऱ्हा इत्यादी सर्व गोष्टींवरून फसवणुकीचा गुन्हा सिद्ध होत होता. फिर्यादी हेमंत व्यासचा विश्वास बसावा म्हणून रामकृष्ण बजाज सारख्या मातब्बर उद्योगपतीचा कुशलतेने उपयोग करून घेतला होता. रामकृष्ण बजाजांचे नाव मध्ये आले नसते तर कदाचित हेमंत व्यास या जाळ्यात सापडलाही नसता!

खटला चालू असता शर्माने वकील दिले होते; पण आपल्या बुद्धिमत्तेची झेप इतरांच्यात नसावी असे त्याला वाटल्यावरून त्याने वकीलांना कार्यमुक्त केले व सारा खटला आपणच चालविला. त्यामुळेच तो अतिशय कंटाळवाणा चालला. चालवताना त्याने अनेक अर्ज—अगदी सुप्रीम कोर्टापर्यंत करून नाना प्रकारचे थेर केले व खटला लांबवला. दिल्लीत आपणास केलेली अटक हीच बेकायदेशीर आहे असे त्याचे म्हणणे. अर्थात् हे सारे अर्ज फेटाळले गेले हे सांगावयास नकोच. त्याचा परिणाम एवढाच झाला की खटला अधिक काळ रेंगाळला. उलटतपासणीत त्याने साक्षीदाराला विचारलेले प्रश्न अतिशय लांबलचक आणि कंटाळवाणे असत. काही काही प्रश्नात त्याची बुद्धिमत्ता आणि चाणाक्षपणा आढळे. तरी पण तो कायद्यात पारंगत नसल्यामुळे त्याची गाडी








मलऱ्या रूळावर जाई. या खटल्यामध्ये आपला बचाव करताना हा व्यवहार दिवाणी स्वरूपाचा आहे त्यामुळे फौजदारी गुन्हा केल्याचा आरोप सिद्ध होत नाही असे त्याचे म्हणणे. दुसरा मुद्दा असा की वास्तविक त्याने रंगाचा व्यवहार फिर्यादीबरोबर ठरविला होता. पण मलकानी याजकडे कस्टोडियन या नात्याने दोन्ही किल्ल्या स्वाधीन केल्या होत्या. फिर्यादी व्यास आणि मलकानी यांनी संगनमत करून हा पोकळ खटला व खऱ्याखुऱ्या व्यवहाराचे पैसे परत मिळविण्याच्या उद्देशाने उभा केला. या दोन्ही बचावात काहीच अर्थ नव्हता. मलकानीशी फिर्यादीने संगनमत केले असे गृहीत धरले तरी पहिल्या दिवशीच फिर्यादीने मलकानीला पकडून पोलीसांच्या स्वाधीन केले नसते व त्याला ठोसे लगावले नसते. आपण खडी खरेदी केली ती गुदामाची जमीन दुरुस्त करण्यासठी असे स्पष्टीकरण त्याने केले. आपण खरोखरीचे उद्योगपती असल्याने आपल्याकडे बरीच मोठी रक्कम असे. धंद्याच्या निमित्ताने व्यासच्या गाठीभटी होत असत त्यावेळी त्याने काही नोटा पाहिल्या असल्याची शक्यता आहे. तेच नंबर त्याने फिर्यादीत दिले आहेत असे आरोपीचे म्हणणे होते. ज्यावेळी व्यासने दहा लाखाचा चेक दिला त्यावेळी काही कागदपत्र त्याच्या हाती दिले गेले. चेक वटविला गेला नाही, कारण फिर्यादीकड एवढ्या पैशाची तरतूदच नव्हती असे शर्माने कोर्टास सांगितले. त्यावेळी ताब्यात आलेल्या कागदांचा उपयोग करून नऊ लाख पस्तीस हजाराची खोटी पावती फिर्यादीने बनवली. त्यावरील आपली सही बनावट आहे. मलकानी आणि कार्लेकर यांनी फिर्यादीस मदत करण्यासाठी म्हणून मुद्दाम साक्षीदाराच्या सह्या केल्या वगैरे उलटसुलट आणि विसंगत असे बचावाचे पवित्र शर्माने घेतले. हे सर्व मुद्दे न्यायमूर्तींना तकलादू वाटले. मात्र आपण डिग्रीधारक नाही व आपल्याजवळ इलेक्ट्रॉनिकचे ज्ञान नाही व तसे नसताही आपण तसे भासविले हा अरोप फिर्यादी पक्षाने सिद्ध केला नाही हे शर्माचे म्हणणे त्यांनी ग्राह्य मानले. कारण 'अभावा'चे अस्तित्व सिद्ध करणे कठीण होते. न्यायमूर्तींनी ४१९ कलमाखालचा आरोप सिद्ध न झाल्याने त्याला दोषमुक्त केले. मात्र ४२० कलमाखाली आरोप सिद्ध झाला असे ठरवून त्यांनी १३ मे १९७० रोजी त्यास दोषी ठरविले व त्याला चार वर्षे सश्रम कारावासाची सजा ठोठावली व दहा हजाराचा दंडही सुनावला. त्याने दंड भरला तर त्यातील ६,००० रुपये फिर्यादीस नुकसानभरपाईदाखल मिळावेत असा कोर्टाने हुकूम केला. त्याचप्रमाणे पोलीसांनी ताब्यात घेतलेले नऊ लाख एकोण-तीस हजार सातशे एकतीस रुपयेही फिर्यादीस परत करण्याचा हुकूम केला. शर्माने दंड भरला तर खटल्यातील दोन्ही मोटारी त्यास परत कराव्यात, अन्यत: त्यांचा लिलाव करून दंडाची रक्कम वसूल करावी असाही आदेश कोर्टाने दिला.

खटला जवळ जवळ दोन महिने चालला. पस्तीस साक्षीदार तपासण्यात आले. खटला चालवताना शर्माची वृत्ती शांत, गंभीर तर कधी हसतमुख असायची. त्याच्या मुद्रेवर कधी अनुताप किंवा पश्चात्तापाचे चिन्ह दिसत नव्हते. आपण यातून खचित सुटणार अशी त्याची खात्री असावी. चाणक्याने देखील आपल्या बुद्धीवर एवढी मदार ठेवली नसावी. या शिक्षेविरुद्ध शर्माने हायकोर्टात अपील केले, पण ते फेटाळले गेले.

या खटल्यातील एका उपखटल्याची हकीकत सांगायची तेवढी राहिलीच ! ती अशी :–

खटला चालू असताना तो कच्च्या कैदेत होता. आर्थर-रोडच्या तुरुंगात असताना त्याने कोठडीतल्या संडासातील एका लहानशा खिडकीचा गज कापला व त्यातून तो बाहेर पडला. त्याची कोठडी पहिल्या मजल्यावर होती. संडासाच्या दुसऱ्या खिडकीच्या गजाला त्याने चादरीचे फाडलेले तुकडे एकमेकांना बांधून तयार केलेली दोरी बांधली व तिच्या आधाराने तो खाली उतरला. उतरताना त्याने तसलीच एक दोरी बरोबर घेतली होती. कोठडीतून पहाटे चारच्या सुमारास तो बाहेर पडला खरा; पण कोठडीच्या बाहेर दहाबारा फूट उंचीची जेलची भिंत होती. तिच्या वरच्या बाजूस काचेचे तुकडे रोवलेले होते. कोठ-डीत असताना या भिंतीचे निरीक्षण शर्माने केले असावे. भिंतीजवळ येताच त्याने आपल्या हातातील च[illegible] अल्लद वर फेकली. ती बरोबर वरच्या एका काचेच्या तुकड्याला अडकून बसली. त्याने दोरी एकवार हलवून काचेच्या तुकड्याच्या मजबुतीचा अंदाज घेतला. दोरी पक्की बसली आहे याची खात्री होताच दोरीच्या आधारे तो तानाजी गड चढू लागला. पण त्याचे दुर्दैव आड आले. त्याचा उदयभानू जवळच फिरत होता. जेलचा शिपाई काळे याने त्वरेने तेथे येऊन दोरी खेचली. शर्माचा तोल गेला आणि तो खाली पडला. त्याचा पाय दुखावला गेला. त्याला पुन: अधिक बंदोबस्तात ठेवण्यात आले. तांबडी टोपी देण्यात आली.

पहिल्या खटल्याचा निकाल लागताच, तुरुंगातून पळून जाण्याचा प्रयत्न केल्याच्या आरोपावरून चीफ प्रेसिडन्सी मॅजिस्ट्रेट श्री. गेहानी यांच्या कोर्टात त्याच्यावर दुसरा खटला भरण्यात आला. त्यातही तो दोषी ठरून त्याला अठरा महिने सश्रम कारा-वासाची शिक्षा झाली.

गुन्हेगाराला पकडल्यानंतर त्याची जबानी घेण्यात येते. खटल्याच्या दृष्टीने त्याचे काही महत्त्व नसते. पुराव्याच्या कामी तिचा उपयोगही करता येत नाही. या जबानीत शर्माने आपले पूर्वचरित्र कथन केले होते. त्याच्या सांगण्याप्रमाणे त्याचे आईवडील लहानपणीच वारले होते. त्याच्या आजीने त्याला दिल्ली प्रदेशात आणले. मोहरली या खेडेगावात त्याचे पालन-पोषण केले. तेथील जोगमाया आश्रमाच्या आर्यसमाजमंदिरात ती दोघं राहात. त्यानंतर तो कोणा स्वामीबरोबर हृषिकेश, उत्तरकाशी, गंगोत्री वगैरे ठिकाणी हिंडला. अनेक साधुसन्याशांच्या मेळाव्यात तो १९५८ पर्यंत हिंडत होता. या काळात त्याने इंग्रजी व संस्कृतचे अध्ययन केले. नंतर संस्कृतच्या शिकवण्या करून तो आपला चरितार्थ चालवी. पुढे एका विख्यात स्वामीजींच्या सान्निध्यात तो आला. त्यावेळी त्यास योगेश्वरानंद हे अभिधान प्राप्त झाले; पण त्यास कामिनी योगाच्या आनंदाचा ध्यास लागल्यामुळे तेथून त्याची हाकालपट्टी झाली. पुढे त्याचे हे उद्योग सुरू झाले. साधुसंतांचा सहवास मिळावा यासाठी टाहो फोडणाऱ्या तुकारामाला त्याने खोटे ठरविले ! पेंडसे यांनी, या कथनातला खरेखोटेपणा ताडून बघण्यासाठी एका अधिकाऱ्याला जोगमाया आश्रमाकडे पाठविलें होते; परंतु अशा प्रकारची म्हातारी आजीबाई आणि तिचे हे नातवंड कुणी पाहिल्याचे सांगितले नाही.

[उत्तरार्ध]






स्निग्ध रंगात,

पानापानातून नाचतो निसर्ग —

( अर्थात दलालांच्या गोव्यातला )





सखी – शेजारणी

दोन 'रचना चित्रे'
( कंपोझिशन्स )



पाण्या निघाल्या सुंदरी



नाचनाचुनी अंग झालें दंग

रंगली कला

कलाकार – दीनानाथ दलाल

अनुक्रमणिका

●

ख्यातनाम चित्रकार व
प्रथितयश साहित्यिक
मित्रवर्य

# कै. दीनानाथ दलाल

यांच्या चिरस्मृतीस
आमचे

## हार्दिक अभिवादन

●

स्वस्तिक रबर प्रॉडक्टस लिमिटेड
खडकी, पुणे-३.












# रसिक मनाचे दिलदार दोस्त

— अरविंद ताटके

कालगती तरी किती विचित्र असते पहा! शनिवारी दि. ९ जानेवारीला संध्याकाळी विर्ला क्रीडा केंद्रात 'दीपावली'च्या रौप्य महोत्सवानिमित्त आयोजित केलेल्या मेजवानीला मी उपस्थित होतो. प्रवेश-द्वारावर दलाल सुहास्य वदनानं स्वागताला उभे होते. सगळा समारंभ थाटात झाला. त्या दिवसाच्या सगळ्या सुखद आठवणी मनांत रेंगाळत असतानाच दि. १६ रोजी 'मराठा'त दलालांच्या देहावसानाची दुष्ट वातमी वाचण्याचं दुर्भाग्य वाट्याला आलं. एका शनिवारी आम्ही मेजवानीच्या आनंदात होतो तर दुसऱ्या शनिवारी दलालांच्या मृत्युयात्रेत मला सामील व्हावं लागलं. त्यांच्या निधनानं माझ्या काळजाचा लचकाच जणू तुटला.

दलाल माझे जिव्हाळ्याचे मित्र होते. नेहमी मी त्यांना घरी येण्याचं निमंत्रण देत असे. पण गेली दहा वर्षं ते मला झुकांड्या देत होते. नोव्हेंबरात पत्रकार पेठे यांच्या मुलीचं लग्न निघालं. तेव्हां लग्नाला दलाल यायचे होते. मलाही त्यावेळी तुमच्या घरी येईन असं ते म्हणाले. त्या दिवशी त्यांना आणण्यास मुद्दाम मी त्यांच्या सहकार निवासात गेलो. प्रथम वर्गाच्या डब्यातून दादर ते ठाण्यापर्यंत आम्ही दोघं गप्पा मारीतच आलो. लग्नाला जाऊन आम्ही माझ्या घरी आलो. गाडीत सहज त्यांना मी नवीन जागा घेण्याचं बोललो होतो. फराळाचं आल्यावर ते माझ्या पत्नीला म्हणाले——

"अहो मला का ऽऽही नको. फक्त चहा आणो. साखर अगदी थोडी घाला. फराळ तुमच्या नव्या जागेत येईन तेव्हां करीन. त्या आधी तुम्ही दोघंजण या एकदा आमच्याकडे" पुन्हा आमच्या गप्पा झाल्या. नंतर त्यांना मी गाडीत वसवून दिलं. गाडी सुटण्यास थोडा अवधी होता. त्यावेळी दलाल मला म्हणाले——"ताटके, दीपावलीच्या रौप्य महोत्सवाची पार्टी करायचीय. अच्युत वर्वे व गोखले म्हणताहेत की आम्ही लेखक काढतो पंचवीस पंचवीस रुपये. पण मी त्यांना म्हणतोय तसं नाही जमणार. अहो, हजार दोन हजाराचा तर प्रश्न आहे. मीच देतो तुम्हाला जंगी मेजवानी. पण ते म्हणताहेत की तसं होऊं दे. पण नंतर आम्हीही एक मेजवानी तुम्हाला देऊ. मी त्यांना रुकार दिलाय. पण माझी मेजवानी पहिली होईल."

दलालांनी आपले शब्द खरे केले. पण आम्हाला त्यांना काही देण्यास त्यांनी अवसरच ठेवला नाही. मी त्यांना त्यावेळी म्हटलं–"दलाल, तुम्ही आमच्याकडून काहीच घेत नाही. मुलींची लग्नं केलीत तेव्हांही आहेर घेतला नाहीत, अन् आताही तुम्हीच आम्हाला पार्टी देताय."

"तुम्ही 'दीपावली'ला साहित्य देताय यातच मला सारं पावतंय्" दलाल म्हणाले. आमचं दुर्दैव असं की, त्यांच्या कलेवराला हार घालण्याचंच आमच्या नशिवी आलं.

चित्रकला हा दलालांचा व्यवसाय असला तरी वाङ्मय हीच त्यांची खरी हौस असे. काव्यशास्त्र विनोदाच्या मैफलीत ते धुंद होत. त्यासाठीच तर त्यांनी 'दीपावली' मासिक काढलं. त्यात विविधता असावी अन् वाचकांमध्ये ते लोकप्रिय व्हावं म्हणून त्यांचे नवीन नवीन प्रयोग सदैव चालू असत. त्यात आधुनिकता असावी म्हणून नेहमीच ते दक्षता बाळगीत. शृंगाराचं त्यांना वावडं नसे. मला ऐतिहासिक कथा लिहिण्यास त्यांनीच प्रवृत्त केलं. मात्र कथांची पातळी खाली वा बीभत्सतेकडे जाऊ नये यावद्दल ते जागृत असत. वैयक्तिक कुचाळी अन् बीभत्सपणाला ते आपल्या मासिकात कधीही थारा देत नसत. वाङ्मयापासून निकोप आनंद लुटता आला पाहिजे असं त्यांना वाटायचे. दरवर्षी ते क्रिकेटची पुरवणीही काढीत. माझ्याकडून त्यावेळी ते आग्रहानं लेख लिहून घेत.

इतिहासाचंही दलालांना वेड असे. चित्रकार गोडशांच्या मागं इतिहास विषयासंवंधी लेख लिहिण्यासाठी ते लकडा लावीत, त्याप्रमाणं मलाही ते ऐतिहासिक कथा दिवाळी अंकासाठी लिहिण्यासाठी आग्रहानं पत्र लिहीत. माझ्या अनारकली अन् जहानआराच्या कथेनं त्यांना वेडं केलं. तेव्हां ते म्हणाले– "ताटके, आता निघूं दे तुमचा ऐतिहासिक कथासंग्रह! फक्कड मुखपृष्ठ करून देतो तुम्हाला" माझा कथासंग्रह

# दलाल–माझे मित्र

अनंत अं. कुळकर्णी

श्री. दीनानाथ दलाल यांचा आणि माझा बत्तीस वर्षांचा स्नेह! आम्ही दोघे समवयस्कच! आमच्या स्नेहात कृत्रिमतेचा अंशही नव्हता. आम्ही एकमेकाना भेटलो नाही असा एक महिनाही कधी गेला नाही. असा विषय नाही की ज्यावर आम्ही बोललो नाही. साहित्य, चित्रकला, चित्रपट, नाटके, राजकारण, घरदार, संसार, मुलेबाळे, क्रिकेट हे आमचे नेहमीचे विषय. क्रिकेटचे कितीतरी कसोटी-सामने आम्ही एकत्र बसून पाहिले आहेत.

१९४५ मध्ये सुरू झालेल्या वार्षिक 'दीपावली'चे १९५९ मध्ये मासिकात रूपांतर करताना त्यांनी लिहिले होते, "अनंतराव, दीपावलीचे दिवे दर महिन्याला लावायचे ठरविले आहे; अर्थात् तुमच्यासारख्यांच्या मदतीवरच!" दलालांनीच मला काही थोडे ललित लिहावयास भाग पाडले. काही कथा तर मुद्दाम लिहवून घेतल्या आणि त्या 'दीपावलीत'त छापल्या.

दलाल आणि मी कितीतरी गोष्टी जोडीने करण्याचे ठरवीत होतो, पण आता ते सर्व संकल्प जागच्याजागीच राहिले आहेत. दलाल अलिकडेच श्रांत दिसत. पण त्यांना तसे म्हटलेले आवडत नसे! ते ताड्कन म्हणत, 'छे! छे!! आता तर मी चांगला झालो आहे. वजन जरा कमी झाले आहे आणि उत्साह वाढला आहे. मी पूर्वीपेक्षा आता अधिक वेळ काम करू शकतो.' गेल्या दोन वर्षात तर ते अधिक थकलेले दिसत, जाणवत. श्री. अरविंद गोखले यांच्याजवळ मी तसे बोलूनही दाखविले, पण दलालांबरोबर बोलताना मात्र हा विषय मी टाळीत असे.

दलाल यांच्या राहत्या आणि स्टुडिओच्या जागा यांचा माझा संबंध यावाच असा विधिसंकेत असावा. मुंबईतल्या जागांबाबत संबंध आलाच आणि पुण्याचा प्लॉटही घेतला तेव्हांही मी त्यांच्या समवेत होतोच. पुण्यातच राहून दररोज डेक्कन-क्वीनने मुंबईला कामासाठी जावयाचे अशी मूळ कल्पना होती; पण ते जमले नाही आणि शेवटी दलालांनी पुण्याचा बंगला विकूनही टाकला. त्या निमित्ताने दलाल पुण्याला आमच्या घरी आले होते. माझ्या पत्नीशी ते बोलत बसले असतानाच तिने 'ही पहा एक गंमत' असे म्हणत एक जुन्या बनावटीचा अस्सल इंग्लिश मेकचा उंचचउंच कप दलाल यांच्या समोर आणून ठेवला. त्यांनी 'हे काय?' असे विचारताच तिने "हा आमच्या घरात 'दलाल कप' म्हणून ओळखला जातो" असे सांगितले. दलाल आश्चर्यचकित झाले. माझ्या पत्नीने त्याबाबत खुलासा करताना सांगितले, "तुम्ही आमच्याकडे प्रथमच येणार होतात, त्यावेळी त्या निमित्ताने अशा चार कपबशा आणि तीन डिशेश आणल्या होत्या. इतकी भारी क्रोकरी त्या निमित्ताने त्यावेळी आमच्या घरात आली होती. मी या घरात आल्यावरही त्या कपबशा व डिशेश कित्येक वर्षे होत्या; पण आता मात्र त्यापैकी एकच म्हणजे हा कप उरला आहे. तोही आमच्या मुलाने ड्रॉईंगच्या सामानात रंगाचे ब्रश वगैरे ठेवण्यासाठी घेतला म्हणून. पानशेतच्या वाताहतीतही तो वचावला."

कॉन्टिनेंटलच्या अगदी पहिल्या प्रकाशनावरचे—'नादनिनाद' या कथा-संग्रहावरचे– चित्र दलालांनीच काढल्याचे मला आठवते. कॉन्टिनेंटलची आजवरची शेकडो प्रकाशने दलालांच्या वेष्टनांनी सुशोभित झालेली आहेत. दलालांची चित्रे अनेक प्रकाशनांवर आहेत. त्या सर्वांचे प्रदर्शन कुणी भरविले तर हजारो चित्रांची ती रंगीत दुनिया पाहून लोकच काय पण प्रत्यक्ष ब्रह्मदेवही चकीत होऊन जाईल.

दलालांनी फार काम केले, प्रकृतीची आबाळ केली, अवश्य तेवढी विश्रांती घेतली नाही, पोटाची तक्रार नको म्हणून आहार कमी केला आणि शरीराची उपासमार केली. पण आता हे म्हणून काय उपयोग? जे घडावयाचे होते ते घडले आहे. ते टाळणे कुणाच्याच हाती नव्हते हेच खरे!

● ●

---

आता निघेलही पण त्याचं मुखपृष्ठ दलालांच्या हातचं नसणार म्हणून माझा जीव गलबलून जातोय. ऐतिहासिक लेख लिहिण्याबद्दलही मला ते सांगत. वेगळ्या धर्तीची 'आनंदीबाई' मी रंगविली तेव्हां ते अगदी खूष झाले. त्यामुळं मी दुसरा बाजीराव रंगविला तेव्हांही तो लेख त्यांनी दिवाळी अंकातच प्रसिद्ध केला. समव्यवसायी चित्रकारांबद्दल ते कधीही अनुदार उद्‌गार काढीत नसत. कलेची खरी जाण असणारा दलालांसारखा चित्रकार विरळा. माणूस म्हणून त्यांचं स्थान आगळं होतं. म्हणूनच त्यांच्या अकाली निधनानं सारे हळहळले. 'दीपावली' त्यांनी पंचवीस वर्षं मोठ्या रुबाबानं अन् मिजाशीनं वाढविली. नवीन लेखकांना त्यांनी नुसतं प्रोत्साहनच दिलं नाही तर स्वतःच्या मैत्रीचाही लाभ त्यांनी दिला. दिवाळी अंकाच्या ऐन गर्दीत मी त्यांच्याशी दूरध्वनीवरून संपर्क साधीत असे. त्यांचा तेव्हा पहिला प्रश्न असे––

"मग कधी येताय?"

• "अहो सध्या तुम्ही कामात असाल!"

"कामाचं सोडा. या आज संध्याकाळी. मी थांबतो तुमच्यासाठी. बरोबरच बाहेर पडू."

दलालांचं अंत्यदर्शन घेताना 'मी थांबतो तुमच्यासाठी' हे त्यांचं नेहमीचं पालुपद मला आठवलं. आणि मन गलबलून गेलं.








# मला भावलेले दादा दलाल

**—अशोक परांजपे**



रखरखलेलं उन असायचं. ऑपेरा हाऊसचा तो चौक वाहनानी, माणसानी गजबजलेला. घाम नकोसा करायचा. आणि अशा संत्रस्थ अवस्थेत 'दलाल-आर्ट' स्टुडिओत आलं की एकदम हलकं वाटायचं. जणू आपलं घर आहे हे! अशी भावना व्हायची. टेबलावर दिवा लावून दादा कामात निमग्न असायचे. येणाऱ्याची पावलं वाजली की आपलं नेहमीचं माफक हसू घेऊन म्हणायचे 'या! बसा, चहा घेता! घ्या!' आणि मग अगदी घरगुती स्वरूपात गप्पा सुरु व्हायच्या. सांगलीचे हवा-पाणी. वडिलांच्या कार्याविषयी थोडं. मग 'दीपावली'च्या एखाद्या अंकाविषयी बरं वाईट. एप्रिल उजाडला की 'संगीत अंका'ची तयारी सुरु व्हायची. दलाल म्हणायचे "हे पहा, मला सुरांतलं ओ की ठों कळत नाही. तुम्ही लोकांनी ते नीट पहायचं. मी छापायला बांधलेला आहे." गेल्याच संगीत अंकांत मी अभिजात संगीतांतील सौन्दर्यवाद मांडायचा यत्न केला. मुलाखती लोकांना आवडल्या. मी सहज स्टुडिओत आलो होतो, दलाल बेचैन होते. चटकन म्हणाले, "परांजपे तुमची चक्क हजामत करणारा लेख आलाय. काही लोकांना तुमच्या मुलाखती अजिबात रुचल्या नाहीत." मीही जरासा वरमलो. एकदम दलाल खळाळून हसले. "अरे! एवढं मनाला काय लावून घेता? चालायचंच. चला जरा चहा घेऊन येऊ."

खोटया स्तुतीइतकीच खोटया निंदेचीही दलालांना चीड असे. आपल्याला खरंखुरं काही माहीत असल्याशिवाय दलाल कुणाही बद्दल अपशब्द काढीत नसत. शीघ्रकोपी, मनाचा सरळ, हाडाचा कलावंत, वृत्तीचा सच्चा, असा हा गोवेकर होता. एकदा आम्ही दोघे बेन्द्रे यांचे प्रदर्शन पहायला गेलो. बेन्द्रयांच्या रंगसंगतीनं दलाल प्रभावित झाले. वा! व्हेरी गुड्! असं सारखं त्यांचे ओठ म्हणत होते. एकेका चित्राजवळ १५।२० मिनिटं आम्ही थांबत होतो. "काय रंगांची जादू आहे पहा! रंगांचं सामर्थ्य या माणसानं ओळखलंय्, रंग उत्तम काव्यासारखेच असतात, याचं हे दर्शन आहे पहा" दलाल भारावून बोलत होते. आम्ही प्रदर्शन पाहीलं आणि येता येता 'खैबर'मध्ये शिरलो. दलाल विलक्षण बेचैन झाले. "असं माझ्या हातून व्हायला पाहिजे. आता असं करतो; हा स्टुडिओचा व्याप बाजूला ठेवूनं कुठंतरी सहा महिने जाऊन राहतो. मग पहा तुम्हाला दलाल वेगळा दिसेल. त्याची चित्रं सर्वस्वी वेगळी दिसतील. त्यांच्या चेहऱ्यावर उल्हास तरळला. डोळे चमकले. आणि पाहता पाहता त्यांत विषण्णता आली." आता ते कसलं होतंय. मी रहाटगाडग्यात फिरायचं; एवढं राहीलंय. लोक, गिऱ्हाईकं मागेल ते चित्र रंगवायचं एवढंच या हातात राहीलंय. मनांत असो का नसो. दलाल रंगवीत राहील. पोटासाठी कलेची कुसर होते ती अशी." दलाल निराश होत होते. मी विषय बदलला. पुन्हा ते नेहमीप्रमाणे सावध झाले. पुन्हा व्यवहारी झाले. "हो! मी कांही भडभुंजा कलावंत नाही. मला प्रपंच आहे. मला हे असंच वागलं पाहीजे" दलालांचं हेच वैशिष्टच होतं. त्यांचं हृदय कलावंताचं होतं. पण बुद्धी व्यावहारिक होती. कुंचल्यावर विवेकाचा काबू होता. कुठल्याही भावनेत वाहून जावं त्यांना मानवत नव्हतं. पुन्हा ते स्वतःला सावरायचे. स्वतःबद्दल कुणी कींव करावी हे त्यांना मुळीच मान्य नसे. "मी समर्थ आहे. आता मला हवं तसं जीवन मी माझ्या चौकटीत बसवून घेईन" असं ते अलिकडे म्हणायचे.

सांगलीला माझे वडील ती. भिषग्रत्न ग. पां. परांजपे याना प्रकृती दाखविण्यासाठी एकदा मी येणार आहे असे दलाल नेहमी म्हणायचे. परवा तर मी जोरच केला. म्हटलं, "चला फेब्रुवारीत जाऊ." तेव्हा ते म्हणाले, "खरं सांगू का? तुमच्या वडिलांना भेटायला मला कससंच वाटतं. मी पंचाव्वनाच्या वर्षात वृद्ध झालोय आणि ते ८० व्या वर्षी तरुण आहेत." असं त्याचं वागणं होतं. नेहमी स्वतःकडे लघुत्व घ्यायचं. खोटी जाहीरातबाजी नाही. बडेजाव नाही. हाजी हाजी नाही.

असे होते दलाल! एक स्वाभिमानी माणूस! हळुवार कलावंत, जाणकार रसिक, सावध व्यवहार चतुर, साक्षेपी संपादक, असं त्यांचं बहुविध व्यक्तिमत्त्व होतं. त्यांना प्रसिद्धी, पैसा, मित्रपरिवार सारं लाभलं होतं. हे सारं वैभव असुनसूद्धा, बोलणं कठोर असलं तरी त्यांच्या अंतरंगात विनम्रता दडलेली होती. अन्तर्मुख होऊन जीवनाचा विचार करण्याची कला त्यांना चित्रकलेइतकीच अवगत होती. अनुद्धतासत्पुरुषासमृद्धिभिः स्वभावऐवष परोपकारिणाम्। असा त्यांचा स्वभाव होता. ● ●



अनुक्रमणिका

# नकळत अंतर मिटवणारे : दलाल

— प्र. ना. शेणई

दुपार.

तीन वाजून गेलेले.

कोणतातरी एक दिवस.

कदाचित बुधवार. किंवा शुक्रवार. किंवा हे दोन्ही दिवस सोडून आणखी कोणता-तरी दिवस.

पावसाळा.

नुकतीच एक सर बरसून गेलेली.

त्यानंतर पसरलेलं चकचकीत उन्ह.

वारा. गारवा.

चिंब रस्ते. फुटपाथवरून खळखळणारं गढूळ पाणी. त्यातहि ठिकठिकाणी वेलांट्या, वेलबुट्टी.

थांबत थांबत पळणाऱ्या रंगीबेरंगी मोटारी.

त्यांचे हॉर्न.

प्रणयांत आर्द्र व मधुर झालेल्या पक्षांच्या साद पडसादाइतके दिलखेचक.

गर्दी.

शीळ देत मी रस्ता तोडला. केनेडी ब्रिजपाशी आलो. थबकलो. समोरच्या इमारतीवर हवी ती पाटी दिसली. तडक त्या इमारतीच्या आवारात शिरलो.

पहिला माळा. डावीकडची पहिली खोली.

बाहेरच घुटमळलो.

का? कसा? कशासाठी? प्रश्न नाहीत. अर्थात उत्तरंहि नाहीत.

मग अर्थात स्टुडिओचं दार ढकललं. दारातच दोन शरीरं. एक डावीकडे. एक उजवीकडे. जय-विजय. डावीकडचं शरीर हसरं. मी त्यालाच विचारलं,

"दलाल आहेत का?"

शरीर हललं. पुन्हा किंचितसं हसलं. मानेनंच होकारलं.

मी आंत वळलो. एक कलावुती चेहरा पाहून गणित मांडलं, हेच दलाल असावेत. मी हात जोडले.

"मी शेणई!"

"कोण?" कलावुती चेहरा झिळ-मिळला. त्यांतून चांदण्याचा थेंब ठिबकला. किनरा सूर.

"मी प्र. ना. शेणई..."

"म्हणजे... मरण दार ठोठावत आहे, ही एकांकिका तुमचीच का?"

चष्म्यातून त्यांचे चकचकीत डोळे प्रकाश-झोतासारखे एकदम माझ्यावर स्थिरावले.

"होय."

हात पुढे झाला.

"बसा!"

—मग अर्थात गप्पा. त्यात माझाच विषय अधिक. त्यांचे प्रश्न. माझी उत्तरं. परतताना दिलासा. तुमची एकांकिका छान आहे. मला आवडली. येत्या सप्टेंबरमध्ये छापतोय. लिहित चला. वगैरे.

तेथून परतलो तर मन चांदण्यांत चिंब झालेलं. जड होऊन बसलेलं.

मग मी स्टुडिओत नित्यनियमाने जाऊ लागलो. या, बसाच्या शब्दांनी मनाला दिलासा मिळत गेला. सहवास वाढत गेला. मनाला पानं फुटली. कळी डोलू लागली. फूल आकार घेऊ लागलं. एकदा त्यांनी मला विचारलं,

"आम्ही दिवाळी अंकासाठी कादंबरी स्पर्धा घेतोय. भाग घेताय का?"

मी चक्क हो म्हणालो.

पण मनांत घाबरलो: कादंबरी लिहून नाही झाली तर? एकच प्रश्न. उत्तरे नाहीत.

उगवता दिवस मनस्तापात. कादंबरी नाही, काही नाही. सारं चालायचं तसं चाललं होतं.

प्रत्येक भेटीत दलाल विचारायचे : कसं काय? कादंबरी झाली का? मीही बेधडक थाप मारत होतो पन्नास पानं झालीत. सत्तर पानं झालीत. पण प्रत्यक्षात ओम् वेति!

एक दिवस मन किंचाळलं जे दिसते, जाणवते, भोगावे लागते, त्यापलीकडे अस्तित्व नाही. आणि जे दिसते, जाणवते, भोगावे लागते ते तर जगण्याच्या योग्यतेचं अस्तित्व नाही. आहे ते सर्व अर्थहीन. त्याच्या पूर्वी आणि नंतर देखील अर्थहीनच. एक न संपणारं, अकारण, अहेतुक, बेवारस, अनाथ अशी ही अर्थहीनता—हे अस्तित्व. हे नाका-रता न येणारं अस्तित्व.

विषय सापडला. 'वावर' कादंबरी लिहिली गेली. पुढे ती कादंबरी स्पर्धेत सहांत निवडली गेली. मग अर्थात पुस्तक निघालं. कादंबरी घेऊन दलालकडे आलो.

"तुम्ही कादंबरी स्पर्धा घेतली नसती तर मी कादंबरीकार म्हणून पुढे आलो नसतो."

यावर दलाल नुसते हसले. ओठातच.

मी पुढे—

"सहांत माझ्या कादंबरीची निवड केलीत म्हणून पुस्तक प्रकाशित झालं."

"छे, छे!" दलालचे डोळे माझ्यावर खिळले. "तुम्ही तुमच्या नशिबानं कादं-बरीकार झालांत. यात मला काय श्रेय देताय?"

"पण आज नवोदितांना प्रकाशक मिळणं कठीण जातं."

"तुमचं नशिब म्हणून प्रकाशक तुमच्या-कडे धावून आला."

दलाल ओठात किंचित हसले. रेखाटनांत मिसळून गेले.

तर असा एकेक दिवस जात होता. आणि बातमी आली : दलाल गेले.

घडले ते खरे होते, पण एवढे अनपेक्षित अचानक नि अकल्पित की—छे—मनच गोठून जातं.

आत शून्य. बाहेर शून्य. पोकळी केव-ढाली तरी.

पोकळीतून पोकळीत प्रवास.

मग आता आठवणी.. बेचैनी..

तो केनेडी ब्रिज... तो दलाल स्टुडिओ ...त्या कोपऱ्यात एका खुर्चीत बसून दलाल रेखाटन करीत... तो तीक्ष्ण प्रका-

## अजून रंग ओले होते

शृंगार-नायिका रंगत असता
कुंचला वेगात फिरत होता
चित्र पुरे होत होते..
अजून रंग ओले होते...

राग-मालिका रंगत असता
जोगिया व्याकूळ होत होता
तेव्हां रंग न्हात होते...
अजून रंग ओले होते...

सर्व चित्रे जिवंत झाली
त्यांची होरी मजेत रंगली
विश्व सर्व नाचत होते...
अजून रंग ओले होते...

काळ-रथ सुसाटत आला
सर्व 'चित्रे' तुडवून गेला
रंग अश्रू ढाळत होते..
म्हणून रंग ओले होते...

— वा. अ. देशपांडे

## दलालांची स्मृती चिरकाल राहील

श्री. दीनानाथ दलाल यांची फार वेळा गाठ पडलेली नाही. पण हिंगणे स्त्री-शिक्षण संस्थेच्या माणिक महोत्सवाच्या निमित्ताने १९६८ साली जे 'भारतीय स्त्री' हे पुस्तक संस्थेने प्रसिद्ध केले, त्याचे वेष्टन तयार करून देण्याचे काम डॉ. सरोजिनीबाई बाबर यांच्या विनंतीवरून श्री. दलाल यांनी स्वीकारले, त्याकरिता तीन चार वेळा मी त्यांना भेटलो. त्यावेळी श्री. दलाल यांच्या सौजन्याचा, कार्यतत्परतेचा, चित्रण कौशल्याचा जो ठसा माझ्या मनावर उमटला आहे, तो खोलवर गेलेला आहे. श्री. दलाल यांनी अल्प मुदतीत फार सुबक व परिणामकारक चित्र तयार करून दिले आणि त्याबद्दल काहं मोबदला अगर मानधनही स्वीकारले नाही. त्यांची ही आठवण दीर्घकाल राहणारी आहे. संस्था त्यांची कायमची ऋणी आहे.

दीपावलीचा जानेवारी १९७१ चा लंडन विशेषांक हिंगणे स्त्री-शिक्षण संस्थेला अर्पण करण्यात आलेला आहे. त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्याकरिता श्री. सीताबाई अण्णिगेरी व मी केनेडी पुलाजवळच्या कचेरीत गेलो होतो. त्यांना येण्यास उशीर लागला व मला दुसरीकडे जावयाचे असल्याने थांबता आले नाही. '१०-१५ दिवसांनी पुन्हा मुंबईस येईन तेव्हा भेटेन' असे सांगून मी गेलो. श्री. सीताबाई अण्णिगेरी थांबल्या. त्यांची भेट झाली, ती अखेरचीच ठरली. मला मात्र भेट न झाल्यामुळे फार हळहळ वाटली व दुःख झाले. कारण पुण्यात आल्यावर वर्तमानपत्रात देहावसानाची बातमी वाचली व मोठाच धक्का बसला. दलालांची चित्रे त्यांची स्मृती चिरकाल ताजी ठेवतील यात शंका नाही.

-- भा. धों. कर्वे

---

शाचा पाठीमागून प्रकाशझोत फेकणारा दिवा... आणि त्या लख्ख प्रकाशात शिल्पासारखे दलाल बसायचे...

आता बाकी इतिहास...

दलालांची कला सर्वांना दिसली. त्यातलं मर्म जाणवलं. पण माझ्यासारखा वेडा त्यात सापडणं कठीण. कारण दलालांनी रेखाडलेली स्त्री मी माझी प्रेयसीच मानली. ठाऊक आहे, ही मनाची विकृती. तरीही त्याभोवती मी प्रेमकाव्यें गुंफली. याबाबत एकदा दलालांना म्हटलेसुद्धां...

"तुमच्या चित्रमय स्त्रियांकडे पाहून मी प्रेमकाव्यें केली आहेत."

"काय म्हणताय?"

"हां, पहा.."

मी त्यांना खिशातले कागद काढून त्यांच्या हाती दिले...

स्वप्नासम तू तरल यौवना
धुंदमधुमती अधीर लोचना
सुंदरी, सांग तू कोण?

हे प्रणयगीत मी त्यांच्या ७० सालच्या ऑगस्ट अंकावरील मुखपृष्ठ पाहून लिहिलं होतं....

दुसरं...

श्रावणात मन झाले अवचित
रंगीत मोरपिसारा
पाचूचे वन आले ओठी
फुलवूनि सूर फुलोरा!

हे भावगीत मी ६७ सालच्या ऑगस्ट अंकावरील मुखपृष्ठावरून लिहिलं.

अशीच कितीतरी भावगीतं...

कागदांवरून नजर फिरवून दलाल फक्त हसले. बोलले नाहीत. पण त्यावेळचा त्यांचा हसरा चेहरा अधिक बोलका झाला होता. शब्दापलिकडे काही-तरी सांगून गेला होता.

आता माझ्यासमोर दलालांची काही चित्रे आहेत... तोच चित्रांच्या रूपानें दलालांचा सहवास.. गप्पा... हास्य... रंग..शब्द..सूर..नाट्य..

ग्रंथ तीन प्रकारचे असतात असं इब्सेननं म्हटलं आहे. पहिल्या प्रकारातले ग्रंथ हे जीवनाला अगदी जवळचे असतात. ते नसतील तर जीवनाला अर्थ नाही. जीवन पोरकं होईल. उध्वस्त होईल. मनुष्याच्या अस्तित्वाला फोलपणा येईल. दुसऱ्या प्रकारातले ग्रंथ हे संदर्भापुरतेच आपल्याला हवे असतात. तिसऱ्या प्रकारातले ग्रंथ वाचले काय, न वाचले काय, सारखेच. त्यामुळे काही अडत नाही. जीवन पोरकं होत नाही. याच संदर्भात बोलायचं तर, दलालांची चित्रं ही पहिल्या प्रकारात मोडतात. ती जीवनाला जवळची आहेत. त्यातील रंग.. रेखा... जीवनमय आहेत... कारण एका समर्पित जीवनाचं ते एक प्रतिबिंब आहे... ती चित्रं मलूल मासणार नाहीत... होणार नाहीत...

दादांच्या ज़ीवनापुढे काळाने अचानक पूर्णविराम टाकला ! त्यावेळी मी गोव्यात होतो. तेथे जाऊन मला पुरे तीन दिवस सुद्धा झाले नव्हते. 'नटसम्राट'चे गोव्यात प्रयोग ठरले होते. पूर्व तयारीसाठी मला तेथे जाणे अगत्याचे होते. दादा संस्थेच्या कला विभागाचे अध्यक्ष. त्यांना ह्या कार्यक्रमाची सर्व कल्पना होती. त्यांचा निरोप घेऊनच मी गोव्यात गेलो होतो. तसे पाहिले तर मी गेलो त्यावेळी त्यांची प्रकृती उत्तम होती—पण मन? त्या दोन तीन दिवसात त्यांचीच काय पण आम्हा सर्वांचीच मानसिक प्रकृती विघडली होती. त्यावेळी आम्हा सर्वांवर एक फार मोठा आघात झाला होता. आम्हा असोसिएशनच्या कार्यकर्त्यांचे एक निकटवर्ती आणि संस्थेचे एक कळकळीचे कार्यकर्ते प्रभाकर शिरवैकरांचे १३ जानेवारीला निधन झाले होते. शिरवैकरांचे अंत्यदर्शन घेऊन मी गोव्यास गेलो होतो. अत्यंत अस्वस्थ मनाने मी तिकडे वावरत होतो. सर्व काही करत होतो कर्तव्य म्हणून. आणि अशा स्थितीत दि. १६ रोजी सकाळी फोनवरून दादांसंबंधीची अनपेक्षित वातमी मला कळविण्यात आली. अंगावर कडाच कोसळला. तीव्र दुःख झाले. काय करावे, काहीच सुचेना. हातातले काम तसेच टाकून दादांचे शेवटचे दर्शन घ्यावे म्हणून मी विमान गाठले. दुर्दैवाची गोष्ट ह्या धडपडीचा काही उपयोग झाला नाही. मी मुंबईत दोन तीन तास उशीरा पोहोचलो.

गेल्या वीस वर्षात त्यांचा आणि माझा जुळून आलेला संबंध, दादांचे मला लाभलेले अकृत्रिम प्रेम, संस्थेच्या कार्यात त्यांच्याकडून मिळत असलेले मार्गदर्शन, नाटकाच्या निवडीपासून तो रंगमंचावर येईपर्यंत त्यांचे होत असलेले साहाय्य, कला-विभागाने अंगिकारलेल्या प्रत्येक नवीन उपक्रमास त्यांचा मिळालेला आधार, आम्हा कलाविभागाच्या कार्यकर्त्यांचे अत्यंत जिव्हाळ्याने पण मोजक्याच शब्दात कौतुक करण्याची त्यांची पद्धत, ह्या गोष्टींचा चित्रपट मी पहात होतो.



श्री. दलाल यांच्या समवेत श्री. वि. वा. शिरवाडकर, श्री. रामकृष्ण नायक आणि श्री. स. सी. गुडे

# आणखी एक आधार गेला

## रामकृष्ण नायक

दादांना मी माझ्या घरी मडगांव येथे प्रथम पाहिले. मुंबईच्या आर्ट स्कूलचा डिप्लोमा घेतल्यानंतर त्यांनी आपल्या कलाजीवनास सुरवात केली होती. त्यांची पुस्तकांच्या आणि नियतकालिकांच्या सजावटीची चित्रे सर्वत्र दिसू लागली होती. चित्र साप्ताहिकाच्या राजकीय व्यंगचित्रांनीही त्यांनी लोकांचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले होते. मुंबई आर्ट सोसायटीच्या प्रदर्शनातही त्यांची चित्रे दिसू लागली होती. त्यावद्दल त्यांस पदकेही मिळाली होती आणि त्याच सुमारास ते मडगांवी आले असावेत. माझ्या वडिलांनी त्यांना चहाला वोलाविले होते. माझ्या कल्पनेपेक्षा प्रत्यक्षातली व्यक्ती निराळी निघाली. पैजामा, शर्ट व ब्लू सर्जचा कोट या साध्या वेषातील हा माणूस माझ्या मनात काही ठरेना. सगळा वेळ माझे वडिलच बोलत होते. त्यांना निरनिराळे प्रश्न विचारीत होते. पण ह्या सगळ्या भेटीत 'हो' किंवा 'नाही' या शब्दांपेक्षा जास्त काही दादा वोललेले मला आठवत नाही.

त्यानंतर काही काळाने मी माझ्या पुढील शिक्षणाकरिता मुंबईस आलो त्यामुळे त्यांची भेट होऊ लागली, हळुहळु परिचय वाढत गेला. मी त्यांना दादा म्हणू लागलो. आणि तेच नाव नंतरच्या काळात आमच्या ॲसोसिएशनच्या वर्तुळात कायम झाले. दादा वयाने माझ्यापेक्षा मोठे—वयानेच का ? इतर सर्व दृष्टीने ते माझ्यापेक्षा मोठे होते ! सुरवातीला तरी वयाची मर्यादा संभाळून मी त्यांच्याकडे वागत वोलत होतो. पुढे जसे संबंध वाढत गेले तेव्हां वयाची बंधने केव्हां शिथिल झाली आणि जिवलग मित्रत्वाच्या बंधनांनी आम्ही केव्हां बांधले गलो हे समजले सुद्धा नाही.

गेली साडेदहा वर्षे ते गोवा हिंदु ॲसोसिएशनच्या कला-विभागाचे अध्यक्ष होते. आपला व्यवहार जितक्या कसोशीने ते चालवीत तेवढीच कसोशी आणि तळमळ त्यांनी कला-विभागाच्या कार्यात ओतली. दादांच्या 'दीपावली'स २५ वर्षे पुरी झाली ही संधी साधून आम्ही ॲसोसिएशनच्या कार्यकर्त्यांस त्यांच्याबद्दल वाटत असलेले प्रेम अगदी घरगुती स्वरूपाचा समारंभ करून व्यक्त करावे असे आम्ही ठरवले. या समारंभास जाहीर स्वरूप येणार नाही याची आम्ही खात्री दिल्यावरच दादांनीही अशा समारंभास संमती दिली. शिरवैकर यांस साठ वर्षे पुरी झाली होती. त्यांचाही आम्हास अशाच प्रकारचा सत्कार करावयाचा होता; पण ते मध्येच आजारी पडले—आणि त्यांच्या निधनानंतर तीनच दिवसात दादाही गेले. आमच्या इच्छा तशाच राहिल्या. त्यांच्या निर्व्याज आत्मीयतेला आम्ही कायमचे मुकलो.!

● ●









अनुक्रमणिका

## शेवटची भेट

दलालांची अन् माझी शेवटची भेट झाली ती चंदनवाडीच्या विद्युत्‌दाहिनीत, आम्हा दोघांचे मित्र प्रभाकर बाब शिरवईकर यांच्या अंत्यसंस्कारांच्या निमित्ताने! ती जागा माझ्या परिचयाची होती तशी त्यांच्या नव्हती. मी त्यांना तेथील सारी यंत्रणा समजावून सांगत होतो, आणि तेही जातीच्या रसिकासारखे "वा छान!" असे म्हणत त्या शास्त्रोक्त सोयींची तारीफ करीत होते.

त्या आधीच काही दिवस दलालांच्या 'दीपावली'चा रौप्य महोत्सवी सोहळा मोठ्या थाटात आणि आनंदात चौपाटीच्या समुद्रकिनाऱ्यावर साजरा झालेला होता.

शिरवईकर बरेच दिवस अंथरुणाला खिळून होते. "तुमचा समारंभ होईपर्यंत त्यांचा आत्मा रेंगाळत राहिला नाही?" मी दलालांना म्हटले, "हो, थोर माणूस! मित्रकार्यांत विक्षेप न आणता, आदत ठेवून जग सोडून गेला!" ते म्हणाले.

त्या संध्याकाळी कल्पनाही नव्हती की खुद्द या चित्रकाराची जीवननौकासुद्धा पैलतीराला जायची वाट पाहात राहिलेली आहे!

तीन वर्षांपूर्वी आम्हा दोघांचे दुसरे एक प्रिय मित्र गोपालकृष्ण मोवे अपेक्षा नसता मरण पावले. थेट तसेच दलालही गेले, पस्तीस महिन्यांच्या अंतराने.

तीन वर्षांत तीन रसिकांचा ऐन पन्नाशीच्या आतबाहेर अंत झाला.

आता मला आठवते, 'दीपावली'ची रजतरजनी फुलून आली होती त्या क्षणी सागराला ओहोटी लागलेली होती. भवितव्यात दडून राहिलेल्या भयंकर घटनेची ती पूर्वसूचनाच होती असे आता मागे वळून पाहताना वाटते.

—ज्ञानेश्वर नाडकर्णी



## रंग-रेषेचा पुजारी

करी घेऊनी कुशल कुंचला
किती नटविल्या मोहक ललना
रेषा-रंगातुनि मिरविल्या
'भास', 'भवभूति'–'नाटयनायिका' १

'शृंगाराची' लज्जत न्यारी
रसिक 'नायिका' घालि रुंजी
"भाग्यविधाते" चित्रांजलिची
अपूर्व जडली तुजवर मर्जी २

'अमृत मेघ' ते फिरता गगनि
कृष्ण मेघ का नभ झांकोळी?
वर्णमालेतील "द"च लोपता
उरले अपुरे शब्द नि ओळी ३

'दीनानाथ' तुम्ही, अनाथ आम्ही
सोडुनि जाता गातो विराणी
या शब्दांना रंग नसे तरी
भाव गंध तो वाहील झरणी ४

—नंदकुमार प्रभुणे

## दलालसाहेब अमर आहेत

श्री. दीनानाथ दलाल यांचे अकस्मात निधन झाल्याची बातमी कळली नि धक्काच बसला मला. बेसवर खूप दिवसांची साचलेली डाक, विमानातूनच फार उशीरा आली. सीमेवरील या अंतिम चौक्यांवर असला उशीर नेहमीच होतो. या पत्राद्वारे दीनानाथांना श्रद्धांजली अर्पण करतो.

त्यांची चित्रे इकडच्या सैनिकात व वैमानिकात अतिशय प्रिय आहेत. कित्येकांनी आपल्या बंकर्सच्या व बरॅक्सच्या भिंतींवर त्यांच्या चित्रनायिकांना स्थान दिलेले आहे. गेल्या दीड-दोन वर्षापासून हिंदी पॉकेट-बुक्सच्या कव्हरवरही ते प्रामुख्याने दिसू लागले होते. हिंदी वाचक इतकी सुरेख, लयबद्ध व रेखीव चित्रे पहिल्यांदाच पाहत होते. अखिल भारतीय यशाच्या वाटेवर त्यांची वाटचाल चालू असतानाच त्यांनी आपल्यातून उठून जावे, हा केवळ दैवदुर्विलासच!

सीमेवरील मित्रांना मी ही दुर्दैवी घटना सांगितली तेव्हां ते सर्वच हळहळले. दलाल साहेबांच्या कलेला भाषेची, प्रांताची अँगर गणवेषाची वगैरे कसलीच बंधने नव्हती... सर्वांनाच त्यांची उणीव भासेल... पण दलालसाहेब आपल्यातून खरंच गेलेत का? मला वाटते जोपर्यंत त्यांची चित्रे रसिकांजवळ आहेत. सैनिकांच्या बंकर्समध्ये त्यांच्या चित्रनायिका तेथील वातावरण प्रसन्न करीत आहेत तोपर्यंत ते अमर आहेत.

—अशोक प्र. मोटे
फ्लाइट लेफ्टनंट








# संपादक दलाल

— ना. व्यं. देशपांडे

'दीपावली'चा दिवाळी अंक ऐन दिवाळीच्या दिवशी किंवा दिवाळीच्या आदल्या दिवशी अगदी वाजत गाजत यायचा. अंकावरचे कव्हर उघडून अंक बाहेर काढला की दिवाळीचे अभ्यंगस्नान झाल्यासारखे वाटे! चित्त प्रसन्न होई. दिवाळी अंकात ज्यांचे साहित्य प्रसिद्ध होते त्यांना अंक 'पाठविला' जातोच. पण दीपावलीचा अंक येण्यात काही विशेष होते. पहिल्याच मलपृष्ठावर दिवाळी शुभेच्छा व्यक्त केलेल्या दिसत. त्याखाली 'दीनानाथ दलाल' अशी वेगळ्या रंगाच्या शाईमध्ये स्वाक्षरी केलेली असे. अंकासोबतच वेगळ्या पाकीटातून लेखकाचे मानधनही त्याच दिवशी येत असे. छापील अंकावरील हा हस्तलिखित मजकूर आणि संपादकाची 'दस्तुरखुद्द' लेखकाबरोबर एक वेगळेच नाते जोडून जाई ! जीवनात जे जे काही सुंदर आहे त्याचा ध्यास दलालांना होता. त्याचा सतत पाठपुरावा त्यांनी जन्मभर केला. पण त्या ध्यासाला माणुसकीचे मुलायम अस्तर असायचे. त्यामुळेच की काय, उत्कट सौंदर्याने ते स्वतः फुलत राहिले व दुसऱ्यांना फुलवीत राहिले.

मला 'अजून' विशेषांकाचे दिवस आठवतात. एक दिवस सहज गप्पा मारता मारता श्री. दा. गो. देशपांडे यांनी त्यांना सहज कल्पना सुचविली. दलालांना ती आवडताच त्यांनी तेथल्या तेथेच बेत पक्काही केला. फायद्या तोट्याचे हिशोब मांडून नसता घोळ घालीत बसले नाहीत. जीवनाच्या या आवश्यक अंगाकडेही त्यांचे लक्ष चोख असे, नाही असे नाही. परंतु एकदा मनाने एखादी गोष्ट करायची म्हटले की ते मागेपुढे पहात नसत. तेथे हात आवरता घेत नसत. या अंकासाठी त्यांनी मुद्दाम नवीन मुखपृष्ठ तयार केले. अंकाची मांडणी, तारीख वगैरे बाबत तावडतोब निर्णय घेऊन टाकले व आगामी अंकाची जाहिरातही करून टाकली ! जानेवारी १९७१ चा 'लंडन विशेषांक' ज्यांच्याकरिता काढला त्या लंडनवासीय लेखक मित्रांनाही असाच सुखद अनुभव आलेला असणार !

'दीपावली'च्या कार्यालयात, दलालांच्या समोरच्या खुर्चीत मी क्वचितच बसत असे. माझा आवडता छंद म्हणजे त्यांच्या उजव्या हाताला असलेल्या खुर्चीत बसणे व त्यांची आणि त्यांच्या समोर बसलेल्या माणसांची संभाषणे ऐकणे...या संभाषणांच्या द्वारा दलाल मला अधिक प्रतीत होत. समोरील व्यक्ती कोणीही असो, दलाल कधीही गुळमुळीत बोलल्याचे मला आठवत नाही. त्यांची मते स्पष्ट आणि निर्भीड असत. पण त्यामध्ये कटुता किंवा स्वभावाचा तिरकसपणा कधी आढळायचा नाही. दलालांनी केवळ साहित्याचे संपादन केले नाही. त्यांनी माणसेही संपादन केली होती. नजर खिळवून टाकणाऱ्या आणि रंगातला आनंद थेट रसिकाच्या अंतःकरणात पोचविणाऱ्या रंगाकृती निर्माण करणारे रंगसम्राट म्हणून दलालांचा दबदबा होताच. अशा चित्रकार-संपादकाचा परिचय असणे म्हणजे आपली उंची वाढणे. तिऱ्हाईतांच्या नजरेत हा भाव असे. ही माणसे माझ्याबरोबर कधी कार्यालयात आली की दलालांच्या भेटीने काहीशी गोंधळून जात. "अगदीच साधे आहेत की तुमचे दलाल" अशी त्यांची प्रतिक्रिया व्हायची. या त्यांच्या अनलंकृत अपेक्षाभंगातच दलालांचे मोठेपण दडलेले आहे.

कलावंताला व्यवहार जमत नाही असा अनुभव आहे. दीनानाथ दलाल याला अपवाद असावेत. या दोन्ही गोष्टी त्यांना कशा जमत असत याचे मला नेहमी कोडे पडत आलेले आहे. कलावंत आणि व्यवहार या द्वंद्वाप्रमाणेच दलालांच्या सुरम्य रंगाकृती आणि त्यांच्या 'उदरविदारक 'विंगचित्रमाला' या द्वंद्वाचेही मला कोडे आहे. जीवनाकडे पाहाण्याचे हे दोन स्वतंत्र दृष्टीकोन आहेत. त्यांचा समन्वय दलालांसारखा साधकच करू जाणे ! साहित्यिकांच्या गप्पाष्टकांत, मित्रांच्या मेळाव्यात सुरम्य रंगाकृतीमध्ये, जीवनातील मर्मभेदक व्यंगे अचूक उलगडून दाखविणाऱ्या व्यंगचित्रांमध्ये किंवा खुद्द दीपावलीच्या संपादनात 'प्रतीत' होत, पण त्याहून ते नेहमी पलीकडे उभे असल्याचा भास मला सतत होत आला आहे. त्यालाच मी 'निसटणे' असे म्हणतो. ही किमयाही त्यांना साधलेली होती. आपल्या लाडक्या 'दीपावली'चा पंचविसावा वाढदिवस मोठ्या कौतुकाने, आपुलकीच्या नि जिव्हाळ्याच्या विसतंतूंनी जोडलेल्या इष्टमित्रांच्या सहवासात साजरा करून दलाल न सांगता न सवरता असेच 'निसटून' गेले ! ● ●

## दीनानाथ दलाल

जन्मला घेउनी ऐसे, नेत्र रंगीत की असे ।<br>
चित्रात खेळवी ते ही, चित्र संगीत ते असे ॥<br>
जीवनी सार्थ हा झाला, सप्तरंगी तरंगला ।<br>
कुंचला तो दलालांचा, दिसे आज विसावला॥<br>
चित्र-गंगा जाहली की, आज खंडित तेथही ।<br>
ढाळताती रंग-रेषा, अश्रु नी 'दीपावली'ही

— पंडित महाजन








# दलाल - एक आगळा कलाकार



--रा. वि. डोंगरे

कै. दलाल यांचा नि माझा १९४५ पासूनचा परिचय होता. व्यवसायाच्या निमित्ताने माझा अनेक व्यावसायिक चित्रकार व कलावंत यांच्याशी संबंध आला. ह्या सर्व कलावंतात कै. दलाल केवळ उत्कृष्ट चित्रकलेच्याच दृष्टीने नव्हे तर त्यांच्या अंगी असलेल्या काही खास गुणानी आगळे ठरले. वक्तशीरपणा व व्यावसायिक व्यवहारातील काटेकोरपणा हे साधारणतः यशस्वी कलावंतात आढळत नाहीत. कै. दलाल हे मात्र त्याला अपवाद होते. चित्रांची रफ स्केचेस असोत वा तयार चित्र असो त्यांनी आधी दिलेल्या वेळेनुसार ते मिळाले नाही असे कधीच झालेले नाही.

कै. दलाल यांनी व्यावसायिक चित्रकलेला उच्च दर्जा प्राप्त करून दिला. व्यंगचित्रकार म्हणूनच कै. दलाल यांची प्रथम प्रसिद्धी होती. व्यंगचित्रांचा राजकीय क्षेत्राव्यतिरिक्त उपयोग करणारे क. दलाल हे पहिलेच महाराष्ट्रीय किंवहुना भारतीय कलाकार असावेत. माझ्या कंपनीच्या उत्पादनाच्या जाहिरातींसाठीच त्यांनी प्रथम व्यंगचित्रे काढली.

कै. दलाल यांच्या बरोबरच्या दीर्घ सहवासात त्यांनी आमच्यासाठी दोन महत्वाची कामे केली. १९५० सालची गोष्ट आहे. बहुरंगी चित्रांचं कॅलेंडर तयार करण्यासाठी एखाद्या नव्या कल्पनेच्या शोधात मी होतो. सुप्रसिद्ध चित्रकार श्री. एन्. एस्. बेन्द्रे यांनी चर्चेच्या शोधात अशी सूचना मांडली की, एखाद्या कलाकाराला भारताच्या दौऱ्यावर पाठवावे व ठिकठिकाणी प्रत्यक्ष जाऊन त्या कलाकाराने निसर्ग चित्रांचं चित्रण करून त्या चित्रातील बारा चित्रं मी कॅलेंडरसाठी निवडावीत. ह्या योजनेसाठी एक आदर्श कलाकार म्हणून श्री. बेन्द्रे यांनी कै. दलाल यांचं नाव सुचविलं. "श्री. बेन्द्रे आलेले आहेत आणि एका गोष्टीबद्दल आपणाशी चर्चा करावयाची आहे" असा कै. दलाल यांना नुसता विनंतीवजा निरोप पाठविला आणि ते माझ्या कार्यालयात आले. सविस्तर चर्चा झाली. योजना ठरली आणि थोड्याच दिवसात कै. दलाल सुप्रसिद्ध साहित्यिक श्री.अनंत काणेकर यांच्यासह भारताच्या दौऱ्यावर गेले. दौऱ्यावरून परत आले ते बऱ्याच अत्युत्कृष्ट आणि सुंदर अशा अनेक चित्रांसहच. मला वाटते एखाद्या कलाकाराने केलेली ही पहिलीच कामगिरी असावी.

छत्रपती शिवाजी महाराजांच्या राज्यभिषेकाचे एखादे तैलचित्र तयार करून घेण्याची माझी इच्छा होती. एका ऐतिहासिक कादंबरीत ह्या प्रसंगाचं वर्णन माझ्या वाचनात प्रथम आलं. मी ह्या बाबतीत कै. दलाल यांच्याशी चर्चा केली. तेव्हां त्यांनी त्वरीत ही कामगिरी अत्यंत हौसेने स्वतःच स्वीकारली. ह्या फार मोठ्या कामगिरीमुळे कै. दलाल यांच्या इतर कामाच्या वेळापत्रकावर परिणाम झाला असण्याचा संभव आहे. ह्या तैलचित्रामधील बारकाव्यांसह ऐतिहासिक दृष्टया अत्यंत चोख चित्रीकरण व्हावे म्हणून कै. दलाल डोळ्यांत तेल घालून जपत होते. शिवशाहीर श्री. बाबासाहेब पुरंदरे यांच्या बरोबर आमची चार पाच वेळा चर्चा झाली. राज्याभिषेकाच्या वेळी उपस्थित असलेल्या व्यक्ती-रेखा, त्यांचे पोषाख ह्या सर्व बाबतीत ह्या चर्चेतून ज्या गोष्टी निश्चित झाल्या त्यांचे तंतोतंत चित्रण कै. दलाल यांनी ह्या तैलचित्रामध्ये केले. कै. दलाल यांनी शिवाजी राज्याभिषेकाचे हे १०×४ फुटाचं तयार केलेलं तैलचित्र म्हणजे भारतात, ह्या विषयावरील तैलचित्रामधील सर्वात मोठ आणि सर्वोत्कृष्ट तैलचित्र असावे. हे तैलचित्र पूर्ण व्हायला सुमारे दोन वर्षे लागली. तैलचित्राचं काम चालू असताना कै. दलालांनी चित्राच्या केवळ रंगसंगतीकडेच बारकाईने लक्ष पुरविले असे नाही तर चित्रांच्या इतर बारकाव्यांकडेही लक्ष दिले. उदाहरण म्हणूनच जर सांगायचं झालं तर राज्याभिषेकाच्या खास समारंभासाठी शिवाजी महाराजांच्या मंत्र्यांनी घातलेल्या पोषाखाचे जे चित्रण क. दलाल यांनी त्या चित्रात केले आहे त्याचं देता येईल. ह्या पोषाखावरील जरीकाम चित्रित करण्यासाठी कै. दलाल यांनी आपला दीड दिवस खर्ची घातला. राज्याभिषेकाचे हे तैलचित्र म्हणजे कै. दलालानी काढलेल्या चित्रातील सर्वोत्कृष्ट चित्र असावे. हे महाराष्ट्र सरकारच्या प्रदर्शनात दोनदा ठेवण्यात आले होते.

कै. दलाल यांच्या अकाली निधनाने केवळ एक उत्कृष्ट कलाकारच नव्हे तर सच्चा सज्जन हरपला आहे.

● ●









# दोन दिसांची रंगतसंगत

**— मुकुंद सोनपाटकी, लंडन**

श्री. दलाल यांचा व माझा प्रत्यक्ष परिचय केवळ सहा आठ-वड्यांचा. तसे पत्ररूपाने भेटत होतो गेले सहा महिने. मी सुट्टीवर इकडे आलो आणि लगेच दुसऱ्या दिवशी त्यांना भेटायला केनेडी ब्रीजजवळ गेलो. त्यानंतर मोजून पंधरा वेळा तरी भेटलो असेन. प्रत्येक वेळी दृष्य एकच. त्या जुनाट चाळीतील दलाल आर्ट स्टुडि-ओचा तो दरवाजा लोटून आत शिरलो की हसून स्वागत करणारे डाव्या उजव्या हाताचे त्यांचे चित्रकार साहाय्यक. मग पुढच्या छोटया खोलीतील दलालांची छोटी मूर्ती. सदैव हातातील चित्रात रंग भरणारी. शेजारच्या आसनावरील साहित्यिकांशी रंग भरता भरता चर्चा करणारी. मध्येच कोंकणीत 'गोवा हिंदु ॲसोसिएशन 'चं काम फोनवर सांगणारी. प्रत्येकवेळी रंगाचा कुंचला व बालसुलभ हास्य बाळगलेली.

मला आठवतेय् पहिली भेट. त्यांना माझं पाणी जोखायचं असावं. तसं विचारांचं आदानप्रदान पत्रांतून झालेलं होतंच. मी आत शिरलो. नाव सांगितले. त्यांनी रोखून पाह्यलं म्हटलं, "तुम्ही आम्हाला थोडा अधिक वेळ द्यायला पाहिजे होता हो!" एक क्षणभर गप्प व मग दिलखुलास हसले. दीपावलीचा 'लंडन विशेषांक' माझे दोन मित्र व मी मिळून काढत होतो. नेहमी नवीन प्रयोग करणाऱ्या दलालांचीच ती 'आयडिया' होती. मी आग्रह धरला होता १ जानेवारीला अंक बाहेर पडावा म्हणून. दलालांना अंक अधिक 'कडक' करण्याकरता २६ जानेवारी विशेषांक म्हणून 'लंडन विशेषांक' काढायचा होता. आमच्या काही अडचणी होत्या. शेवटी दलालांनी मोठेपणा दाखवला. अंक १ जानेवारीलाच बाहेर आला.

नऊ जानेवारीला बिर्ला क्रीडा केंद्रात 'दीपावली'चा पंचविसावा वर्धापनदिन. स्वतःचं वाङ्मयीन अपत्य इतकं मोठं झालेलं पाहण्याचं भाग्य लाभलेले दलाल. समुद्रकिनाऱ्याच्या त्या अविस्मरणीय भोजनप्रसंगी पंक्तीतून फिरणारे दलाल. परिचय-संमेलनातील ती उत्साहमूर्ती. जितेन्द्र अभिषेकींच्या गाण्यात भिजणारे श्रोते व ते अवीट दृष्य बघणारे दीनानाथ दलाल.

आता त्यांच्या ऑफिसमधील ती रिकामी खुर्ची बघवणार नाही. इतकं अकल्पित क्रूर कृत्य काळ करू शकतो हे पटत नाही. दीपावली लंडन विशेषांकाच्या लंडनमधील प्रकाशन समारंभाच्या आमंत्रणपत्रिका मी बरोबर नेत आहे. ज्यांच्या कलापूर्ण दिलदार वृत्तीवर लंडनला स्तुतीसुमने उधळायची त्या दीनानाथ दलालांवर श्रद्धांजली वाहण्याचा प्रसंग यावा ना? त्यांच्या सुंदर चित्रांचा 'वन मॅन शो' करण्याकरता मी त्यांना लंडनला यायचे आमंत्रण दिले होते. त्यांनी ते स्वीकारलेही होते. आता कसचे दलाल लंडनला येतात. लंडनपेक्षाही खूप लांब इंद्राच्या अमरावतीला, त्यांनी ज्या अप्सरा, उर्वशी व देवांगनांची चित्रे काढली, त्यांच्याच कडून दलालांच्या कलेचे मोल सांगितले जातेय.

---

# धन्य ते रेखनी कळा

**र. बा. केळकर**

आमच्या प्रगत कला महाविद्यालयाचे छोटेसे संमेलन करायचे विद्यार्थ्यांनी ठरवले आणि त्याचे अध्यक्षपद कुणाला द्यावयाचे असे मी त्यांना विचारले असता सर्वांनी 'दीनानाथ दलाल, दीनानाथ दलाल' असा घोष केला. मला फार बरे वाटले. गेल्या डिसेंबरमध्ये येथे भरलेल्या चित्रकला प्राध्यापकांच्या राज्यपरिषदेच्या वेळी प्रात्यक्षिक करण्यासाठी दलालांना बोलावले होते. तत्पूर्वी अखिल भारतीय विद्यार्थी परिषदेच्या नगरशाखेने एक भेटकार्ड स्पर्धा ठेवली होती. तिच्या बक्षीस समारंभासाठी अध्यक्ष-स्थान स्वीकारण्याबद्दल दलालांना बोलावले होते. विद्यार्थीवर्गांवर इतकी जबरदस्त छाप त्यांची होती. विद्यार्थ्यांच्या इच्छेला मान देऊन मी त्यांना आमंत्रण देण्यासाठी मुंबईला यायला निघालो होतो. पुण्यास रविवारी सकाळ (दि. १७।१।७१) वाचला आणि मला धक्काच बसला!

"हा हन्त हन्त रेखनी यम उज्जहार!" अशी पंक्ती चटकन स्मरून गेली! माझा विश्वासच बसेना! काही सुचेना. म्हणून चित्रकार लचके यांचेकडे गेलो. त्यांचीही तीच मनःस्थिती. भय्यासाहेब ओंकार हे दलालांना गुरुस्थानी मानतात. ते आजारी होते खूप महिने. अत्यंत भावनाप्रधान. त्यांचेकडे गेलो. तेही सुन्न झालेले! आपला नात्याचाच माणूस गेला असे दुःख झाले सर्वांना. मला तर काही सुचेना. मी नगरला परत आलो. विद्यार्थ्यांना सांगितले की, मला तर वेड्यासारखे झाले आहे. संमेलन करूच नये. विद्यार्थी म्हणाले, सर दलालांचा फोटो ठेवू अध्यक्षपदी आणि संमेलन साजरे करू. आमचे विद्यार्थी खेड्यापाड्यातले पण त्यांची दलालांवरची ही गाढ श्रद्धा पाहून माझे मन भरून आले. दलाल ते दलालच. गेल्या तीन तपांत दलालांनी महाराष्ट्राला जे सौंदर्यदान केले आहे असे दुसरे कुणीही नाही! सर्वच सुंदर, रेखाचित्र असो, व्यंगचित्र असो, टीकाचित्र असो अथवा चित्रपटगृहाची सजावट असो. ते सर्व त्यांचेच! अहमदनगर येथे ३८ साली भरलेल्या साहित्य संमेलनाच्या प्रदर्शनाचे स्वागताध्यक्ष म्हणून भाषण करताना झारापकर मासिकाचे सजावटीबद्दल मी दीनानाथ दलाल यांचेबद्दल जे भाकीत केले होते ते खरे ठरले. माझ्या कल्पनेपेक्षा शतपटीने खरे ठरले. मला अनेक चित्रकार माहीत आहेत. माझे अगदी निकट स्नेही आहेत. त्यात दलालांबद्दलचे का निराळे वाटते? याचे कारण एकच. दीनानाथ दलाल माणुसकीला जपणारे होते, सत्याला स्मरणारे होते, सौंदर्याची उधळण करणारे होते. मांगल्याचा मागोवा घेणारे होते. त्यांची कलाधुंदी अंदाधुंदी मानणारी नव्हती. देशाची कुरूपता त्यांना नाहीशी करायची होती. मी दलालांना गेली तीन तपे ओळखतो. कलाक्षेत्रातील इतका राजबिंडा कलावंत माझ्या पाहण्यात नाही. त्यांनी कुणाचाही मत्सर केला नाही. कुणालाही पाडले नाही. उलट अनेक लोकांना त्यांनी प्रसिद्धी दिली आहे. त्यांनी कुणाच्याही प्रगतीत धोंड आडवी घातली नाही.

दलाल आता परमेश्वरस्वरूप झालेत. जोपर्यंत चंद्र-सूर्य आहेत तोपर्यंत दीनानाथ दलालांची चित्रकला, रंगकला, चिरंतन अशी राहील. त्याच्या टाकांच्या फटकाऱ्याकडे पाहून अजूनही कैक वर्षे रसिक 'धन्य ते रेखनी कळा' म्हणून गौरव करीत राहतील. त्या चित्रसृष्टीच्या परमेशाला माझा नमस्कार. ● ● ●



अनुक्रमणिका





# मालक संपादक–दलाल

— कृ. वि. पेठे



गेली सव्वीस वर्षे 'दीपावली' हे नियत-कालिक पहिली चौदा वर्षे वार्षिक स्वरूपात आणि नंतरची बारा वर्षे मासिक स्वरूपात प्रसिद्ध होत आहे. वृत्तपत्र व्यवसायात तीस वर्षांपेक्षाही अधिक काळ मी काम करीत आहे, आणि गेली चार वर्षे 'दीपावली'मध्ये संपादकीय-सहाय्यक म्हणून काम पाहात आहे. या काळातच श्री. दीनानाथ दलाल यांच्याशी घनिष्ट संबंध आला आणि प्रथमच एक गोष्ट लक्षात आली ती ही की आपल्या मासिकात छापून येणारा शब्दन्‌शब्द आधी वाचलेला आहे असा हा एकच मालक–संपादक आहे. बऱ्याच ठिकाणी मालकाचेच नाव संपादक म्हणून छापलेले असते, पण आपल्या नियतकालिकात काय छापून येणार आहे याचा त्याला पत्ताही नसतो आणि तो त्याची पर्वाही करीत नाही. श्री. दलाल हे मात्र अतिशय चोखंदळ संपादक होते. एखादाही शब्द योग्य नसला तर तो बदलल्याशिवाय त्यांना चैन पडत नसे.

संपादकाच्या अंगी अवश्य असणारा आणखी एक गुण म्हणजे अद्यावत वाचन. केवळ साहित्य-क्षेत्रातीलच वाचन नव्हे, तर राजकारणाचीही त्यातील अनेक वार-काव्यांसह अद्यावत माहिती जमवावी लागते. श्री. दलाल या कामी अत्यंत दक्ष संपादक होते. तसे नसते तर मर्मभेदक व्यंग आणि विगचित्रे काढून बड्या राजकीय व्यक्तींवर कोरडे ओढणे शक्य झाले नसते. व्यंगचित्रे नक्की करण्यापूर्वीही त्यांच्या स्वरूपाबाबत ते चर्चा करीत आणि त्याखाली द्यावयाच्या ओळीही चर्चा करूनच नक्की करीत.

श्री. दलाल अत्यंत शिस्तप्रिय होते. त्यांचा वचकही दांडगा होता. सर्व गोष्टी वेळच्या वेळी झाल्याच पाहिजेत याबद्दल त्यांच्याप्रमाणेच इतरांनीही दक्ष राहिले पाहिजे याबर त्यांचा कटाक्ष असे. शिस्त-भंग झाल्यास, ती व्यक्ती कोणीही असल्यास तिचा मुलाहिजा ते ठेवीत नसत. या त्यांच्या कडक शिस्तीमुळेच सर्व अंक वेळच्या वेळी आणि सर्वांगसुंदर रूप घेऊन प्रसिद्ध होत होते.

'दीपावली'चे प्रतिवर्षी सहा ते सात विशेषांक प्रसिद्ध होत; पण साध्याच अंका-वर 'विशेषांक' असे छापून ते अधिक किंम-तीला विकायचे असे श्री. दलाल यांनी कधीही केले नाही. प्रत्येक विशेषांकामागे विशेष प्रयत्न आहेत हे त्या त्या अंकांवरून सहज जाणवत असे. कुटुंब नियोजनविषयक जाहिराती देऊन त्याबाबतची 'खास पुरवणी' प्रसिद्ध करण्यासाठी सरकारी पत्रे येत. पुरवणीसाठी सरकारी मजकूरही येत असे! पण दलालांनी तसा कंठाळी मजकूर कधीच घेतला नाही. त्या विषयावर खास लेख अगर मुलाखत घेण्याची ते व्यवस्था करीत.

साहित्य निवडीबद्दलही ते अतिशय चोखंदळ होते. केवळ भिडेखातर म्हणून त्यांनी कोणाचाही मजकूर स्वीकारला नाही. त्याचप्रमाणे स्वीकारलेला मजकूर प्रसिद्ध झाल्यावर त्याबद्दलचे मानधन–मोबदला नव्हे–पाठविण्यास त्यांनी कधीही खळखळ केली नाही. 'वाचकांची पत्रे' या सदराखेरीज प्रसिद्ध होणाऱ्या इतर सर्व मजकुरासाठी ते मानधन देत असत. कुणा-चेही काहीही फुकट घ्यावयाचे नाही हे व्रत त्यांनी कसोशीने पाळले.

शेवटच्या दिवशी म्हणजे दि. १५ जाने-वारीला प्रकृती अस्वास्थ्यामुळे कार्यालयात येणार नाही असा त्यांचा निरोप आला होता, पण नंतर ते स्वतः आले. 'थोडयाशा घरगुती उपचारांनंतर बरे वाटले म्हणून आलो', असे ते म्हणाले. त्या दिवशींच्या बोलण्यामध्ये त्यांचे मित्र श्री. शिरवईकर यांच्या निधनाचाच विषय प्रामुख्याने होता. कै. शिरवईकर यांचे दहन विद्युद्दाहिनीत झाले. ती विद्युद्दाहिनी श्री. दलाल यांनी त्यावेळीच प्रथम पाहिली. त्या यंत्राची कार्यवाही त्यांना फार आवडली. 'अशा विद्युद्दाहिन्या गावोगावी झाल्या पाहिजेत आणि त्यातच दहन करण्याची सक्ती झाली पाहिजे' असे मत त्यांनी बोलताना सांगि-तले. याच बोलण्याची त्या दिवसभरात तीनचार वेळा पुनरावृत्ती झाली. निकट-वर्तीयांना ती सूचनाच होती की काय न कळे!

श्री. दलाल हे 'दीपावली'चे सर्वस्व होते. त्यांच्या निधनाने 'दीपावली' आणि 'दीपावली'चा कर्मचारी वर्ग आपल्या घरचेच कर्ते माणूस गेले असे मानतो. म्हणूनच सर्व कर्मचाऱ्यांच्या म्हणजे मधु-सूदन देसाई, गणपतराव बांदोडकर, नरेन्द्र मुर्के, सुभाष धामणकर, चंद्रकांत दळी, गणपत वारिक यांच्यावतीने दुःखित अंतः-करणाने वाहिलेली ही शब्द-सुमनांजली!

* * *







# दीनानाथ दलाल-- माझे संपादक

पभाकर अत्रे



दीपावली 'चा आणि माझा वाचक म्हणून संबंध फार जुना! पहिला एखाद दुसऱ्या वर्षाचा अंक माझ्याजवळ नसेल. बाकी सतत 'दीपावली' वार्षिकाचे वैभवशाली अंक मी विकत घेऊन संग्रही ठेवीत आलो आहे. 'दीपावली 'बद्दलचे प्रेम कळत नकळत वाढतच गेले आणि जेव्हां स्वतःच काही 'पांढऱ्यावर काळं' करायला लागलो तेव्हां मला मनोमन वाटायचं कीं, 'दीपावली 'त आपली गोष्ट यायला हवी. परंतु 'दीपावली' वार्षिकापर्यंत पोहचण्याची हिंमत माझ्यासारख्याला कोठून होणार? पण 'दीपावली' वार्षिकाचं मासिक झालं आणि तेवढ्या काळात माझेही काही कित्ते गिरवून झाले. आणि एके दिवशी मी एक कथा पाठवून दिली. आणि 'परतीची' वाट पहात बसलो. पण पत्र आले 'कथा स्वीकृत'! त्यावेळी मला झालेला आनंद शब्दातीत. त्या कथेचे नाव 'काश्मिरी शाल'! 'काश्मिरी शाल' १९६०।६१ मध्ये प्रसिद्ध झाली. त्यानंतर मी दोन कथा पाठविल्या त्याही स्वीकृत झाल्या; परंतु स्वीकृत साहित्याबाबत 'दीपावली 'च्या फायली इतक्या भरलेल्या असत (व आजही आहेत) की स्वीकृतीनंतरही कथा–साहित्य प्रत्यक्ष प्रकाशित व्हायला वर्ष दीड वर्षही लागे.

नंतरच्या काळात मी 'कथासागर'चे संपादन करू लागलो. ते मासिक बंद झाल्यावर एप्रिल १९६४ मध्येच दलालांचा मला निरोप आला 'येऊन भेटा'; एप्रिल १९६४ मध्ये मी 'दीपावली 'त पाऊल टाकले. नौकरी होती व आहेही. त्यामुळे नौकरी करून पडेल ते सहकार्य देण्याचे मी मान्य केले. आणि 'दीपावली' मासिकाची सारी सदरे माझ्याकडे आली. 'दीपावली' ही दलालांची पाचवी कन्या होती असं ते मानीत असत. तिचे रूप खुलावे. तिचे अंतरंग बहारदार व्हावे. जनमानसात 'दीपावली 'ला मानाचे व प्रेमाचे स्थान असावे यासाठी ते मनोमन तळमळत; धडपडत. संपादक म्हणजे आलेल्या साहित्यापैकी पाचुंदाभर साहित्य कंपोजला देऊन व मुखपृष्ठावर दिलचस्प चित्रतारकेचे चित्र देऊन मासिक काढणारा एक धंदेवाला ही दलालांची वृत्ती कधीच नव्हती. त्यामुळे आल्या आल्या 'आम्ही असे लिहितो' ह्या मुलाखतमालेचा प्लॅन ठरला. लेखकांच्या याद्या करतानासुद्धा त्यांनी लक्ष घातले. पण प्रत्येक मुलाखत घेताना वा घेतल्यानंतर त्यांनी माझे व त्या त्या लेखकांचे स्वातंत्र्य अबाधित राखले. मुलाखती उत्तम अशा स्केचेस काढून सजवल्या. 'आम्ही असे लिहितो 'च्या लेटरिंगचे वेगवेगळे ब्लॉक्स बनवून घेतले. जे करायचे ते मनापासून हातचे राखून नाही; प्रसंगी जादा खर्च करूनही करायचं अशी त्यांची जिद्द होती. त्या मुलाखतींपैकी रांगणेकर–बोरकरांना आपापली स्केचेस इतकी आवडली की त्यांनी ती दलालांजवळून मागून नेली. दलालांनीही साभिमान दिली. मुलाखती गाजल्या. त्याचे पुस्तक व्हावे अशाही सूचना आल्या. सारे पुस्तक छापून झाले. ते मी दलालांनाच अर्पण केले आहे. अर्पण पत्रिका, खांडेकरी प्रस्तावना व निवेदनाचा फॉर्म येताच मी त्यांना तो दाखवला. अर्पण पत्रिका पाहताच ते उद्गारले 'ओ! इट इज ए शॉक टु मी!"

स्वतःचा गौरव, सत्कार, उदोउदो, भाटगिरी त्यांना आवडत नसे. त्यांना आवडलेल्या एखाद्या गोष्टीबद्दल नापसंती व्यक्त केली तर ते अस्वस्थ होत; परंतु त्या लेखकाला वा रसिकाला 'दीपावली' चा दरबार बंद होत नसे.

'संपादक' म्हणून त्यांचा एक फार मोठा गुण माझ्या ध्यानी आला तो असा की, त्यांचं मन स्वच्छ होतं. मोकळं होतं. त्यामुळे त्यांना काही बऱ्या-वाईट सूचना करताना पसंती-नापसंतीची फिकीर वाटत नसे.

दलालांच्या सहवासात मी एक शिकलो. साहित्य, साहित्यिक, मासिकांचा धंदा व ध्येयवाद, समाजकल्याण व समाजक्रांती वगैरे वगैरे विषयांबाबतचं 'ग्लॅमर' माझ्या डोक्यातून पार गेलं. ते स्वतः अतिशय 'मॅटर ऑफ फॅक्ट' होते आणि त्यांनी काढलेल्या आयुष्या-











अनुक्रमणिका

तूनच ते आलं होतं. प्लेटॉनिक, हळवं, काव्यात्म, रडवं आणि गुळगुळित असं कुणी काही लिहिलं की ते म्हणत, "छेः बुवा, आपल्याला काही हे पटत, रुचत नाही." ही त्यांची भूमिका उगाच आली नव्हती. अनुभव, वाचन, चिंतनातून आलेली होती.

होय! अनुभव होताच. पण वाचनही चांगले होते. पाश्चात्य साहित्याचेही होते. एखादं पुस्तक वाचलं नसलं तर मागून नेऊन वाचीत. टीपा–टिप्पणी करीत. 'नवकथा'कार व 'नवकवीं'चाही रावता दलाल स्टुडिओत असे. चर्चेत सहज एखाद्या कथेचा 'मूळ' लेखक अचूकपणे दलाल सांगत आणि 'टाळी'ची दाद घेत व देत! नवीनांबद्दल त्यांना प्रेम होतं. पण 'ग्लॅमर' नव्हतं. दलाल मनस्वी होते त्यामुळे त्यांची दादही दिलखुलास असे आणि धिक्कारही तीव्र स्वरूपाचा असे.

दलाल माणूस म्हणून, कलाकार म्हणून व संपादक म्हणूनही फार मानी होते. आपल्या शक्ती-मर्यादांचीही त्यांना योग्य जाण होती. त्यातूनच ही वृत्ती आली होती. त्यांच्याकडून मुखपृष्ठ तयार करून घेण्यासाठी अनेक लहानमोठे लेखक-प्रकाशक येत असत. ते त्यांना चित्रांची कल्पना देत असत. त्यातलाच एक मजेशीर नमुना सादर करतो.

एकदा एक कादंबरीकार एका परिचिताच्या मध्यस्थीने त्यांच्याकडे आले. ते नवीनच होते व त्यांचीही ती पहिलीच कादंबरी होती. परिचय झाल्यावर लेखकाने कादंबरी सांगता सांगताच "हे चित्रात पाहिजे, हे हवं" असं सांगायला सुरुवात केली–संपूर्ण कादंबरी त्याने ऐकवली. त्यांनी ती शांतपणे ऐकून घेतली. त्यांच्यातला मानी कलाकार सतत सावध असे. तो मिश्किलपणे म्हणाला, "म्हणजे तुम्हाला सारी कादंबरीच मुखपृष्ठावर हवी म्हणायची" लेखक वरमला (असावा) काही वेळ जाऊ दिल्यावर ते त्याला म्हणाले, "असं करा. तुम्ही ते सारं माझ्यावर सोपवा. तुमचं काम तुम्ही केलं. माझं काम मला करू द्या. मला ह्यातलं काही कळतं असं मला वाटतं. म्हणूनच तुम्ही माझ्याकडे आलात, नाही का? विचार करून सांगा हवं तर! लगेच उत्तर हवं असंही नाही."

वऱ्हाड उठलं. गॅलरीत गेलं. पाच दहा मिनिटांत 'ठीक आहे'चा कौल देऊन बाहेर पडलं. 'तीनशे पानी कादंबरी मुखपृष्ठावर काढायची म्हणजे काय?' दलाल नंतर म्हणाले. काहींना ते सरळ 'दुसरीकडे जा' असेही सांगत. यंदाच्या (१९७०) दिवाळी अंकात त्यांनी कागदावर "बटिक"चा आभास उत्पन्न करणारी चित्रे काढली. दरवर्षीच ते काहीतरी नवेच करीत असत. ती पेंटिंग्ज आवडलेला भिलाईचा एक अधिकारी कॅलेण्डरसाठी ती चित्रे मागायला स्टुडिओत आला. चित्रांची त्याने तारीफ केली. ती शांतपणे ऐकून दलाल म्हणाले, 'किती काढणार कॅलेण्डर्स?'

"पाच हजार"

"तुम्हाला माझे दर परवडणार नाहीत."

गप्पा मारून, चहा पिऊन तो निघून गेला. त्यांनी व्यवहार सांभाळला. माणसेही राखली पण स्वतःला कधी 'चीप' होऊ दिले नाही. काही मान्यवर लेखकांनी 'दीपावली'च्या दिवाळी अंकाबाबतच्या पत्रांना 'पोच'ही दिली नाही (साहित्य दूरच) तेव्हा पुन्हा म्हणून दलालांनी त्यांना 'आवतण' धाडलं नाही. दलाल स्टुडियोत 'शाय' नव्हते. कलेतही नव्हते. पण व्यासपीठ, भाषण, सत्कार, मुलाखत ह्या गोष्टी ते टाळीत. अनेक मानाची आमंत्रणे त्यांनी नाकारली आहेत.

दलालांच्या चित्राप्रमाणेच त्यांची शिस्तही मोठी रेखीव! अंक–फॉर्म–फॉर्मचा हिशोब, व्यंगचित्रे, जाहिरात, मजकूर–परीक्षणे –सदरे–मुखपृष्ठ–सारं कसं सज्ज लागे. जाहिरातींची जागा बदललेली वा ले आऊटसची भरताड त्यांना चालत नसे. ते संतापत. ओरडत. अशा वेळी गप्प बसणे हा एकच मार्ग त्या त्या माणसाकडे असे. बेशिस्त, खोटेपण, डिव्हायडेड लॉयल्टीज् यांचा त्यांना भारी राग असे, पण त्यांचा राग हा क्षणिक असे. 'चूक होऊ नये' ही समज देण्यापुरताच! मग पुन्हा हशा, गप्पा व टाळ्या!

आता सारंच संपलं आहे; सारंच!

## 'दीपावली' मासिक –

### वर्गणीदारांसाठी

दीपावली यापुढे मासिक स्वरूपात प्रसिद्ध होणार नसल्याने वर्गणीदारांच्या वर्गणीचा आजवरचा हिशोब करून बाकीची वर्गणी परत करण्याचे ठरविले आहे. वर्गणीची रक्कम मार्च महिन्यात म. ऑ. ने पाठविण्यात येईल.

### लेखकांसाठी

मासिकासाठी ज्यांचे साहित्य स्वीकृत झाले आहे. ज्यांना ते साहित्य घेऊन जाणे शक्य व अगत्याचे असेल ते त्यांनी कार्यालयातून घेऊन जावे. अन्यथा आम्ही ते परत करीत आहोतच.

# तुमच्याशी खूप खूप बोलायचंय

— वसंत देशमुख

"तुमच्याशी मला खूप खूप बोलायचंय्.. अगदी खूप खूप" त्या भयानक दिवसाच्या आदल्याच दिवशी दलाल मला आवर्जून आवर्जून सांगत होते. स्वर कंपित झाला होता. भावनेनं ओथंबलेला

त्या सोहळयाला मी हजर राहू शकलो नव्हतो. असं काही तातडीचं सरकारी काम निघालं की मी ज्याम अडकूनच पडलो. कर्तव्य की मित्रप्रेम ? मला कर्तव्य पार पाडावंच लागलं... अन् दलालांचं दर्शन कायमचं गमावलं ! "तुम्ही येऊ शकला नाहीत. तुम्ही नि जयवंत दळवी... मला फार फार वाईट वाटलं... भेटूं सवडीनं... खूप खूप बोलायचंय् मला ... बहुतेक पुढल्या आठवड्यात '

रीसीव्हर खाली ठेवला गेला. माझ्या मनात उगाचच पाल चुकचुकली. रुख-रुख वाढली. दुसऱ्याच दिवशीच्या मराठ्यातली ती भयानक बॅनर लाईन्! डोळ्यावर विश्वास बसेना! वेडी आशा! वाटलं बातमी खोटी असेल. गैरमाहितीमुळं प्रसिद्ध झाली असेल. तडफडत उठलो. त्यांच्या परिसरात रहाणाऱ्या प्रा. देवांना फोन केला.

"ती...ती बातमी... दलालांची..खरी"

"होय!" रुद्ध स्वरात ते म्हणाले. रीसीव्हर मी धाड्कन् आदळला. मधु-मंगेशना फोन केला. त्यांना साधल्यांनी कळविलं होतं.......

मग... मग माझ्या डोळ्यातून क्वचि-तच ओघळणारे अश्रू सरसरले ! घरच्यांना फारच आश्चर्य वाटलं. दलालांविषयींच्या अनंत आठवणी पिंगा घालू लागल्या...

सहासष्ट साली गोव्याचा डायरेक्टर ऑफ् पब्लीसिटी म्हणून गेलो तेव्हां दलालांना केवढा आनंद झाला ! परतल्यावर मांडोच्या चार ओळी गाऊन दाखविल्या तसे आनंदानं ताडकन् उडालेच....."

हांग सायबा पडतरि वयता" वगैरे रोकोको आर्टचं एक सुरेख पुस्तक मला ब्रसेल्सला कुणी दिलं होतं. उत्तमोत्तम चित्रं होती पुस्तकात. चित्रं पाहून दलाल बेहद्द खूष झाले....नि मग एकाएकी गंभीर झाले.

"देशमुऽऽख ! मला...काही...काहीही येत नाही होऽऽ!"

ह्या सौजन्यानं मी साफ विरघळलो. ज्या रंगराज चित्रकाराच्या उजव्या हातानं महाराष्ट्राची शान झगमगीत ठेवण्यासाठी एवढा मोठा हातभार लावला होता, ज्याच्या कुंचल्यात इंद्रधनुष्याचे रंग सामावले होते ते रंगाचे जादूगार नम्र-पणे म्हणाले होते..."मला काही काऽहीऽऽ येत नाही होऽऽऽ !"

गोमन्तकीय गुणी बालकांवर शान्ता-दुर्गा अशी एकाएकी का वरं कोपली ? नियतीनं हा क्रूर सूड कुणावर उगविला? उत्तर नाही ! जीवनात बऱ्याच प्रश्नांची उत्तरं मिळत नाहीत !

चित्रसम्राट ! आकाशाच्या विस्तीर्ण कॅन्व्हासवर, इंद्रधनुष्याच्या कुंचल्यानी, बहुरंगी ढंगातले रंग वापरून स्वर्गात रंगजल्लोष साजरा करा दलाल ! गौरीशंकराच्या उत्तुंग शिखरावर ब्रशचा फटकारा जरी मारलात तरी कैलासनाथा-च्या बर्फाळ वास्तूला शोभा येईल. सुस्नात उमेच्या निथळणाऱ्या केशकला-पातले चार थेंब वापरून आमच्यावर शिंपडलेत तरी...तरी एवढ्या मोठ्या विदग्ध मित्रपरिवाराची मस्तकं किंचित शांत होतील...शांत होतील ! बाळ ठाकरे मला म्हणाले..."देशमुख! महाराष्ट्राचं नि चित्रकलेचं किती भयानक नुकसान झालं आहे त्याची पूर्ण कल्पना आज कुणालाच येणार नाही...ही...ही भयानक पोकळी कधीच..कधीच भरून निघणार नाही... !"



अनुक्रमणिका

(पान ३० वरून)

*** हरवलेला मधुचंद्र ***

छळतो मला! हे काय सांगायला हवं की आता तुम्ही मला हवे आहात. तुमच्या कुशीची ऊब मला हवी आहे. तुमच्या मिठीत मला झोपायचं आहे.

रागानं डोळ्यावर गुंगी आली. एवढ्यात एक झुरळ गालावर चढलं. त्याचे ते पाय आणि मिशा . . .

ओरडून लिनी बिछान्याबाहेर आली.

"काय झालं ग!"

थरथर कापत ती म्हणाली, "झुरळ, माझ्या बिछान्यात झुरळ आहे!"

न उठता अनंता म्हणाला, "चल ग कुठलं झुरळ? गलं असेल ते–!"

घाबरून लिनी म्हणाली, "अहो उठा ना. हुसका त्याला!"

"खालच्या बिछान्यात झुरळं फार असतात. तू वर ये!"

वर ये म्हणे! लिनीला राग आवरेना. आता रडू येतसं वाटलं. अनंतानं हात पकडला आणि हालकेच तिला वर खेचून घेतलं. मग राग पळाला, रडू विसरलं!

त्याच्या उबदार मिठीत ती खोल खोल शिरली. अनंताला तिला सांगायचं होतं– "मधाचं झुरळ नव्हतं. मीच तुझ्या गालावरून सूत फिरवलं" पण तो बोलला नाही. बोलायला त्याचे ओठ रिकामे नव्हतेच मुळी!

* *

---

**[६]**

"ए इकडे ये लवकर, तुला पार्वती पाहायची होती ना?"

"पार्वती, कोण पार्वती?"

"धन्य आहे तुझ्यापुढं. पार्वती–शंकररावांच्या सौभाग्यवती. तुझ्या मंगलमूर्तीच्या मातोश्री! त्या पाहा!"

लिनी गोंधळून गेली. अनंता हात दाखवत होता तिकडे पाहू लागली.

दार्जिलिंग ते सिंगलबझार ह्या रस्त्यालगतच असलेल्या उतरणीवर सिक्कीमी आणि दार्जिलिंगच्या स्त्रिया चहाची हिरवीगार पाने खुडत होत्या. पाठीशी बांधलेल्या बांबूच्या मोठ्याथोरल्या टोपल्यात खुडलेली पाने सफाईने टाकत होत्या. साऱ्यांचे चेहरे हसरे होते. वर्णन तांबूस गौर!

"दिसली नाही तुला? ती पिवळे जर्द कापड घातलेली, हिरव्या पानात पिकलेल्या लिंबासारखी दिसणारी–अग ती पहा अगदी डाव्या बाजूला उभी आहे!"

बारीक, किलकिल्या डोळ्यांची आणि एकदम चपट्या नाकाची एक ठेंगणीशी तरुणी अनंता लिनीला दाखवत होता.

"ती पार्वती?"

"हो!"

"हो काय? तिचं नांव पार्वती आहे?"

"नांव नसेल ग! पण तीच पार्वती!"

"काहीतरीच!"

"अग ह्या जन्माची नाही. अनेक जन्मापूर्वीची असणार. पण ती पार्वती नक्कीच! दिसते तर अगदी तशीच!"

"अहो पार्वती काय अशी होती?"

"मग कशी होती?"

"गोरीपान, सफेद साडी नेसलेली, चाफेकळीसारख्या, नाकाची, उंच शिडशिडीत–"

"पुरे पुरे, वर्णन तर असं करते आहेस की तू तिला नुकतीच मुंबईत भेटून आलेली आहेस. बरं मला सांग, पार्वती कुणाची मुलगी?"

"हिमालयाची!"

"मग त्या समोर दिसत आहेत ना, त्या सगळ्या हिमालयाच्या मुली आहेत. त्यांचे आई वडील, त्या आई वडिलांचे आई वडिल, आजोबा, पणजोबा सगळे इथलेच. मला सांग ह्यातल्या एकीचं तरी नाक चाफेकळीसारखं आहे का? एकीचे तरी डोळे कमळासारखे आहेत काय?"

लिनीला काय बोलायचं समजेना. अनंत केशवराव गद्रेंच्या बिनतोड युक्तीवादाशी मुकाबला करणं हे त्या साध्या भोळ्या पोरीला अशक्य झालं.

"गोष्ट अशी आहे, ज्या लेखकाने पार्वतीचं वर्णन लिहिलं तो इथं हिमालयात आलाच नव्हता. आयोध्या किंवा किष्कींधेतल्या त्याच्या घरी बसून त्यानं त्याला सुंदर वाटणाऱ्या स्त्रीचं वर्णन लिहिलं आणि तिला नांव दिलं पार्वती–हिमालयाची कन्या!"

"चला आपण चहाची पानं कशी वाळतात ते पाहू!"

"पाहू ना, पण मला अगोदर सांग, कृष्ण कोणती भाषा बोलत होता?"

"का, मराठी." विषय आणखीन वाढायला नको म्हणून लिनीनं पटकन उत्तर देऊन टाकलं.

"हे पहा, प्रभातच्या 'गोपाळकृष्ण' सिनेमातला कृष्ण कोणती भाषा बोलत होता हे नाही मी विचारलं. खराखुरा कृष्ण!"

विचार करून लिनी म्हणाली, "गीता कृष्णानं सांगितली. तेव्हा संस्कृतच!"

"मला हे सांग कृष्ण कुठला?"

"वृंदावनाचा, मथुरेचा!"

"तिथले लोक कोणती भाषा बोलतात?"

"मला माहीत नाही!"

"अग आपला दुधवाला भैय्या कोणती भाषा बोलतो 'आवत हैं, जावत हैं,', ऐकलीस ना!"

"पुरे ना आता."

"आता मी हे मान्य करीन की तो आपल्या भैय्यासारखा मोजाशिवाय दूध घालणारा, शेंडी राखणारा नसेल कदाचित–पण....?"

"मी त्या बायका पानं कशी खडतात ते पाहते"







अनुक्रमणिका

--लिनी पळालीच तेथून!

"हो काय घ्या, हा आपला एकामागोमाग दुसऱ्या देवाची चेष्टा करीत राहिल. आणि कुणी नेम सांगावा, एखादा कोपिष्ट देव शिक्षा केल्याखेरीज राहायचा नाही.

नुकतंच लग्न झालंय. संसाराला देखील सुरुवात व्हायची आहे अद्याप. अगोदरच गणपतीपुळयाला जायचं चुकवून आपण इथं आलो आहोत. उद्या काही जिवंत राहाणार नाही.

दुरून अनंता पाहात होता, कमरेएवढ्या वाढलेल्या चहाच्या झुडपामध्ये इतर स्त्रियांपेक्षा लिनीच तेवढी वेगळी दिसत होती. कदाचित तिच्या साडीमुळे असावी. पण अनंताच्या मनात आलं--अभावितपणे केलेली आपली निवड किती सार्थ आहे.

चढणीच्या टोकावर दूर उभ्या असलेल्या अनंताला लिनी पहात होती. आपलंच माणूस दुरून असं त्रयस्थासारखं पहाण्यात एक वेगळाच आनंद असतो. ह्यांच्या गोऱ्या रंगाला गर्द निळा स्वेटर छान दिसतो आहे. त्यांच्या मित्राचा--दिनकरचा तो स्वेटर ! येथून जाताना अशीच लोकर न्यायला हवी. कोणाकडून तरी वीण विचारून मी असाच विणेन ह्यांच्यासाठी.

मग गणपतीपुळयाला जातांना पन्हाळयाला एक दिवसा-करिता का होईना पण नक्की जाऊन यायचं! हे पुसाटीच्या बुरुजा-वर उभे राहतील, शिलेदारासारखे. मी अशीच दुरून पाहीन.

आपलं माणूस जवळ असताना असं डोळे भरून पहाता येत नाही. गम्मत आहे. दूर जाऊन उभं राहिलं की अधिकच जवळ जावंसं वाटू लागतं. जवळ म्हणजे अगदी जवळ...मिठीतच !

चहाचा मळा पाहून दोघं रमत गमत परतले. गेले तीन दिवस कसे संपले ते लिनीला समजलंच नाही. झू..गव्हर्नरचा बंगला, चहाचा मळा..रोज नवा कार्यक्रम ! दिवस धुक्यात विरत होते. रात्री काजव्याच्या प्रकाशात चमकत होत्या.

डोळे चुरचुरायचे दिवसभर ! कधी कधी बसल्याजागी पेंग यायची. मग अनंता हसायचा. हसायला ह्यांना काय? पण असं दिवसभर भटकायचं तर रात्री तरी झोप नको की काय ?

खोलीचं भाडं आणि रोजचा अवांतर खर्च ह्याचा हिशोब केला. तर दार्जिलिंगमध्ये फक्त पांचच दिवस रहाता येणं शक्य होतं. त्यातले तीन दिवस तर संपलेच !

हे धुकं, थंडी, सुरूची उंच झाडं, मधूनच येणारी पावसाची सर आणि अद्याप न दिसलेली कांचनगंगेची हिमशिखरं.....

ह्यातलं काही म्हटल्यां कांही मुंबईला नेता यायचं नाही. सगळं इथंच सोडून मोकळ्या हातांनी परत जावं लागणार.

आणि एकदम लिनीला कल्पना सुचली.

"तुम्हाला फोटो काढता येतात का?" लिनीने विचारलं.

ह्या अनपेक्षित प्रश्नानं अनंता गोंधळला, म्हणाला, 'का ग?'

"इथं एका दुकानावर मी पाटी पाहिली. कॅमेरे भाड्याने मिळतात. आपण एक घेतला असता."

"घ्यायला हरकत नाही. पण मी कधी फोटो काढले नाहीत. कॅमेरा कसा वापरायचा मला माहित नाही !"

लिनी खट्टू झाली. ही पहिलीच वेळ. प्रत्येक अडचणीतून मार्ग काढणाऱ्या अनंतानं पहिल्यांदाच अशी सरळ सरळ हार मान्य केली.

चालता चालता लिनी थांबली. एक सिक्कीमी बाई रस्त्याच्या कडेला बसून स्वेटर विणत होती. भराभर टाके घातले जात होते. लोकर सुद्धा भोवती गुंफली जात होती.

पलिकडच्या बाजूला एक तिबेटी माणूस रस्त्यावरच दुकान थाटून बसला होता. छोट्या घंटा, निरनिराळ्या मण्यांच्या माळा, पितळेच्या वेगवेगळ्या मूर्ती ! लिनी खाली वाकून पहात होती.

"मी अगदी छोटीशी एखादी वस्तू घेऊ का ? स्वस्तातली! दार्जिलिंगची आठवण म्हणून ! घेऊ ना--!"

"घे ना तुला आवडेल ती घे !"

"मला तो नटराज घ्यावासा वाटतो. पण महाग असेल नाही!

"काय किंमत हो ?"

"अठ्ठावीस रुपये !" तिबेटी माणसानं सांगितलं.

"अय्या, एवढ्या महाग आहेत ह्या गोष्टी !" लिनी तेथून निघाली, पण त्या तिबेटीने तिला थांबवलं.

मणी, आंगठ्या, पड्याला लावायच्या छोट्याशा घंटा, तो लिनीची पाठ सोडेना.

अनंता बाजूस उभा होता. गंमत पहात ! कुठून विचारलं ह्या माणसाला असं लिनीला झालं !

एकदम अनंता तिच्याजवळ आला आणि म्हणाला, "तुला

खास दार्जिलिंगची आठवण न्यायची आहे मुंबईला !"

त्याच्या प्रश्नाचा रोख लक्षात न आल्यानं विचकतच लिनी म्हणाली, "हो !"

"इकडे ये !"

अनंतानं लिनीला कापडाच्या दुकानात नेलं. दुकानदाराला त्यानं विचारलं, "बाहेर त्या मॉडेलला घातलाय तसा पोशाख ह्यांच्या मापाचा आहे का तुमच्याकडे ?"

कोणता पोशाख...आता आणि काय वेडाची लहर आली ह्यांना ! लिनीच्या छातीत लकलकू लागलं.

दुकानदार आणि ती, दोघे बाहेरच्या शो–केसेसजवळ आली.

शोकेसमधल्या मॉडेलच्या अंगावर सिक्कीमी किमोनो होता. लिनीने डोळे विस्फारले–म्हणजे तुम्ही काय हा विकत घेणार आहात !

"काय किंमत आहे ह्याची ?"–अनंता.

"तुम्ही कापड कोणतं निवडता ह्यावर अवलंबून आहे!"

"अहो काय विचार आहे तुमचा ? खरंच घेणार आहात का तुम्ही !"

"हो!"

"मलतंच, पैसे आहेत कुठं आपल्यांजवळ ?"

अनंतानं कापड पसंत केलं. लिनीचा अद्याप विश्वासच बसत नव्हता. पण दुकानदार तिला म्हणाला, "आतल्या खोलीत चला. माप घ्यायचं आहे !"

कमाल झाली. पैशाची चौकशी नाही. सरळ आपली ऑर्डर देतायत. अहो काय मुंबईला चालत जायचंय् आपण–!

"मला नकोय असं काही !" लिनी अनंताला म्हणाली.

अनंता हसला. गोड हसला. रागवायचं तरी कसं ह्या माणसावर. पण अगदीच कसा हे विचार करीत नाहीत ? नाही, मी मापच देणार नाही.

अनंता जवळ आला म्हणाला, "शू:–पार्वती अशीच वागत होती का ? नवऱ्याचा शब्द मोडला तिनं कधी ?"

नाही ते दाखले इथं कशाला ? शंकराला काय हिमालयात हॉटेलात रहावं लागत होतं का दोघांना मुंबईला जायला रेल्वेचं तिकीट काढायला लागत होतं.

"ए, एवढं ऐक....प्लीज."

नाही म्हणाले ना ! परत कशाला ही खुशामत !

"शू: – शपथ आहे वघ नवऱ्याची !"

लिनी चमकली. शपथ....! नवऱ्याची ! अहो माझं लग्न तर दहा दिवसांपूर्वी झालं आणि नवऱ्याची शपथ कसली घालता? तो काय असा वाटेवर पडलाय का ?

"सुटली म्हणा" लिनीला राग आवरेना.

"सुटली !"

सुटले आता काहीही करीन. झालं समाधान.

लिनी मान वळवून शिंप्याबरोबर आतल्या खोलीत निघून गेली. पाच मिनिटांनी ती बाहेर आली तेव्हां दुकानात अनंता नव्हता. लिनी कावरीबावरी झाली. इतक्यात तो रस्त्याने येताना तिला दिसला. हातात गुलाबी कागदाच्या वेष्टनात काही तरी गुंडाळलेलं होतं. बहुधा मासिकं असावीत.

लिनीनं विचारलं, "तर तुझ्यासाठी किमोनो घ्यायचा, तर माझ्यासाठी नको का मी काही घेऊ–!" असलं काही तरी उत्तर अनंतानं तिला दिलं !

परत ती विचारणार तो दुकानदारानं हाक मारली आणि बिल त्यांच्या हातात दिलं.

लिनी आकडा पाहून हवकून गेली.

अनंता निर्विकार होता.

"कधी मिळेल ? आम्ही परवा परत जाऊ!"

"उद्या मिळेल साहेब !"

मग आदवीनं दुकानदार म्हणाला, "साहेब आम्ही दहा टक्के अॅडव्हान्स घेतो !"

अनंता हसला आणि म्हणाला, "ओ हो, मी आत्ताच हे घेऊन बसलो." हातातील गुलाबी वेष्टन त्यानं दुकानदाराला दाखवलं आणि अनंतानं चक्क सांगून टाकलं, "माझ्याजवळ आता तेवढे पैसे शिल्लक नसावेत !"

दुकानदार जरासा घुटमळला. टाकावा का विश्वास–?

"कुठं उतरलाय साहेब तुम्ही!"

"पॅरडाईझ हॉटेल !"

एखादा जादूचा शब्द उच्चारावा तसा दुकानदारावर परिणाम झाला. हसत हसत तो म्हणाला,

"दादाजीके यहाँ !"

अनंतानं मान हालवली.

"ठीक है साब ! कल शामको आईएगा. नहीं तो हम हॉटेलपर पहुंचा देंगे !"

अनंतानं बिलावर स्वतःचं नाव लिहून दिलं. परत तो गोड हसला. "बहोत शुक्रीया !"

"कभी भी आईए साब दुकान आपही का है!"

अनंता आणि लिनी दुकानातून बाहेर पडली.

* *

आणखीन थोड्या वेळात उजाडेल, पण आता तरी बराच अंधार होता. टॉर्चच्या प्रकाशात लिनी आणि अनंता झपाझप निघाले होते. हवेत गारवा होता, पण दोघांच्या कपाळावर घामाचे थेंब जमले होते. ह्या थकव्यातही उत्साह होता. सारं वातावरण प्रसन्न वाटत होतं. पहाटची वेळ, सृष्टी ताजीतवानी झालेली !

क्षणाक्षणाला आकाशाचे रंग पालटत होते. घाई करायला हवी. मधूनच अवघड चढण आली की अनंता लिनीला हात देई. त्या स्पर्शाने लिनीला फिरून चालायला उत्साह येई.








पहाता पहाता अंधार सरला. विजेरीची फारशी जरूर वाटेनाशी झाली. दोघांनाही दम लागल्याने कोणीच बोलत नव्हतं. झाडांच्या नागमोडी वळणातून गेलेली पायवाट थोड्याच वेळात संपणार होती. टायगर हिलचा माथा जवळ आला होता..

पुढचा रस्ता दिसत नव्हता. दोघे वळले आणि झाडाला वळसा घालून पुढं येताच थबकले. जागच्या जागी खिळून राहिले. समोरचं दृश्य पाहून लिनी लाजून मेल्याहून मेल्यासारखी झाली. खाली मान घालून अनंतामागे उभी राहिली.

झाडाच्या पलिकडे चिचोळ्या पायवाटेवर एक तरुण तरुणी एकमेकांच्या घट्ट बाहुपाशात साऱ्या जगाला विसरली होती. दोघांचे डोळे मिटलेले होते. आपल्यापुरतं तरी त्यांनी 'कोणी पाहील' हा प्रश्न सोडवून टाकलेला होता. मिटल्या डोळ्यांनी तो तरुण तिचे गाल, डोळे, कपाळ ओठांनी टिपत होता. शेवटी ओठास ओठ मिळाले. त्या आवेगात सारी लाज, जाणीव, समाजाची बंधनं वाहून गेली.

लिनी खालच्या मानेनं पुढं सरकली. अनंताचा हात धरून मागं खेचू लागली. अनंता तसाच उभा होता. एखादे सुंदर दृश्य पहावे तसा अनिमिष नेत्रांनी पहात होता.

लिनीनं जोरात त्याला ओढलं तशी त्याची तंद्री भंगली. दोघं आवाज न करता वीस–पंचवीस पावलं मागं आली.

मग अनंता मोठ्यांदा म्हणाला,

"चल लवकर लवकर. उजाडेल ! आज कांचनगंगेची शिखरं पहायला मिळाली नाहीत तर ही संधी कायमची हुकलो आपण!"

आणि असंच काहीतरी मुद्दाम मोठमोठ्यांदा बोलत दोघं परत पुढं आली. अद्याप दोघं असतील का तिथं? तशीच? त्यांचंही आपल्यासारखंच अलिकडेच लग्न झालंय? आणि झालं असलं तरी हे काय वागणं? रस्त्यात अनंतानं हात धरला आपला की अद्याप काळीज पटकन् छातीतून उडी मारून बाहेर पडतंय का काय असं वाटू लागतंय्! आणि हे उघड्यावर असे प्रेम करतायत्! आणि आमचे हेही आपले पहात उभे राहिलेत्. जणु इंग्लीश सिनेमाच पहातायत! दादा आई बरोबर असते तर काय म्हणाले असते! ही काय आपली संस्कृती?

फिरून झाडाचं ते वळण आलं तसा लिनीनं श्वास रोखून धरला. हिय्या करून पलिकडे पाहिलं. मघाच्या तरुण तरुणी पैकी कोणीच नव्हतं. तिला हायसं वाटलं. तिच्याकडे पाहून अनंता गालातल्या गालात हसत होता. त्याच्याकडे लक्ष देणं लिनीनं टाळलं. कुणी सांगावं ह्यांनाही स्फूर्ती यायची! बाई बाई मी तर जिवंतच मरून जाईन! खालच्या मानेनं लिनी चालत राहिली.

टायगर हिलच्या टोकावर ती दोघं पोहोचली. वीस पंचवीस माणसं तिथं अगोदरच पोहोचलेली होती. मघाशी पाहिलेलं ते जोडपंही त्यात होतं. लिनीनं दुसरीकडे नजर वळवली.

समोर, दूरवर अद्याप धुक्याचा पडदा कायम होता. त्यामागे कांचनगंगा! आज तरी दिसणार का? इथं आल्यापासून एकदाही पाहिली नाहीत ती हिमशिखरं!

अनंतानं खांद्यावरची एअर बॅग काढली. हिरवळ पाहून जमिनीवर बैठक काढली. बॅगेतून काल रात्री घेतलेलं गुलाबी कागदाचं वेष्टन काढलं, खोललं! आत सुटे वेगवेगळ्या रंगाचे ड्राइंगचे कागद होते. एक ऑईल पेस्टल कलरची पेटी होती.

"हे-काय ?" लिनी आश्चर्यानं म्हणाली.

"आपला कॅमेरा. रंगीत फोटो घेणारा, प्रकाशाकरिता अडून न बसणारा !"

अनंतानं सफेद कागद पॅडवर ठेवला. तो शांत बसून राहिला. आणखीन् काही वेळ तसाच गेला. उत्कंठा ताणली गेली. परत परत घड्याळ पाहिली जाऊ लागली. आकाश अधिकच निळे झाले. समोरचे ढग तसेच होते.

आणि वारे सुटले. मोठाले मेघखंड हलकेच बाजूला सरकले आणि त्यामागच्या रुपेरी हिमरांगा प्रकटल्या. कोठून तरी सूर्याचे किरण त्यावर पडले. चांदीची शिखरं तांबूस सुवर्णाची झाली. कुबेराची सारी सम्पत्ती अचानक उघडी झाली.

क्षणभर सगळे अवाक् झाले. लिनी तर देहमानच विसरली. ही–ही हिमशिखरं मला बॅगेत घालून मुंबईला नेता येतील का ? आईदादांना दाखवायला ?

अनंता पहात होता. मघाच्या सारखाच अनिमिष डोळ्यांनी!

मग सगळीच गडबड झाली. कोणी कॅमेरे सरसावले. क्लिक् क्लिक्–क्लिक्! कुणाचा छोटासा मुव्ही कॅमेरा होता. त्यातली फिल्म फिरू लागली. गाडीमघल्या आकृत्यावरून ह्या हिमशिखरांची काहीजण नांवं शोधू लागले.

अनंतानं पहाता पहाता कागदावर आकृती रेखली. भराभर पेस्टल स्टिक्स् कागदावर फिरू लागल्या. कित्येक मैल दूर असलेल्या त्या पर्वतरांगा कोणतीही प्रभावी टेलीफोटो लेन्स् जवळ आणणार नाहीत इतक्या जवळ आल्या. सोनेरी भगवे किरण त्या शुभ्र हिमराशीवरून कागदावर परावर्तित होऊ लागले.

अनंताचं विक्षिप्त आणि तरीही रेखीव व्यक्तिमत्व त्याच्या रंगातून कागदावर उतरत होतं. सगळ्यांचेच फोटो सारखे यणार होते. हे चित्र तेवढं समोर जशी हिमशिखरे आहेत तशीच दाखवण्या-ऐवजी अनंतानं जशी पाहिली तसे दाखवत होते.

पहाता पहाता खालच्या दरीतून मेघांचा कल्लोळ उठला. वेगाने वर चढू लागला. चारी दिशांनी हिमशिखरांना ग्रासू लागला. तोच क्षण अनंतानं पकडला. धुक्यात बुडत असलेली ही कांचनगंगेची शिखरं! ही शिखरं तेवढीच अनंतानं चितारली. गडद भगव्या, सोनेरी रंगात! इतर गोष्टी सगळ्या अस्पष्ट झालेल्या! त्या क्षणाची अद्भुतरम्यता कागदावर रेखाटली जात होती.

समोरचं दृश्य हरपलं! शिखरं परत नाहीशी झाली! ढग खाली उतरले. फिरून पडदा खाली झाकला गेला.

अनंताचं चित्र संपत आलं. इतर फोटोग्राफरप्रमाणं त्याला फिल्म डेव्हलप होऊन यायची वाट पहायचं कारण नव्हतं!

" Splendid ! Very fascinating !"

मागून आवाज आला! लिनीनं मागं पाहिलं–मघाचं जोडपं त्यांच्या मागं उभं होतं.

ती तरुणी विलक्षण सुंदर होती. गोरीपान, उंच, बोलक्या डोळ्यांची! तिनं पुरुषासारखी पॅंट चढवली होती आणि अंगात कोट घातलेला!

तो तरुणही तिला शोभेसाच होता! निळ्या निळ्या डोळ्यांचा! उंचापुरा! कातड्याचा जाड कोट घातल्यानं तो काहीसा जाडा दिसत होता.

"Very well done, isn't it darling !"

तो तरुण तरुणीला म्हणाला, "ते कोणत्या प्रांताचे होते समजायला मार्ग नव्हता!

ती तरुणी लिनीकडे पाहून हसली. मोत्यासारखे शुभ्र दांत चकाकले! "हनीमूनला आलाय् ?" तिनं इंग्रजीतच विचारलं! लिनी गोरीमोरी झाली.

मानेनं होकार देत तिनं कसंबसं विचारलं–"आपण ?"

ती तरुणी परत हसली.

"Oh No ! We are not married yet !"

कमाल झाली! म्हणजे लग्नाचा पत्ता नाही आणि असं वागणं ह्यांचं! उद्या लग्न झालं तर दुसऱ्या कोणी दार्जिलिंगला फिरकायची सोयच नाही.

"हा मॉंटेनिअरिंगच्या ॲडव्हान्स कोर्सला चाललाय. तो परत आल्यावर पाहू लग्नाचं!"

We have come here to see him off to hills !

अनंता चित्राला फिनिशिंग टच देत होता. तो तरुण त्याच्या शेजारी बसत म्हणाला,

"My boy, I want it ! I want it as a token of this wonderful day's memory!"

अनंता हसला. म्हणाला, "Yes, you can have it. But it is not yet finished!"

"नको, जसं आहे तसंच मला हवंय्. Let it be incomplete!" आणि त्यानं खिशात हात घालून भरलेलं जाड पाकिट काढलं,

"And if you don't mind, let me know how much I have to pay you!"

"काहीच नाही !"

"खरंच ?"





अगदी खरं !"

"Then you two have a lunch with us !"

"माफ करा. माझे दोन मित्र माझ्याकडे जेवायला येणार आहेत." अनंता म्हणाला. लिनी आश्चर्यानं पहातच राहिली.

अनंतानं ते चित्र त्या दोघांना दिलं. फिरून आभार मानून ती दोघं हातात हात घालून चालू लागली.

थोड्या वेळानं अनंता आणि लिनी निघाले. सकाळी ज्या वळणाशी ते थांबले होते त्या वळणापाशी दोघं आले तसं अनंता म्हणाला, "अग हे झाड झपाटलेलं आहे!"

दचकून लिनी म्हणाली, "का, कशावरून सांगताय तुम्ही!"

"इथं आलो, अन् त्या दोघांच्यासारखे माझ्या मनात विचार यायला लागलेयत ! इकडे येतेस ?"

"अगवाई–! " म्हणून लिनी तिथून धावत सुटली !

## [७]

डोळ्यातली झोप अद्याप जात नाहीय्. पापण्यावर कोणी जड वजनं ठेवलीत. लिनीनं कसेबसे डोळे उघडले. समोर स्टुलावर ठेवलेल्या अनंताच्या मनगटी घड्याळात पाच वाजून गेले होते.

टायगर हिलवरून परतल्यावर सपाटून भूक लागली होती. जेवून ती बिछान्यावर पडताच तिचा डोळा लागला. नाही म्हटलं तरी पांच तासांची झोप झाली. आता उठायलाच हवं.

खिडकीशीच उभ्या उभ्या अनंता चित्र काढत होता. ह्या खिडकीतून सगळी दार्जिलिंगची व्हॅली दिसते. अगदी वर्च हिलच्या टोकापर्यंत ! लिनी उत्सुकतेने उठली, अनंताजवळ येऊन उभी राहिली.

चित्रात फक्त त्यांच्या हॉटेलसमोरचं गुलमोहरचं झाड स्पष्ट दिसत होतं. त्याखाली एका टोपलीत सोनेरी रंगाची पीच विकत बसलेली सिक्कीमी बाई ! बाकी दार्जिलिंग धुकं नसताही धुक्यात गुरफटल्यासारखं अस्पष्ट झालं होतं.

"हे काय, मागची घरं नाही काढलीत ?"

"अग हा काय निर्जीव कॅमेरा आहे काय ? समोर जे जे आहे ते सगळं चित्रात आलं पाहिजे ! मला जसं दिसतं तसं मी काढतो !"

"पण मला मागची घरं दिसतात ना!"

"मला सांग ह्या खोलीत काय काय आहे, . . टेबल, खुर्च्या, आपलं झोपण्याचं रॅक्. आता जागी झालीस तेव्हा काय दिसलं तुला ? खिडकी आणि तिच्या शेजारी उभा राहून मी चित्र काढतो आहे–एवढंच ! खरं ना ! बाकी इतर गोष्टी गौण ! पटलं ?"

"हो!"

"मग बक्षिस !"

लिनी बाजूला होण्यापूर्वीच अनंतानं तिचा हात धरला. तो तिला जवळ ओढणार इतक्यात दारावर टिक् टिक् ऐकू आली.

हॉटेलचा नोकर आत आला.

"दादाजीनी हे तुमचे कपडे दिलेत. शिंपी दुपारी आला होता तेव्हा तुम्ही झोपला होता."

नोकरानं हातातली भली मोठी कागदी पिशवी स्टुलावर ठेवली. जाता जाता तो म्हणाला,

"बिल आतच आहे. दादाजीनी त्याचे पैसे देऊन टाकलेत !"

जांभळ्या रंगाचा किमोनो अनंतानं कागदातून बाहेर काढला. लिनीजवळ येऊन तो म्हणाला, "घालून दाखव ना !"

"भलतंच!"

"बघू तरी, तूही पार्वतीसारखीच दिसतेस काय ?"

"मी नाही हे घालणार !"

"एवढ्यासाठीच मी सांगतो आहे की बरोबर शिवलाय की नाही ते समजेल. काही चूक असेल तर दुरुस्त करून घेता येईल लगेच. नाहीतर काय मुंबईहून इकडे पाठवायचा !"

शेवटी लिनी कबूल झाली. अनंताला खोलीबाहेर काढून तिनं कपडे बदलले. किमोनो घातला. सांगलीची बाळबोध मुलगी हिमालयाच्या कन्येच्या वेषात एकदम बदलली. तिला पाहून अनंता खूष होऊन गेला.

"पाहिलंस, मुंबईत कुठल्याही वनिता मंडळाच्या फॅन्सी ड्रेस कॉम्पीटीशनमध्ये पहिलं बक्षिस मिळेल तुला!"

"...आणि असंही पहा, तू आणि मी कुठं चोरून जायचं ठरवलं तर तुला ह्या वेषात कुणी ओळखणार नाही. मला मात्र काहीतरी असंच माझ्यासाठी पैदा केलं पाहिजे!"

"मग काढू का मी कपडे!"

"मी खोलीत असतानाच... छे छे भलतंच!"

आणि अनंता खोलीबाहेर पडलाच नाही. लिनीला ते कपडे उतरावयाला मिळाले नाहीत. थोड्या वेळाने दोघं फिरायला बाहेर पडली तेव्हा लिनी त्याच किमोनोमध्ये होती. लाजून चूर झालेली! कोणी पाहिलं तर काय म्हणेल म्हणून संकोचलेली !

ह्यांना सगळंच आपल्या मनाप्रमाणं व्हायला हवं ! त्याकरिता काय हवी ती गोडीगुलाबी करतील. नाही म्हणणं अगदी अशक्य करून टाकतील. त्यांचं काय जातं ? ह्या वेषात कोणी ओळखीचं भेटेल तर जिवंत मरेन मी ! म्हणूनच रस्त्यात जाताजाता सिनेमाचं थिएटर लागलं तशी लिनी म्हणाली, "पिक्चरला जाऊया का आपण ?"

निदान आतल्या अंधारात लोकांच्या नजरा आपल्याकडे वळायच्या नाहीत. हॉटेलकडे परतू तेव्हा रात्री नऊ वाजलेले असतील. रस्त्यावरही अंधार असेल.







अनुक्रमणिका

–अनंता 'हो' म्हणाला. कारण लिनीला खेटून तिचे हात हातात घेऊन तीन तास बसता येईल, अगदी राजरोसपणे !"

एक आरामगाडी.

खिडकीच्या कडेला बसलेला तरुण. रुबाबदार. उंची पोशाख. केसांची झुलपं कपाळावर आलेली.

गाडी सुरू होणार इतक्यात एक श्रीमंत कुटुंब घाईघाईनं गाडीत प्रवेशतं. आई वडील व त्यांची एकुलती एक मुलगी. मुलगी –वय वर्षे वीस–बावीस! काळाशार डोळयांची, स्लॅक आणि जाड पुलओव्हर चढवलेली. सुरेखच !

लिनीला एकदम आठवण झाली. आज सकाळी टायगर हिल–वर पाहिलेली मुलगी अशीच सुरेख होती.

प्रवास सुरू होतो. पठाणकोट ते श्रीनगर–! एका बसथांब्या-वर बस थांबते. तरुणीच्या लक्षात येतं, तो तरुण सारखा तिच्याकडे एकटक पहातो आहे. ती बेचैन! पण तो पहातोच आहे. ती रागाने उठते. "आपको शरम नही, आप मुझे ऐसे क्यो देख रहे है?"

तरुण हसतो. हातातली वही तिला दाखवतो. त्यानं तिचं सुरेख रेखाचित्र काढलेलं असतं. "कहिए, क्या सौंदर्यका पूजन यह गुनाह हो सकताहै?"

तिचा पारा उतरतो. ती लाजते.

लिनीला आठवलं–अनंता अशीच रेखाचित्रं काढतो. कुणी सांगावं अनंता सकाळच्या त्या सुरेख तरुणीचं असंच चित्र काढेल. तीही मग अशीच लाजेल. चित्रकार तर नेहमीच सौंदर्याचा वेडा असतो. ती अस्वस्थ झाली. अनंताकडे पाहू लागली. अनंता हंसला. त्यानं हळूच तिचा हात आपल्या हातात घेतला.

पुढचा प्रवास ! आता दोघे एकमेकाशेजारी बसलेले आहेत. (बहुतेक त्यांच्या सीटजवळचा प्रवासी मध्येच उतरला असावा.) बाहेर वर्फ पडलेलं आहे. लोक स्कीइंग करत आहेत. तरुण–तरुणी एकमेकांना बर्फाचे गोळे मारताहेत. बस थांबते. दोघे उतरतात. खेळात सहभागी होतात. एक गाणेही गातात.

म्हणजे ह्या चित्राच्या शेवटी होणार आहे तरी काय ? अनंतासारखा दिसणारा हा तरुण, सकाळी भेटलेल्या त्या तरुणीसारख्या दिसणाऱ्या नायिकेच्या गळयात माळ घालणार आहे काय ?

लिनी अधिकच अस्वस्थ ! तिची अनंताच्या हातावरील पक्कड घट्ट झाली. अनंता खुर्चीत तिच्या बाजूला रेलला.

ह्या गरीब चित्रकाराला श्रीनगरला रिझर्व न करताही जागा तावडतोब मिळते. हॉटेल आलिशान असते. रात्री तेथे डिनरनंतर नृत्यही होते. हा तरुण चित्रकार गातो. नर्तिका नाचते.

अशी हॉटेलं दार्जिलिंगला का नाहीत ? फार वणवणायला लागलं ! पण चुकलंच, अनंतानं दार्जिलिंगऐवजी श्रीनगरची तिकीट का नाही काढली. पण अनंताकडे पहायची सोय नाही. तो अगोदरच आपल्या बाजूस रेलून बसलाय्.

सकाळ, प्रसन्न! झाडे बर्फाच्छादित. हा तरुण चित्र काढतो आहे. एका झाडाआडून एक काश्मिरी तरुणी पुढे येते. तो उठतो. ती घाबरते. पळू लागते. तो तिला थांबवतो. "डरना नही. मुझे आपकी तसवीर बनानी है!" ती खेडवळ भोळी, निष्पाप तरुणी बावरते, लाजते !

ही आपल्यासारखीच आहे. अनंता जवळ आला की आपण अद्यापही अशाच बावरतो. त्या श्रीमंत रुपवतीला सोडून चित्रातला अनंता पत्करेल का ह्या रानफुलाला ? काश्मिरी वेषात ती किती सुन्दर दिसते आणि मग तिला आठवले की आपणही त्या तरुणी-सारखाच देहाती पोषाख केलाय्–सिक्कीमी स्त्रीचा !

ह्या पोशाखाचे बहात्तर रुपये चार आणे द्यायचे आहेत. आता दादाजींनी दिलेत, पण उद्या आपल्याला द्यावेच लागणार आहेत. थिएटरमधल्या सगळयां खुर्च्यांतले ढेकूण एकदम चावू लागल्यासारखी लिनी अस्वस्थ झाली. तिची चुळबूळ पाहून अनंतानं हळूच आपला हात तिच्या खुर्चीवर ठेवला. म्हटला तर खुर्चीवर, म्हटला तर तिच्या खांद्यावर! लिनी अधिकच बेचैन झाली. पडद्यावर त्या तरुणाऐवजी तिला बहात्तर रुपये चार आणे न दिल्याने वस्त्रहरण करणारा दुःशासन दिसू लागला. आणि बिचाऱ्या द्रौपदीचा चेहरा तर अगदी तिच्या-सारखाच दिसत होता.

बसमध्ये तावडतोब जागा मिळते, सीझन चालू असताही हॉटेलात लगेच खोली मिळते, आणि त्या काश्मिरी स्त्रिला आपल्या कपडयाबद्दल शिंप्याचं बिल द्यावे लागत नाही.

सगळयाच खोटया गोष्टी दाखवणाऱ्या चित्रात तिला आता रस उरला नाही. पण चित्र संपेपर्यंत थांबणे भाग होते. बाहेर अंधार पडायचा होता. रस्त्यावरची गर्दी ओसरायची होती !

शेवटी एकदाचे नऊ वाजले. चित्र संपले. थिएटरमधल्या गर्दीबरोबर दोघे बाहेर आले. बाहेर पावसाची रिपरिप चालली होती. हवेतली थंडी वाढली होती. लिनी किमोनोमध्ये कुडकुडू लागली. एका दुकानापुढच्या शेडखाली दोघे पाऊस कमी व्हायची वाट पहात उभी राहिली. पाऊस थांबेचना ! पाच, दहा, पंधरा मिनिटे सरली तरी पावसाची रिपरिप कायमच !

अनंता म्हणाला, "किती वेळ उभं राहायचं. भरभर चालू! पाऊस काही फार नाही !"

दोघं निघाली. झपझप चालू लागली. रस्ता जवळ जवळ निर्मनुष्य होता. दुकानं मागं पडली. घरंही आता राहिली नाहीत. मधल्या पट्टयात वस्ती नव्हती. अनंताबरोबर चालण्यासाठी तिला जवळ जवळ पळावं लागत होतं. गम्मत म्हणून अनंता अधिकच



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




भरभर चालत होता. लिनी धावू लागली. अनंताही धावणार इतक्यात मागून शब्द आले.

"Hey yoy, what the hell are yoy doing ?"

दोघे दचकून थांबले ! रेनकोट घातलेलं आणि एकाच छत्रीतून चाललेलं एक जोडपं मागून येत होतं. जवळ आलं तसं लक्षात आलं, सकाळी टायगर हिलवर भेटलेले हेच तरुण-तरुणी! त्या सुंदर तरुणीला पाहून लिनीच्या हृदयाचे अडताल पडू लागले. नुकत्याच पाहिलेल्या चित्रातला तो बस-प्रवास आठवला!

"Don't run ! हवा विरळ असते इथं! विचित्र अपघात होतात. इथं अशा धावण्यानं !"

इतक्यात त्या तरुणीचं लक्ष लिनीकडे गेलं, "Oh, we have met in the morning !"

"Yes !' लिनी म्हणाली.

"Oh, how cute you look! Simply wonderful !"

लिनी लाजून चूर झाली!

"थोडा वेळ थांबा आडोशाला ! पाऊस थांबला की जा!"

ती दोघं निघून गेली.

अनंता आणि लिनी अंधारात झाडाखाली उभी राहिली ! लिनी अद्याप लाजलेलीच ! ह्या लाजाळूची पाने मिटलेलीच !

अनंता हसला. तिच्याकडे पहात राहिला.

दार्जिलिंगला आलेल्या कितीतरी स्त्रिया हा पोशाख शिवून घेतात. घालून मिरवतात; पण त्या काही अशा सुंदर दिसत नाहीत. आणि त्याचं कारण अनंताला नेमकं सापडलं. त्यांच्या चेहऱ्यावर असा मुग्ध संकोच नसतो. त्यांचे गाल असे लाजून गुलाब झालेले नसतात.

आणि मग एकदम काय झालं हे अनंताला समजलं नाही. त्या निर्मनुष्य, अंधेऱ्या रस्त्यावर अनंतानं एकदम लिनीला जवळ घेतलं. त्या स्पर्शाच्या उबेनं, लिनीच्या मनात चित्रपट पहाताना आलेल्या शंका आपोआप वितळल्या. तिचा ठेवा तिचाच असल्याची तिची खात्री पटली.

त्या आवेगानं तिचे डोळे मिटले. पाय धरतीवर राहिलेच नाहीत. ओठांच्या शोधात हनुवटी उचलली गेली. अनंतानं आपले ओठ त्या ओलसर ओठावर टेकले.

आणि ह्याच वेळी रस्त्यावरून कुणाच्या तरी पावलांचा आवाज ऐकू येऊ लागला.

काय करू शकतो माणूस अशा अवस्थेत ? आज पहाटे त्या तरुण जोडप्यानं मार्ग दाखवून दिला होता. अनंतानंही आपले डोळे मिटून घेतले.

चालणाऱ्या पावलांचा आवाज क्षणभर थबकला... आणि मग दूर जात हलके हलके ऐकू येईनासा झाला.

* *

## [८]

सकाळीच मी स्नान उरकलं. टॉवेल गुंडाळून बाहेरच्या खोलीत आलो तर मृणाल ड्रेसिंग टेबलच्या आरशासमोर उभी होती. जांभळ्या रंगाचा किमोनो अंगावर चढवण्याची तिची धडपड चालली होती. तिला तो बिलकुल होत नव्हता. मृणालमध्ये वय वाढल्याने फारसा फरक पडलेला नाही हे जे मला वाटत होते, ते चुकीचं होतं. निदान पंधरा ते वीस पौंड तरी मृणालचं वजन वाढलं असलं पाहिजे. एका नाजुकशा तरुणीसाठी शिवलेल्या किमोनोमध्ये आता मृणाल मावणं शक्य नव्हतं. तिची ती केविलवाणी धडपड माझ्याने पहावेना.

"मृणाल काय चाललंय?"

केवढ्यांदा दचकली मृणाल ! एवढ्या लवकर स्नान उरकून मी येईन अशी तिची अपेक्षा नसावी.

"कुठं काय, एक गंमत !" मृणाल हसली. त्या हसण्यात जीव नव्हता. तिने किमोनो उतरवला, ती साडी नेसू लागली.

मी कपडे केले, बंद गळ्याचा पुलओव्हर चढवला. गेले दोन दिवस आम्ही हॉटेलमध्येच बसून काढले होते. चूक थोडीशी माझीच ! मागील खेपी घूम मोनॅस्ट्री पहायची राहिली म्हणून ह्या खेपी पहिल्याच दिवशी आम्ही तिकडे गेलो. जाताना चालत गेलो. मृणाल थकली म्हणून येताना तट्टूवरून आलो. चालत आलो असतो तर जेवढे पाय, मांड्या दुखल्या नसत्या तेवढ्या तट्टूवरून आल्यानं मृणालच्या दुखू लागल्या. त्या दिवशी विशेष जाणवलं नाही. पण नंतरचे दोन दिवस मृणालला उठलं की बसता येत नव्हतं आणि बसलं की उठता ! मृणाल हॉटेलबाहेर पडूच शकली नाही. शेवटी कंटाळा आला म्हणून मी संध्याकाळी मालवरून चक्कर मारून आलो, पण एकट्याने हिंडण्यातही मौज वाटेना. लग्नामुळे बायको बरोबर पाहिजे ही देखील एक सवयच होऊन बसते आणि मूळ गोष्टीतला आनंद उरला असला, नसला तरी सवय सुटणं कठीण होतं.

आम्ही दोघे हॉटेलच्या बाहेर पडलो तेव्हां सूर्याचा आणि ढगांचा पाठशिवणीचा खेळ चालला होता. मधूनच ऊन पडायचं तर पहाता पहाता आकाश ढगाळ व्हायचं. ह्या हवेत फिरायला मोठी मजा येते. मृणालचे पाय जर ठीक असते तर खूप भटकलो असतो. अगदी संध्याकाळपर्यंत हॉटेलवर परतलोच नसतो; पण हे असं मनसोक्त भटकणं आज तरी शक्य नव्हतं. म्हणून जवळचं ठिकाण निवडलं–हिमालयन माँटेनिअरींग इन्स्टीटयूट !

उजव्या बाजूच्या रस्त्यानं आम्ही निघालो. दहाएक मिनिटे चालल्यानंतर खात्री करून घेण्यासाठी मी समोरच दिसलेल्या एका गृहस्थाला विचारलं–

"हाच रस्ता बर्च-हिलला जातो ना?"

"बर्च हिलला?"





"हो."

त्यानं नकारार्थी मान हालवली. खिशातून छोटंसं गाईड काढलं आणि त्यात पहात त्यानं सांगितलं, "हा रस्ता नेहरू पर्वतला जातो!"

"नेहरू पर्वत?" हे नाव मागील खेपी ऐकल्याचं मला आठवेना. "हिमालयन माँटेनिअरिंग इन्स्टीटयूट ह्या बाजूला आहे काय?"

"हो, ही इन्स्टीटयूट इकडेच आहेत!"

"मग वर्च हिलचं नाव बदललं असलं पाहिजे!" मी म्हणालो. त्यावर त्या गृहस्थानं मान उडवली. "गाईडमध्ये लिहिलंय ते तुम्हाला सांगितलंय!" असं काही म्हणून तो चालू लागला.

आम्ही इन्स्टीटयूटमध्ये पोहोचलो. 'May you climb from peak to peak' तीच अक्षरे! काळ्या रंगातली कट्-औटस्. पर्वतशिखरावर चढत असलेल्या गिर्यारोहकांची! मधला रिकामा रिकामा वाटणारा चौक! त्यावर दोन बाजूना लाल-निळ्या रंगाचे चिनी ड्रॅगन्स! हे गेल्या खेपी कसे दिसले नाहीत! चौकाच्या टोकाला डाव्या बाजूस खोली. बंद दरवाजा त्यावर प्लॅस्टिकची सफेद अक्षरे: तेनसिंग नोर्के

डायरेक्टर ऑफ फील्ड ट्रेनिंग.

चपराशाचे स्टूल रिकामे! सारेच कसे अगदी पूर्वी पाहिले तसे—! कुठल्या तरी परीकथेत एक सारी नगरी झोपी गेलेली असते. जशीच्या तशी, किती तरी दिवस एकाच अवस्थेत असते. तसेच! मधली पंधरा वर्षं एकदम विसरली गेली! ह्या दारापलिकडे एक हसरं, प्रसन्न व्यक्तिमत्व...मी दार ढकललं. खुर्ची रिकामी होती.. त्या खोलीत कोणीच नव्हतं! पलिकडच्या खोलीतून गडबडीनं चपराशी धावत आला.

"क्या है?"

मागचाच प्रश्न. मागचेच उत्तर!

"तेनसिंगसाहेबांना भेटायचं होतं!"

"ते कालच हिमालयात कोर्सबरोबर गेले."

"परत—?"

"एक महिन्याने परत येतील!"

सगळं पूर्वीसारखंच आहे हा आपला आमचा समज. त्याला तडा गेला! तेनसिंग भेटायची शक्यता मावळली!

उगीच म्युझियममध्ये गेलो.

तो शेर्पा तसाच कपडे घालून गेली पंधरा वर्षं उभा होता. मला त्याची दया आली. एक केवळ बदल म्हणून आता त्याला बसवायला हरकत नाही असं मला वाटलं.

माऊंट एव्हरेस्टवर तेनसिंगनी वापरलेला तंबू, काचेच्या मोठ्या कपाटात त्यांनी एव्हरेस्टवर वापरलेली पिक्-ॲक्स्, बूट, गॉगल आणि इतर साहित्य—!

त्यापलिकडे भितीवर नवे फोटो आले होते. अलूवालीया, गोंब, अंकामी, सोनम ग्येस्टो ह्या सर्वांचे पाय एव्हरेस्टला लागलेले! ह्या सर्वांचा पराक्रम तेनसिंगांच्यापेक्षा कमी नाही. पण मला मात्र उगीचच वाटलं की एव्हरेस्टची उंची आता कमी झाली.

उजव्या बाजूच्या खोलीत एक मोठा टेलिस्कोप ठेवलेला आहे. त्यातून कांचनगंगेची शिखरं अगदी स्पष्ट दिसतात असं ऐकलं. पण आज धुकं वरंच होतं. त्या आड ती शिखरं लुप्त झालेली! प्रसंगच असे घडताहेत की सकाळचा उत्साह ओसरू लागलाय्!

इन्स्टीटयूटपासून दहा मिनिटांच्या अंतरावर शेर्पा पॉइंट आहे. येथून पूर्वेकडचा केवढा भव्य देखावा दिसतो! धुकं नसतं तर कांचनगंगेची शिखरं देखील दिसली असती आता येथून!

मृणालनं खांद्यावर अडकवलेली एअर बॅग खाली ठेवली. इतका वेळ माझ्या लक्षात कसं आलं नाही की मृणाल आज बॅग घेऊन बाहेर पडली आहे! माझं काय लक्षच नाही का तिच्याकडे? आणि असं काय इथं घेऊन आली आहे ती?

मृणालनं थर्मास बाहेर काढला. वाफा येत असलेली कॉफी वरच्या प्लॅस्टीकच्या टोपणात तिनं ओतली, माझ्या हातात दिली. त्याबरोबर कुरकुरीत चीजलिंग! त्या थंड हवेत गरम कॉफीचा घोट घशाखाली जाताना मोठं बरं वाटत होतं. तेथल्या बाकावर मी आरामात बसलो. मृणालनं बॅगेतून एक पॅड काढलं आणि माझ्या हातात दिलं. त्याबरोबर एक उंची पेस्टलची पेटी काढून माझ्या बाकावर ठेवत ती म्हणाली,

"हे आणायचं लक्षात होतं का?"

"अजिबात नाही! पण तू कसं आणलंस!"

"कारण मी विसरले नव्हते! इथल्या अगदी सगळ्या बारीकसारीक आठवणी मी जपून संभाळल्या आहेत! बरं आता चित्र काढा!"

का कुणाला माहीत, ती उंची पेस्टलची पेटी, कोरे ड्राईंगचे कागद पाहून माझ्या चित्तवृत्ती फुलून आल्या नाहीत. मी म्हणालो,

"मृणाल, पंधरा वर्षांत रंगकांडी हातात धरली नाही."

"पण म्हणून काय झालं? पेंटिंग करायचं कौशल्य कोणी का कधी विसरतो? काढा ना चित्र—!"

"कसली काढू?"

"त्या समोरच्या उंच वृक्षांची काढा. मागच्या धुक्यात गुरफटलेल्या हिमालयाची काढा...त्या दूरवर दिसणाऱ्या, उतरणीवर बसलेल्या, तीन चार झोपड्यांची काढा—!"

गाणं जसं आतून स्फुरावं लागतं तसंच चित्राचं असतं! विषय नेमका नजरेत भरावा लागतो. त्यातल्या रंगाच्या छटा बोलू लागायला हव्यात.

मी मृणालला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला; पण तिला पटेना. तिचा आग्रह थांबेचना! ती अगदी हटून बसली म्हणून मी








कागदावर दूरवर दिसणाऱ्या चिनारवृक्षाच्या आकृती रेखाटू लागलो. पण आता तेवढी सफाई राहिली नव्हती. माझी आऊट-लाईन पूर्ण होण्यापूर्वीच समोरचं दृश्य धुक्याआड पहाता पहाता लपलं.

चित्र काढताना जी एकाग्रता हवी ती मला बिलकुल साधेना. अनेक विचार मनात येत राहिले, प्रेसचे, नव्या मशीनरीचे, ऑर्डरींचे आणि इतर कितीतरी ! मन कुठं तरी भटकत होतं आणि बोटं उगीचच समोरचं दृश्य फोटोमध्ये घ्यावं तसं चित्र करण्यात गुंतले होते. निर्जीव, व्यक्तिमत्व नसलेलं, जसं दिसतं तसं रुक्षतेनं मांडणारं, कॅमेरानं टिपावं तसं चित्र माझी बोटं माझ्याच मर्जीविरुद्ध करत होती ! साराच प्रकार कंटाळवाणा होता. एकदम माझी सगळी सहनशीलता संपली. मी मृणालला म्हणालो,

"चल उठूया आपण–!"

"आणि चित्राचं काय झालं?"

"नाही, आज नको. परत केव्हां तरी काढेन!"

"आता काढलंत तेवढं तरी पुरं करा ना !"

"खरंच मला नाही जमत–!"

"सारं जमतं. प्रयत्न केला पाहिजे. परत सुरुवात तरी करा!"

आणि मग एकदम काय झालं मला समजलं नाही.

त्या ड्रॉईंग पॅडवरून मी तो कागद ओढून काढला. त्याचे दोन तुकडे केले, दोनाचे चार... आणि चाराचे आणखीन् कितीतरी–!

पुढे, एकदम खोल दरीच्या काठाशी मी गेलो आणि ते चिटोरे खाली फेकून दिले. कितीतरी वेळ ते खालच्या दरीत छोट्या छोट्या सफेद रुईच्या कापसासारखे तरंगत होते.

मला ते दृश्य पाहून बरं वाटलं. मनाविरुद्ध कराव्या लागणाऱ्या एका गोष्टीपासून सुटका झाली म्हणून असेल कदाचित!

आम्ही दोघे तिथून उठलो. हॉटेलकडे परत निघालो. कुणीच कुणाशी एक अक्षरही बोलत नव्हतं.

काऊंटरवरून मी खोलीची किल्ली घेतली. इतक्यात तेथला माणूस म्हणाला, "साहेब, आपलं पत्र आहे !"

आम्ही दोघंही चकीत झालो. आमचा दार्जिलिंगचा पत्ता मुलांच्या बरोबर मी सांगलीला पाठवला होता. इतर कुणालाही मी दार्जिलिंगला गेलो आहे ह्याची माहिती नव्हती.

पत्र सांगलीचं तर नाही ना ? अवी, मीना बरे आहेत ना! मृणाल एकदम अस्वस्थ झाली.

पत्र सांगलीचं नव्हतं. मुंबईहून आमच्या पार्टनरनं पाठविलेलं दिसत होतं. आम्ही वर खोलीत आलो. मी पत्र फोडलं. प्रथम खालची सही पाहिली. ती दिनकरची होती.

दिनकरची आणि माझी मैत्री पंधरा वर्षांपूर्वीची ! हा प्रेस काढायच्या अगोदर आम्ही दोघेही युनिव्हर्सल प्रेसमध्ये नोकरीला होतो तेव्हांपासूनची ! तेव्हां मी त्याला दिन्या म्हणत असे आणि तो मला अन्त्या ! पुढं आम्ही प्रेस काढला. तो, मी आणि गोखले असे तिघे भागीदार ! छोटा प्रेस होता तोवर आम्ही निदान ऑफिसात एकमेकांना दिनकर व अनंता अशा सरळ नावानं हाका मारत असू. आता प्रेसचा व्याप वाढला. कामगारांच्या समोर असं एकेरी नावानं हाक मारणं बरं दिसत नाही म्हणून आम्ही एकमेकांना अहोजाहो म्हणू लागलो; पण हे सर्व वरवरचं ! आम्ही घरी भेटलो की अद्यापही दिन्या-अंत्याच म्हणतो. आमचे वैयक्तिक संबंध अद्यापही युनिव्हर्सल प्रेसमध्ये होते तसेच आहेत.

त्यामुळे ह्या पत्राचा औपचारिक मायना आणि त्यातली कायदेशीर वाटणारी भाषा पाहून मला मोठं विचित्र वाटलं.

पत्र टाईप केलेलं होतं.

"अनंत केशव गद्रे."

भागिदार–सेंट्रल प्रिंटींग प्रेस प्रा. लि.

हॉटेल पॅराडाईझ, दार्जिलिंग

सर,

दिनकरचं अशा भाषेत मला येणारं पहिलंच पत्र !

"आपण सांगलीला गेला असणार अशा कल्पनेनं मी आपल्या सासरी ट्रंककॉल घेतला होता. पण समजले की आपण दार्जिलिंगला गेला आहात. दहा दिवसांची रजा घेतल्यावर ती कुठं खर्च करायची हा सर्वस्वी आपलाच प्रश्न आहे हे मान्य केले तरी प्रेसची सध्याची परिस्थिती पहाता आपण नेमके ह्याच वेळी रजा घेऊन, आपण कोठे चाललो आहोत ह्याची भागीदारास कल्पना न देता दार्जिलिंगसारख्या चैनीच्या ठिकाणी जावे ह्याचे आश्चर्य वाटते. असो !"

पत्राची ही सुरुवात पाहून मला खरोखरच राग आला. आडून आडून अशी टोमणेवजा भाषा ऑफिसच्या पत्रात यायचं कारण नव्हतं.

पुढं पत्रात मजकूर होता की नव्या मशीनरीकरिता जे आम्ही साठ हजार रुपये भरले आहेत त्याबद्दल काही गोंधळ झालेला आहे. राहिलेल्या साठ हजाराकरिता इण्डस्ट्रियल फायनान्स कॉर्पोरेशनकडे आम्ही अर्ज केला होता. त्यांनी काही कायदेशीर मुद्दे काढले होते की इम्पोर्टचा परवाना दुसऱ्याच प्रेसच्या नावावर आहे. तो तुम्ही सरकारी परवानगीखेरीज परस्पर कसा विकत घेऊ शकता ? म्हणजे पूर्ण व्यवहारच कदाचित रद्दित करावा लागेल. आणि घातलेले साठ हजार परत मिळणं मोठं मुश्कील होऊन बसेल. ह्याशिवाय ही मशीनरी येणार म्हणून ज्या अनेक ऑर्डर्स घेऊन ठेवल्यात त्या पूर्ण करता येणं अशक्य होईल. त्याचा अर्थातच धंद्यावर परिणाम झाल्याखेरीज रहाणार नाही.

मृणाल फिरून पाय दुखू लागल्यानं समोरच्या कॉटवर बसून होती. तिनं विचारलं, "काय लिहिलंय पत्रांत दिनकर भाऊजींनी?"








"हे घे. वाच !"

मी पत्र तिच्या हातात दिलं. मृणाल पांचएक मिनिटं पत्र वाचत होती. किंवा पहात होती.

"मग आता?" मृणालनं विचारलं.

"तूच सांग ना काय करायचं ते. मी तुला सांगत होतो मुंबईबाहेर पडायला भलती वेळ शोधलीस तू !

"सांग ना–!"

थप्पड मारल्यासारखी मृणाल गप्प झाली. उठली आणि खिडकीजवळ जाऊन उभी राहिली. एकदा वाटलं, जावं तिचा दंड धरून तिला विचारावं–झालं ना समाधान! तरी मी तुला सांगितलं होतं की आत्ताच दार्जिलिंगला जाण्यावाचून काही अडलं नाही.

इथं आल्यापासून प्रत्येक गोष्ट पंधरा वर्षापूर्वी घडली तशीच घडावी ही हिची अपेक्षा ! जे पंधरा वर्षापूर्वी केलं ते, तसंच आपण करावं हा हिचा वेडा आग्रह ! असं घडतं का ? हिंदी चित्रपटात असेल ! प्रत्यक्षात घडतं का असं ? आज तिनं मला चित्र काढायला लावलं हा त्या सर्वांचा कळस–!" मी काही 'तो' राहिलो नव्हतो ! ती स्वतः तरी 'ती' कुठं आहे? झाडं, डोंगर आणि इमारती सोडल्या तर पंधरा वर्षापूर्वीचं कुठं काय आहे ? अगदी त्याच हॉटेलात उतरूनही दादाजी भेटले काय? पॅरलेसिसनं करशाँगला आजारी पडलेच ना ते !

मी टेलीफोन उचलला. मॅनेजरला विचारलं, "मला आपली स्टेनोग्राफर मिळू शकेल काय ?"

"हॉटेलचंच काम एवढं असतं की आम्हांला गिऱ्हाईकांना स्टेनोग्राफर देता येत नाही पण तुमच्याकरिता पहातो शक्य आहे का?"

एक तर त्यानं हो म्हणायचं होतं किंवा नाही ! ही उपकाराची जाणीव करून द्यायची काय जरूर होती. मी अधिकच वैतागलो.

दारावर टक् टक् असा आवाज आला आणि त्यामागोमाग किमोनो घातलेली, सफरचंदांच्या गालांची, बारीक डोळ्यांची, चपटया नाकाची सुरेख तरुणी आत आली.'

To,

The Paitner,

Central Printing Press Pvt. Ltd.

मी तिला पत्राचं उत्तर सांगू लागलो. भाषा मूळच्या पत्रासारखीच औपचारिक होती, तिरकस होती.

"आपले पत्र पावले ..... मजकूर काळजीपूर्वक वाचला ... इण्डस्ट्रीयल फायनान्स कॉर्पोरेशनने कर्ज देतो म्हणून एकदा कबूल केल्यावर ज्या अडचणी उपस्थित केल्या आहेत त्याबद्दल मला काही लिहिण्यापेक्षा आपल्या सॉलिसिटर्सचा सल्ला घेणे अधिक योग्य झाले असते.... अद्यापही ते करावे.

नवीन मशीनरीच्या भरवशावर घेतलेल्या ऑर्डरीबाबत आपणाला इतर प्रेसशी बोलणी करता येतील. ती मी तिकडे आल्यावर केली तरी चालतील...."





अनुक्रमणिका

मृणाल अद्यापही खिडकीजवळ तशीच उभी होती. आमच्याकडे पाठ करून ! हे सर्व तिनं मला अवेळी मुंबईहून बाहेर येणं भाग पाडल्यानं उद्‌भवलं. आणि आता ती आपला काही संबंध नसल्यासारखी आमच्याकडे पाठ करून दार्जिलिंगचं सृष्टीसौंदर्य पहात मख्खपणे उभी आहे.

तिला ह्यात ओढल्याखेरीज मला रहावेना. तिला मी विचारलं, "आपण किती दिवस आहोत इथं अजून ?"

"हॉटेलचं रिझर्व्हेशन आपण दहा दिवसांसाठी केलंय !"

"ते नाही विचारत मी ! आपण आणखीन् किती दिवस रहायचं एवढंच विचारतो आहे !"

"आज आपल्याला येऊन चार दिवस होताहेत. आणखीन सहा दिवस तरी रहाता येईल आपल्याला !"

पैशांचं कर्ज पैसा देऊन फेडता यतं. ही भावनांची कर्जं, देणारा म्हणेल त्या तऱ्हेनं, म्हणेल त्या स्वरूपात परत फेडावी लागतात. मागील खेपी बायकोला ती गणपतीपुळ्याला जाऊया म्हणत असताही केवळ माझ्या हौसेसाठी इथं दार्जिलिंगला घेऊन आलो. आता ह्या खेपी तिचं समाधान होऊ दे.

मी तेथली गंभीर परिस्थिती जाणतो....पण सध्यातरी मला आणखीन सहा दिवस दार्जिलिंग सोडता येणार नाही.

पत्राबद्दल मी आपला आभारी आहे .....कळावे ही विनंती....!"

माझ्या ह्या मजकुराचा मृणाल वर काय परिणाम होतो ते मी पहात होतो. तिनं मागं वळून पहायचीही तसदी घतली नाही. ती तशीच पाठमोरी खिडकीत उभी राहिली. भागीदाराचा वाईटपणा आणि धंद्यातलं एवढं मोठं नुकसान पत्करून मी केवळ तिच्यासाठी इथं रहातो आहे ह्याबद्दलची कृतज्ञता तर जाऊ देच; पण साधी जाणीव देखील तिला दिसत नव्हती. ती कशी करून द्यावी ह्या विचारात मी होतो. इतक्यात मृणाल वळली, तिच्या चेहऱ्यावरून मघाशी मी स्टेनोग्राफरला सांगत असलेला मजकूर तिनं ऐकला वा नाही हे कळणं अशक्य होतं. स्वतःच्याच तंद्रीत हरवल्यासारखी ती म्हणाली, "मी विचार करत होते....!"

"बोला."

"अहो नका म्हणू!" मला तिचा राग आला की मी तिला 'अहो' म्हणत असे आणि तिला मी 'अहो' म्हटलेलं बिलकुल खपत नसे.

"मी विचार करत होते, हा प्रेस, नवी मशीनरी, कामगारांच्या संपाच्या धमक्या, कर्ज ....ह्या सर्वांपेक्षा पूर्वी तुम्हाला दोनशे रुपये मिळत होते ते काय वाईट होते ? खूप सुखी होतो तेव्हां आपण–!"

"वाः तुला ते चालत असेल तर ह्या कटकटी, अनंत उपद्‌व्याप माझ्या मागं लावून घेण्याची मला हौस नाही. पण विचार कर आज नाही म्हटलं तरी चाळीस-पन्नास कुटुंबं आपल्या प्रेसमुळे चालताहेत.....!"

"ती चालत होतीच की पूर्वी ! आणि उद्या आपला प्रेस बंद झाला तर काय त्यांना दुसरीकडे काम नाही मिळायचं ?"

"मिळेल की ! प्रश्न त्यांचा नाही, आपला आहे!" मला नवीन मुद्दा सुचला. आपला ओनरशिपचा ब्लॉक सोडून परत चाळीत रहायला जावं लागेल. मुलांना कॉन्व्हेंटमधून काढून म्युनिसिपालीटीच्या शाळेत पाठवावं लागेल आणि पैसे नसल्यानं त्यांच्याबरोबर दुपारी खायला खाण्याचा डबा नसेल. मोफत मिळणारं नगरपालिकेचं पाणीदार दूध पिऊन त्यांना आपली भूक भागवावी लागेल. आहे का तुझी तयारी–?"

–मृणाल गप्प झाली. पण मी तेवढ्यावर तिला सोडायला तयार नव्हतो. "असं आहे मृणाल–आपण जेव्हां फर्स्टक्लासमधनं प्रवास करत दार्जिलिंगला येतो. परदेशी टूरिस्ट उतरतात, त्या हॉटेलात उतरतो, बेल दाबली की वेटर आपणाला हवे ते जिन्नस तत्परतेने घेऊन येतो, तेव्हां खिडकीतून दार्जिलिंगचं सौंदर्य पहात केवळ चर्चा म्हणून बोलायला ह्या गोष्टी ठीक आहेत. पूर्वी अनुभवलेल्या गरिबीतील अडचणी मुलांना गोष्टी म्हणून आज सांगायला ठीक आहेत, पण परत तीच परिस्थिती आली तर–! काय पटतं आहे का आपल्याला–?"

दारावर टक्‌टक्‌ आवाज झाला. ती सिक्कीमी तरुणी टाईप केलेलं पत्र घेऊन आली. मी पत्रावर सही करून दिली. पत्राची कॉपी तिनं टेबलावर ठेवली. पत्र आणि लिफाफा घेऊन ती निघून गेली.

सुन्न झाल्यासारखी मृणाल खिडकीला टेकून उभी होती. मला बरं वाटलं. तिच्या त्या दुखावलेल्या स्थितीमुळे माझ्या मनात कुठं तरी कोवळीक निर्माण झाली. मी म्हणालो, "ये बैस इथं!"

मृणालनं मान हालवली. ती होती तिथंच उभी राहिली. ह्या तिच्या अबोल्याने त्या कोवळीकेचा अंकूर जळून गेला. मीही गप्प झालो.

हा अबोला असाच संध्याकाळपर्यंत चालू राहिला. एका खोलीत आम्ही दोघे एकमेकांना टाळायचा प्रयत्न करत होतो. जाणीवपूर्वक दुसऱ्याचे खोलीतले अस्तित्व विसरल्याचा आविर्भाव करत होतो. मी मनातल्या मनात धुसफुसत होतो. मृणालच्या चेहऱ्यावरून तिच्या मनात काय चालले आहे हे मला समजत नव्हते.

हा अबोला संपावा असं सारखं वाटत होतं; पण वाकायची माझी तयारी नव्हती. मनात 'मी' पणाचा विखारी नाग फणा काढून फुत्कारत होता. आमच्या प्रेमाला, पतिपत्नीच्या नात्यानं निर्माण होणाऱ्या जवळिकेला पुन्हा पुन्हा दंश करत होता. शरीरात विष साचत होतं. पिंजऱ्यात दोन श्वापदं कोंडावीत तसे ह्या सुख-





सोयीनी नटलेल्या खोलीत आम्ही दोघे बंदीस्त झालो होतो. एकमेकांना दुखावण्याची संधी शोधत होतो.

भयानक! फारच भयानक! विशेषतः ह्या दार्जिलिंगच्या प्रणयरम्य पार्श्वभूमिवर हे सर्व भयानक होतं ! इथं एकेकाळी आम्ही आमचा मधुचंद्र साजरा केला होता. त्या स्मृतींना उजाळा देण्यासाठी आम्ही इथं आता आलो होतो–! आणि जे घडत होतं ते हे असं !"

संध्याकाळ झाली ! खोलीत बसणं अशक्य झालं. पड खाऊन मी मृणालला म्हणालो, "चला बाहेर जरा फिरून येऊ–!"

आकाश ढगाळलेलं होतं. कधीही पावसाला सुरुवात झाली असती. पण तो परवडला, त्या खोलीच्या पिंजऱ्यात बसून रहाण्यापेक्षा!

थिएटरच्या बाहेर इंग्लीश सिनमाची पोस्टर्स लागली होती. चित्रातली दुनिया रंगीबेरंगी होती. वातावरणात संगीताचे सूर होते. चित्राचं नाव होतं–साऊंड ऑफ म्युझिक. पुन्हा पुन्हा पहावासा वाटावा असा चित्रपट. त्या प्रेमात पडलेली ती तरुण–तरुणी.

रात्रीची वेळ.... पावसाच्या सरी आणि त्यानंतर रंगलेले गाणे "I am sixteen, going on seventeen !" प्रेमाची पहिली चाहूल. प्रीतीचा हलकासा स्पर्श, मोहरलेल्या चित्तवृत्ती !

आम्ही दोघेही थांबलो. क्षणभर किमोनो घातलेली लिनी माझ्या नजरेसमोर उभी राहिली. आणि त्यामुळे तर आताचा रुक्ष अबोला, तुटकपणा, परकेपणा, उपेक्षा सारंच बोचू लागलं.

ह्या साऱ्यांचा विसर पडेल सिनेमाला गेलो तर! परत पड खाऊन मी विचारलं,

"जाऊया सिनेमाला?"

"मुंबईत पाहिलाय की!"

"परत पाहू!"

"नको."

"चल ग!"

"तुम्ही जा. मी हॉटेलवर परत जाते !"

हा चाबकाचा फटकारा ! संधी मिळेल तेव्हां असाच परत करायचा ! आम्ही पुढं निघालो.

मालवर आलो. पावसाच्या भीतीने लोक बाहेर पडलेले नसावेत. संध्याकाळी गजबजणारा रस्ता आज सुनासुना वाटत होता. सारं दार्जिलिंगच मरगळल्यासारखं दिसत होतं. एरवी कुंद, रम्य, स्वप्नाळू वाटलं असतं असं वातावरण आज उदास वाटत होतं.

माल ओलांडून आम्ही तसेच चालत राहिलो. दिशाहीन, अर्थशून्य भटकणं ! असे आणखीन् सहा दिवस दार्जिलिंगमध्ये काढायचे ! कल्पनाच भयावह वाटते. सहा दिवस आणि सहा रात्री!

एकदम पावसाची सर आली. आसऱ्यासाठी आम्ही रस्त्याच्या

कडेच्या दुकानात शिरलो. मृणाल प्लॅस्टिकचा रेनकोट अंगावर चढवू लागली. मी छत्री उघडू लागलो. एवढ्यात दुकानदार म्हणाला, "या, या आत या ना !"

दुकान कापडाचं होतं. नवीनच असावं. चांगलं मोठं होतं. एका बाजूला कपडे शिवून मिळण्याचीही सोय केलेली दिसत होती.

दुकानदाराचा चेहरा कुठं तरी पाहिल्यासारखा वाटला. पण निश्चितपणे कुठं ते आठवेना.

मृणालनं रेनकोट घातला. आम्ही बाहेर पडणार तो तो दुकानदार म्हणाला, "कधी आलात दार्जिलिंगला ?"

"झाले चार दिवस !"

हॉटेल पॅरडाईस का !?"

"होय !"

मग आमच्या गोंधळलेल्या चेहऱ्याकडे पहात तो म्हणाला, "नाही ना ओळख लागत !"

"पाहिल्यासारखं वाटतंय पण....!"

"मागच्या खेपी बाईंचा किमोनो मी शिवला होता. दादाजींच्याकडे पाठवला होता. सांगत होते—नोर्केसाहेबांची आणि आपली ओळख आहे......"

"पण दुकान इथं कुठं ? बाजारपेठेत होतं ना !"

"ते आहेच! मुलगा पहातो. हे गेल्यावर्षीच नवीन काढलं! या ना आत या !"

गत्यंतरच नव्हतं. बाहेर पाऊस कोसळत होता. दुकानात गिऱ्हाईकं नसल्याने मालकासही फुरसत दिसत होती.

"एकदा गिऱ्हाईकाचे कपडे शिवले की पंधरा वर्षांनी विचारा, आपली आठवण एकदम पक्की ! तारीखच काय मापं देखील बरोबर सांगू आम्ही !"

मग हसत हसत त्यानं विचारलं—"काही खरेदी...बाईंच्या-साठी किमोनो...!"

"त्यांनाच विचारा ना!"

"नको. मागचा तसाच आहे अद्याप !"

"तो काय आता अंगाला येणार आहे ? नवीन शिवू.... मुक्काम आहे ना!"

"पण नकोय्!" मृणाल!

दुकानदाराच्या गळेपडूपणानं मृणालला अस्वस्थ झालेली पाहून मला बरं वाटलं. मी म्हणालो, "पहा नवीन किमोनो दोन दिवसात शिवून मिळेल !"

"हो तर, अर्जंट शिवून देऊ. कोणता रंग हवाय.... फिक्का हिरवा छान दिसेल. हा पहा...!" त्यानं एक तागा बाहेर काढला.

"नको. थँक्स् !" मृणाल म्हणाली आणि बाहेर पडली. तिच्या मागोमाग मी बाहेर आलो. आम्ही दोघे पावसातून हॉटेलची वाट चालू लागलो. मृणालच्या रेनकोटला टोपी नव्हती. तिचे केस भिजत होते. मी म्हणालो,

"छत्रीत ये! केस भिजताहेत."

मृणाल छत्रीत आली नाही. माझे शब्द ऐकू आले एवढंही तिनं चेहऱ्यावर दाखवलं नाही. ठीक आहे. तुला भिजायचं आहे तर मी काय करू? तुझी मर्जी ! मी आग्रह केला नाही.

हॉटेलातल्या खोलीत आम्ही पोहोचलो तेव्हा मृणालचे केस ओलेचिंब झाले होते. रेनकोट काढल्यावर केसातलं पाणी साडीवर ओघळू लागलं. तिच्या मांझ्या अबोल्याचा मला विसर पडला. टॉवेलनं तिचे केस पुसून कोरडे करावेत, कपाळावरून ओघळणारे पाण्याचे थेंब ओठांनी टिपून टाकावेत अशी उर्मी आली. टॉवेल घेत मी मृणालला म्हणालो, "इकडे ये. तुझ्या केसात पाणी मुरलं तर सर्दी होईल तुला!"

मृणाल आली नाही. रेनकोट हॅन्गरला लावून हॅंगर बाथरूममध्ये टांकण्यासाठी ती निघाली. मी तिला मध्येच थांबवलं. "तुझे केस तर मला पुसू देशील !" मृणालनं खसकन् माझ्या हातून टॉवेल ओढून घेतला आणि ती म्हणाली, "तुमचं प्रेम नकोय मला. फार उपकार होतात त्याने!"

मी एकदम अवाक झालो. "काय झालं ? मृणाल?"

"तुम्हाला असं वाटतं का की मोठे उपकार केले आपण बायकोवर दार्जिलिंगला येऊन ! पैसे मी साठवले. तिकीटे मी काढली, हॉटेलचं रिझर्व्हेशन मी केलं, ह्यापैकी कशाकशाचा तुम्हांला त्रास नको म्हणून मी धडपड केली. पंधरा वर्षांनंतर रजा घ्या म्हणून पहिल्यांदा हट्ट धरला मी तुमच्यापाशी ! त्यात भावना ही होती की तुम्हाला तुमच्या रामरगाड्यातून विश्रांती मिळावी. रोजच्या कटकटींचा विसर पडावा, तुम्ही ताजेतवाने व्हावेत. तर तुम्ही मला आपण काही फार मोठा त्याग करतो आहोत अशा भावनेनं मुंबई सोडल्यापासून वागवताहात"

"मृणाल, वेड्यासारखं बोलू अकोस !"

"मी वेडी आहे म्हणून तर इथं आले. तुम्ही एकेकाळी वेडेच होता. रत्नागिरीची तिकीटं रिझर्व्ह करायला जाऊन दार्जिलिंगची तिकिटं काढून आणलीत. तुमच्या वेडानं मी वेडी झाले. स्वतःला हरवून बसले. पुढं तुम्ही शहाणे झालात, व्यवहारी झालात, प्रेसचे बडे मालक झालात. मी तशीच वेडी राहिले. आता तुम्ही माझ्याकडे पाहून हसताहात....वेडी वेडी म्हणून !"

"मृणाल"— पुढं होऊन मी मृणालचा हात धरला.

खसकन तो सोडवून घेत ती म्हणाली, "वेड्या माणसाला शहाणे लोक दगड मारतात. मला वाटतं हे क्रौर्य माणसांत नेहमी असतं पण तुमचा क्रौर्याचा सात्विक, सज्जन मासला पाहून मी आज थक्क झाले!"

"मी....मी काय केलं?"







अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




"त्या दुकानदारासमोर मला अहो म्हणत होता तुम्ही! त्याला सांगत होतात–शिवा ना आणखीन एक किमोनो बाईना. त्यांचं माप बदललंय. तो गळेपडू आग्रह करत होता, तुम्ही सुखात होता. त्यात आनंद मानत होता."

हे फार झालं! अति झालं. ऐकून घेतलं म्हणजे बायका अशाच बेलगाम बोलतात. डोक्यावर चढून बसतात.

"का, गप्प का आहांत ? बायकोला छळायचा, तिचा पाण उतारा करायचा, तिच्या अपमानाचा आणखीन दुसरा मार्ग शोधताय्!"

पुरे पुरे. एरवी माझा माझ्यावर तावा रहायचा नाही.

"नाहीतरी आज विचारत होताच, तुझी मुलं म्युनिसिपालटीच्या शाळेत घालशील का म्हणून ? कशाकरीता तर बायकोनं दार्जिलिंगला येण्याचा आग्रह केला म्हणून ? पंधरा वर्षे संसार केला मी तुमच्याशी. पण आता किळस वाटते मला तुमची–!"

आणि पंधरा वर्षात पहिल्यांदा माझा तोल सुटला. थाडकन् थोबाडीत द्यावी आणि मृणालचं तोंड बंद करावं म्हणून मी उठलो. हात उगारला, तो खाली येण्यापूर्वीच अवचित टेलिफोनची कर्कश घंटा वाजू लागली. क्षणभर मी आणि मृणाल चित्रासारखे होतो तसेच स्तब्ध उभे राहिलो. प्रथम मानावर मृणाल आली. फोन तिनंच उचलला. "हॅलो.... येस्..... येस् मुंबईचा ट्रंककॉल आहे!"

तिनं माझ्याकडे फोन दिला. दूरवरून क्षीणसा दिनकरचा आवाज आला, "माझं पत्र मिळालं ?"

"मिळालं. त्याला उत्तरही मी आज पाठवलंय्!"

"उत्तर जाऊं दे, तू निघून ये तावडतोब!"

मृणालकडे पहात मी परत म्हणालो, "नाही, ते शक्य नाही. देणं द्यायचं आहे ते देऊन टाकतोय्. आणखीन् सहा दिवस तरी इथं राहिलं पाहिजे मला!"

"कसलं देणं, पैसे हवेत का, मी पाठवतो, पण तू निघून ये" आणि मग पत्रातलाच मजकूर तो सांगत राहिला. साठ हजार रुपये म्हणजे थोडीथोडकी रक्कम नाही. शिवाय सरकारी चौकशी, प्रश्न कॉर्पोरेशनचे पैसे घेतलेल्या नव्या ऑर्डरी

मी हे सगळं पत्रात वाचलं होतं. दिनकर अगदी कातावून बोलत होता. तशीच गंभीर परिस्थिती असल्याखेरीज दिनकरनं मला फोन केला नसता, हेही मला समजत होतं. पण मृणालला त्याचं सोयरसुतक नव्हतं. ती तिच्याच विचारात फिरून खिडकीजवळ उभी !

हीही तिला दुखवण्याची एक संधी ! मी फोनवरून येणारा दिनकरचा आवाज बरवर निर्विकारपणे ऐकत होतो. तो बोलायचा थांबला, मी काहीच उत्तर दिलं नाही.

"येतो आहेस ना तू !"

"पत्रात मी तुला सविस्तर लिहिलं आहे. झालेल्या प्रकाराबद्दल तू फडके सॉलिसिटर्सचा सल्ला घे. नव्या ऑर्डरीबद्दल मी आल्यावर बोलू..."

"म्हणजे कधी येतो आहेस तू?"

"आणखीन् सहा दिवसांनी!" मी म्हणालो.

"Three minutes over !" ऑपरेटरनं सांगताच दिनकरनं "Continue please" म्हणण्यापूर्वीच मी फोन बंद केला.

आता तरी झालं समाधान ह्या अर्थाचा कटाक्ष मृणालकडे टाकून मी अंगातला अर्धवट भिजलेला शर्ट काढू लागलो.

मृणालवर ह्या फोनचा, मी ह्या अडचणीतही तिच्याकरिता आणखीन सहा दिवस रहायचं ठरवलं आहे, ह्यापैकी कशाचाच परिणाम नव्हता. अद्याप तिच्या केसांतून पाणी ओघळतच होतं. मघाच्या भांडणानं आमचा पूर्वीचा अबोला अधिकच गडद झाला होता.

त्यानंतर एकमेकांचा काही संबंध नसलेली दोन माणसं नाईलाजानं एका खोलीत रात्र काढायची पाळी आली तर जशी वागतील तसे आम्ही वावरत राहिलो. अगदीच आवश्यक झालं तर बोललेला एखादा शब्द आमच्यातला परकेपणा अधिकच वाढवत होता. घुमसणाऱ्या वातावरणात थेंब थेंब तेल ओतत होता.

दोघांपैकी कोणीच जेवायला गेलं नाही. जेवायला येणार का ? म्हणून साधी औपचारिक चवकशीही आम्ही एकमेकांची केली नाही. शक्य तो एकमेकांचे अस्तित्व विसरण्याचा आमचा प्रयत्न होता. निदान वरवरचा तरी !

कपडे बदलून मृणाल बिछान्यावर पडली. मी रग घेतला आणि मोठ्या सोफ्यावर पसरलो. माणसाला रागानही ग्लानी येत असावी. उपाशीपोटी माझे डोळे मिटू लागले. मृणालनं हात लांब करून कॉट जवळचा दिवा बंद केला. बिछान्यावर पडलेली तिची आकृती एरवी मला मोहक वाटली असती. आता माझ्या लेखी ती एक पुतळी होती, सुरेख पण हृदयशून्य ! शुभ्र संगमरवरी पण केवळ दगडी ! तिच्याकडे पहाणंही मला नकोसं झालं. मी डोळे मिटून घेतले. मला केव्हां झोप लागली ते समजलं देखील नाही.

रात्री केव्हांतरी मी दचकून जागा झालो. माझ्या कपाळाला कसला तरी स्पर्श झाला होता. पहातो तो तो हात मृणालचा होता. सोफ्याशेजारी ती जमिनीवर बसलेली होती. खोलीत अंधार दाटला होता. मृणालची अस्पष्ट आकृती दिसत होती तेवढीच. एरवी तिच्या चेहऱ्यावरचा भाव मला दिसत नव्हता.

एकदम वाटलं तिचा हात झिडकारून टाकावा. शब्दांचा फटकारा वर्मी बसेल असं काही तरी तिला सुनवावं.

पण मला बोलायची संधी न देता मृणाल म्हणाली, "माझं एक ऐकायचं!"

"बोला!"





ह्या परकेपणाच्या आदरार्थी उल्लेखाकडे दुर्लक्ष करून मृणाल म्हणाली, "आपण मुंबईला जाऊया!. उद्याच!"

"उद्या?"

"हो उद्या विमानानं!"

"पण तिकीटं मिळतील का ?"

"विचारा ना मॅनेजरना! साडेदहा तर वाजताहेत आता!"

मी उठून वसलो तशी घाईघाईनं मृणाल म्हणाली,

"दिवा नका लावू!"

मी हात लांबवला. फोन उचलला आणि मॅनेजरला उद्याची तिकीटं मिळतील का म्हणून विचारलं."

"थोडं थांबा, चवकशी करतो–!" मॅनेजरनं सांगितलं. फोन डिस्कनेक्ट झाला. अंधारात मिनिटं वितळत होती. आम्ही दोघे गप्प –होतो तसेच स्तब्ध बसून राहिलो.

फोनची घंटा वाजली.

"पहिल्या, सकाळी सहाच्या फ्लाईटची तिकीटं नाहीत. दुसरी फ्लाईट दुपारी बाराची आहे. कलकत्त्याहून संध्याकाळी मुंबईचं प्लेन मिळेल. चालेल?"

"चालेल, दोन तिकीटं रिझर्व्ह करा !"

"ठीक आहे !" मॅनेजरनी फोन बंद केला.

मी तसाच सोफ्यावर पडलो. मृणाल अद्याप जमिनीवरच बसलेली होती. तिने फिरून माझ्या कपाळावर हात ठेवला. हलके हलके तिची बोटं माझ्या केसातून फिरू लागली.

"आता माझं एक ऐकाल ?"

"बोला." अद्यापही कुठंतरी मद्याच्या दंशाचं विष होतंच.

"उद्या दुपारी आपण निघायचं आहे!"

"होय!"

"मग पहाटे उठाल? मी उठवेन तुम्हाला. टायगर हिलला जाऊन यायचं तुम्ही!"

"मी ? एकट्यानं!"

"हो. मला चालवणार नाही. मी रस्त्यातच थकेन आणि तुमचा सूर्योदय चुकेल. शक्य झालं तर माझ्यासाठी सूर्योदयाचं एक चित्र काढून आणायचं मागच्यासारखं!"

"हं!"

"मागचं चित्रं तुम्ही त्याना देऊन टाकलेंत. मला फार फार आवडलं होतं ते ! आणाल ना?"

"पाहीन!"

मृणालनं पुढं प्रश्न विचारले नाहीत. माझ्या केसातून तिची बोटं फिरत राहिली. माझ्या डोळ्यातली झोप आता उडाली होती.

## [९]

"मुंबईला कधी परतायचं आपण?"

"का एवढ्यातच नवऱ्याचा कंटाळा आला?"

"काही तरी काय ?"

तुम्हीच म्हणाला होता चार दिवस रहाण्याएवढेच पैसे आहेत आपल्याजवळ!"

"बरं मग?"

"चवथा दिवस कालच संपला!"

"संपला का? आश्चर्य आहे. मला तर सारखं वाटतंय की आपण कालच आलो दार्जिलिंगला आणि एक आठवडा तरी इथं रहायचं आहे!"

काय बोलायचं ह्यावर ! हा माणूस असाच, कसलीच कशी ह्याला काळजी नाही. उद्या दादाजींनी हाताला धरून हॉटेलबाहेर काढलं तर–? आणि त्या किमोनोचे पैसे द्यायचे आहेत अद्याप! बहात्तर रुपये चार आणे!"

दारावर टक्टक् असा आवाज आला. नोकर दादाजींचा निरोप घेऊन आला होता – बोलावलं म्हणून!"

लिनी घाबरून गेली. शंकाच नको. जागा खाली करा आणि पैसे कधी देता हेच विचारायला दादाजींनी बोलावलेलं असणार. नाहीतर दुसरं कारणच काय बोलवायचं!"

अनंताच्या चेहऱ्यावर काळजी नव्हती. 'आत्ता जाऊन आलोच' म्हणून तो बरोबर आलेल्या नोकराबरोबर गेलासुद्धा!"

छे, छे उगीचच आपण हो म्हणालो, त्याऐवजी गणपती-पुळ्याला गेलो असतो तर! तिथे कोणाची तरी ओळख निघाली असती. अडिअडचणीला कोणी मदतीला हात पुढे केला असता. हा प्रांत परका, कुणाची ओळख ना देख !

आणि हा माणूस असा ! कुणाचीही थट्टा करतो. देवमुद्धा सुटले नाहीत त्यातून! कृष्णाला हा भैय्या म्हणतो आणि शंकराला शंकरराव ! त्याचाच परिणाम असावा हा! नाहीतर दादाजी बोलावतील कशाला ?

स्वतःच्याच विचारांच्या आवर्तात लिनी घाबरून गेली. अनंताला जसा वेळ होत चालला तशी ती अधिकच अस्वस्थ होत चालली. शेवटी तिला अगदी रहावेना. ती तशीच उठली, खाली दादाजींच्या खोलीकडे चालू लागली. आता कोणता प्रकार पहायला मिळतो कुणास ठाऊक ह्या विचारानं तिच्या छातीत धडधडत होतं.

ती खाली पोहोचली तेव्हां ट्रेमध्ये दोन कप चहा दादाजींच्या विरोधाला न जुमानता अनंता तयार करत होता. गोबऱ्या गालाचा बबलू दादाजींच्या मांडीवर बसलेला होता.




लिनीला पहाताच ऐसपैस हसत दादाजी म्हणाले, "आओ, आओ, तुम्हे कैसा पता लगा, यहाँ चाय बन रही है?"

लिनीची भीती अद्याप ओसरलेली नव्हती. ती दादाजींच्या समोरच्या खुर्चीवर अनंताशेजारी बसली.

दादाजी म्हणाले, "नही नहीं मैं नहीं चाय पिऊंगा, एक कप तुम ले लो, दुसरा बेटी को दे दो !"

"दादाजी आप एक कप लिजिए. हम आधा आधा लेंगे. After all she is my better half.

अनंतानं दादाजींच्या हातात एक कप दिला. आपल्या हातातला चहा बशीत ओतला, बशी लिनीकडं दिली. तिने चहा पिऊ लागले.

दादाजी म्हणाले, "बेटी तुम बोलो–यह तकल्लुफ ठीक है क्या?"

"काय झालं?"

"आज ह्यांची तार मनी ऑर्डर आली आहे, बहात्तर रुपये चार आण्याची ! त्या शिप्याचं बिल आम्ही दिलं, ते पैसे परत करण्यासाठी !"

सुटले, केवढा मोठा पत्थर उतरला माझ्या डोक्यावरचा! तेवढ्यासाठी आपण रहात होतो तर इथं, मग सांगायचं तरी मला? उगीचच जीव टांगणीला लावून ठेवायची सवय यांची !

"पण ह्या पैशांचा चेक नसता का घेतला मी! आणि तशीच पाळी आली असती तर मुंबईहून पाठवायचे होते पैसे ! एवढा विश्वास ठेवला असता आम्ही ! तुम्ही तर नोर्के साहेबांचे पाहुणे !"

इतक्यात नोकर बिल घेऊन आला. दादाजींनी ते अनंताकडे दिलं. हॉटेलमध्ये रहाण्याचं आणि घेतलेल्या जेवणांचं बिल होतं ते ! बिलाचा आकडा पाहून अनंता म्हणाला,

"माफ करा दादाजी, एक गोष्ट मला स्पष्ट करायची आहे. तेनसिंगसाहेबांची आणि आमची केवळ तोंडओळख ! जागा मिळत नाही म्हणून आलेल्या दिवशीच मुंबईला परतायचं ठरवत होतो आम्ही. तेनसिंगसाहेबांनी चिठ्ठी दिली, एवढाच त्यांचा आमचा परिचय !"

दादाजींना ही बातमी अगदीच नवीन होती.

"पण असं पत्र नोर्केसाहेब कुणाला देत नाहीत. इथं तशी चिठ्ठी घेऊन येणारे तुम्ही पहिलेच !"

"मग तो त्यांचा मोठेपणा !"

पण त्याकरिता तुम्ही आम्हाला बिलात सूट देऊ नका. रीतसर जे बिल झाले असेल तेवढं देण्यापुरते पैसे आहेत माझ्याजवळ!

दादाजी हसले, म्हणाले, "वह कौन ना कहता है ! देखो जिस जगह पर आप ठहरे है नं वह तो हमारी हॉटेलकी रुम है नही! ऐसी ही अरेंजमेंट करा दी थी; और जितना खाना खाया तुमने

---


STATEMENT ABOUT OWNERSHIP AND OTHER PARTICULARS ABOUT NEWSPAPER "DIPAVALI" MONTHLY

FORM IV (SEE RULE 8)

1. Place of Publication — Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay-4.
2. Periodicity — Monthly, on 1st of every month.
3. Printer's Name — Smt. Sumati Dinanath Dalal.
   Whether Citizen of India — Yes
   Address — 42, Kennedy Bridge, Bombay-4.
4. Publisher's Name, Nationality and Address — As per 3 above.
5. Editor's Name, Nationality and Address — As per 3 above.
6. Names and addresses of individuals who own the newspaper and partners or shareholders holding more than one percent of the total capital. — Smt. Sumati Dinanath Dalal, Sole Proprietor. No partners or Shareholders.

I, Sumati Dinanath Dalal, hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.

Date 1-3-1971

(Mrs.) S. D. Dalal
Signature of Publisher

उसका तो पैसा लगाया है ! और देखो मैय्या, वैसे तो खूब कमाते हैं हम ! जिनसे लेना है, बराबर लेते है !"

अनंतानं बिलाचे पैसे दिले. खिशातून एक छोटासा माऊथ-ऑर्गन काढला आणि तो बबलूच्या हातात दिला. हा कधी घेतला ह्यानी, आपणाला तर पत्ताच नव्हता.

तो चकचकीत वाजा पहाताच बबलू खूष होऊन गेला. दादाजी म्हणाले, "हे काय ? कशाला..." पण अनंतानं त्यांना बोलू दिलं नाही.

दोघं खोलीत परत आली.

"पैसे कुणाकडून मागवले होते तुम्ही ?"

"दिनकरकडून ! हे बघ त्याचं पत्रही आलंय्!"

अनंतानं पोस्ट कार्ड तिच्या हाती दिलं.

श्रीकृष्ण

मुंबई ४
दि. २५-५-१९५५

प्रिय अन्त्यास–

दोन्ही हात जोडून साष्टांग नमस्कार.

गणपतीपुळं हे देवस्थान रत्नागिरीजवळ आहे असं मी समजत होतो. पण ते दार्जिलिंगजवळ आहे हे तुझ्या पत्रावरून समजलं. समस्त भूगोलाची पुस्तके आणि नकाशे ह्यात हा तुझा नवीन शोध नमूद करायला हवा.

आणि बेटच्या पैसे काय झाडाला लागतात? बहात्तर रुपये चार आणे ! हा आडमुठा आकडा काय तुम्हां दोघांचं दार्जिलिंग ते मुंबई बोटीचं तिकीट आहे ?

मालकांनी तुला माझ्या शब्दाखातर दोन दिवसांची रजा वाढवून दिली आहे. करा लेको, तुमचा मधुचंद्र साजरा करा !

पैसे तारमनीऑर्डरनें उद्या पाठवत आहे.

सौ. वहिनींना स. न. तुझाच
दिनकर

"अर्क आहे की नाही ? पहा ना, शेवटी सुद्धा 'तुझाच' लिहिलंय लेकानं !"

अनंत कौतुकानं हसला. मित्रप्रेमाचं त्याला एकदम भरतं आलं होतं.

"आता?"

"आता काय, आज दुपारी तीनची गाडी पकडायची !"

दोघं सामान आवरायला लागली. तासाभरात बॅगा बंद झाल्या. बेडिंग गुंडाळले गेले. तारेवरचे ओले कपडे तसेच होते. दार्जिलिंगला कपडे दोन दोन दिवस सुकत नाहीत. निघताना ते पिशवीत भरता येतील असं अनंता म्हणाला.

लिनीनं अनंतानं काढलेली चित्रं अद्याप बंद केलेली नव्हती. कॉटवर ती ओळीनं मांडून ठेवलेली. आठ एक असावीत. प्रत्येक चित्र म्हणजे कागदावर बंदीस्त केलेला एकेक अमूल्य क्षण ! शेवटचं चित्र लिनीचंच होतं. जांभळी किमोनो घातलेल्या लिनीचं!

सर्व सामान आवरून झालं तसं घड्याळाकडे पहात अनंता म्हणाला, "गाडीला अद्याप चार तास अठ्ठावीस मिनिटं आहेत. बोल काय काय तुला परत पहायचं आहे. वर्च हिल, माळ, गव्हर्नरचा बंगला, झू....."

लिनी हसली. दार्जिलिंगला आलेला दिवस तिला आठवला. मद्रासी हॉटेलातली सुपारी तिच्या हाती देत अनंतानं तिला हाच प्रश्न विचारला होता. त्यावेळी तिला काय पाहू, काय नको असं झालं होतं. आज तिला कुठं बाहेर पडावसं वाटेना. ह्या आठ दिवसात अनंतानं तिला इतकं सुखी केलं होतं, बारीक सारीक गोष्टीत तिचं मन एवढं संभाळलं होतं की, आता सारं आयुष्य आपण त्या आठवणींवर काढू असं तिला वाटत होतं.

शब्द ओठावर आले होते. पण अजुनी संकोच सरत नव्हता. अनंतानं बूट चढवत तिला परत विचारलं–

"मग कुठं जायचंय् ! तेनसिंग असते तर त्यांना भेटायला गेलो असतो. पण ते तर हिमालयात गेलेत. बोल, बोल लवकर, चार तास अठ्ठावीस मिनिटातली सात मिनिटं तर इथंच संपली!"

लिनीनं शेवटी हिय्या केला, ती म्हणाली, "आपण इथंच थांबूया, ह्या खोलीतच शांत बसून राहूया !"

अनंता कोट घालत होता, तो एकदम थांबला. लिनीकडं पहात मिस्कील हसत तो म्हणाला, "ठीक आहे, थांबूया ! पण एक अट आहे !"

लिनी हादरली. ही अट कसली ? दिवसा उजेडी काय मागणं आहे ह्यांचं !

"कसली अट ?"

"तू किमोनो घालून बसायचंस् !"

हीच अट ना ! लिनीचा जीव भांड्यात पडला.

"हो घालेन !"

अनंता हसला, लिनीही !

अनंतानं बॅग उसकटली, किमोनो बाहेर काढला. एखाद्या राणीचा झगा तिच्या दासी आणतात तसा मोठ्या काळजीपूर्वक किमोनो घेऊन लिनीसमोर अनंता आदरानं झुकून उभा राहिला. लिनी किमोनो घेणार इतक्यात दार वाजलं.

कोण–उपटला–हा–आयत्या–वेळी अशा चेहऱ्यानं अनंतानं दार उघडलं. मघा बिलाच्या दिलेल्या पैशांची पावती घेऊन नोकर आला होता.

"थँक्स् !" म्हणून अनंतानं दार बंद केलं.

लिनी किमोनो घालित होती तोवर अनंतानं ड्रॉइंगचे कागद काढले. रंगीत पेस्टलच्या कांड्या काढल्या, खिडकीजवळ उभा राहून तो काहीतरी काढत होता.

लिनी किमोनो घालून झाल्यावर त्याच्याकडे यायला निघाली तसं अनंतानं तिला थांबवलं.

"नो...नो....तिकडे कॉटवर बसायचं !"

"पण मला तुम्ही कसलं चित्र काढताय ते पहायचं आहे!"








# फिल्म इन्स्टिटयू ऑफ इंडिया, पुणे ४

## प्रवश मिळवू इच्छिणाऱ्यांकरिता सूचना

संस्थेच्या ता. १ जुलै १९७१ या शैक्षणिक वर्षापासून नियमितपणे सुरू होणाऱ्या पहिल्या वर्षाच्या खालील शिक्षणक्रमासाठी अधिकृत छापील फार्मावर उमेदवाराकडून अर्ज मागविण्यात येत आहेत.

१) **दिग्दर्शन** (Direction) – तीन वर्षे **कमीत कमी शैक्षणिक पात्रता** आर्टस् किंवा सायन्सची पदवी किंवा तत्सम पदवी प्राप्त. **वय** १९ ते ३० वर्षे १-७-१९७१ ला पूर्ण.

२) **चित्रपट कथा लेखन** (Screenplay Writing) – तीन वर्षे; **कमीतकमी शैक्षणिक पात्रता :** आर्टस् किंवा सायन्सची पदवी किंवा तत्सम पदवी प्राप्त. **वय :** १९ ते ३० वर्षे १-७-१९७१ ला पूर्ण.

३) **चलत्चित्र छायालेखन** (Motion Picture Photography) तीन वर्षे, **कमीत कमी शक्षणिक पात्रता**-पदार्थ विज्ञान शास्त्र व रसायन शास्त्र, किंवा तत्सम विषय घेऊन इंटरमिजिएट (ज्या उमेदवारांनी हायर सेकंडरी परीक्षा उत्तीर्ण केली आहे अशानाही तीन वर्षाच्या शास्त्राच्या पदवी परीक्षेचे पहिले वर्ष उत्तीर्ण होताच प्रवेश देण्यात येईल, मात्र त्यांनी पदार्थ विज्ञान शास्त्र व रसायन शास्त्र हे विषय त्या परीक्षेसाठी घेतलेले असावेत) किंवा फाईन आर्टस् (पेंटिंग) ची विश्वविद्यालयाची किंवा अधिकृत मान्यता असलेल्या संस्थेची पदवी किंवा डिप्लोमा– मॅट्रिक नंतर डिप्लोमाचा अभ्यासक्रम दोन वर्षाचा पूर्ण केलेला असावा. वय १७ ते ३० वर्षे १-७-१९७१ ला पूर्ण.

४) **ध्वनिमुद्रण आणि ध्वनी स्थापत्यशास्त्र** (Sound Recording And Sound Engineering)–तीन वर्षे; **कमीत कमी शैक्षणिक पात्रता :** पदार्थ विज्ञान शास्त्र, रसायन शास्त्र, व गणित किंवा तत्सम विषय घेऊन इंटरमिजिएट उत्तीर्ण ( ज्या उमेदवारांनी हायर सेकंडरी परीक्षा उत्तीर्ण केली आहे अशानाही तीन वर्षाच्या शास्त्राच्या पदवी परीक्षेचे पहिले वर्ष उत्तीर्ण होताच प्रवेश देण्यात येईल, मात्र त्यांना पदार्थ विज्ञान, विज्ञान शास्त्र, रसायन व गणित हे विषय या परीक्षेसाठी घतलेले असावेत.) **वय :** १७ ते ३० वर्षे १-७-१९७१ रोजी पूर्ण.

५) **चित्र संकलन** (Film Editing) – दोन वर्षे. **कमीत कमी शैक्षणिक पात्रता :** इंटरमिजिएट आर्टस् किंवा सायन्स किंवा तत्सम परीक्षा उत्तीर्ण ज्या उमेदवारांनी हायर सेकंडरी परीक्षा उत्तीर्ण केली आहे अशानाही तीन वर्षाच्या पदवी परीक्षचे पहिले वर्ष उत्तीर्ण होताच प्रवेश देण्यात येईल. **वय** १७ ते ३० वर्षे १-७-१९७१ ला पूर्ण.

६) **चित्रपट अभिनय** ( Film Acting ) – दोन वर्षे **कमीत कमी शैक्षणिक पात्रता** मॅट्रिक्युलेशन किंवा तत्सम परीक्षा इंग्रजी हा एक विषय घेऊन उत्तीर्ण. हिंदीचे कामचलाऊ ज्ञान आवश्यक. विशेष लायकीच्या स्त्री उमेदवारास ही अट शिथील केली जाईल. **वय** १६ ते २५ वर्षे मुलींकरिता आणि १८ ते २५ वर्षे मुलांकरिता १-७-१९७१ ला पूर्ण.

एखादा / एखादी उमेदवार विश्वविद्यालयीन बोर्डाच्या परीक्षेस एप्रिल / मे / जून १९७१ ला परीक्षेस बसला / बसली असेल त्याचा / तिचा निकाल संस्थेच्या त्या वेळच्या प्रवेश परीक्षेपर्यंत मिळू शकला नाही तर त्याने / तिने संस्थेच्या त्यावेळी होणाऱ्या प्रवेश परीक्षेपर्यंत तो / ती ज्या संस्थेत शिक्षण घेत असेल त्या संस्थेच्या प्राचार्यांचे / प्रमुखाध्यापकांचे त्याचा निकाल लागेतोपर्यंतच्या मुदतीचे प्रशस्तीपत्र सोबत असले पाहिजे. प्रवेश परीक्षेत निवडलेल्या उमेदवारास तात्पुरता प्रवेश दिला जाईल. पण त्याला नियमानुसार आपण आवश्यक ती परीक्षा उत्तीर्ण झालो आहोत असे ३१ जुल १९७१ पर्यंत लेखी पुरावे सादर केले पाहिजत. हे न झाल्यास त्याचा / तिचा तात्पुरता प्रवेश रद्द केला जाईल. आणि त्याने / तिने भरलेली फी परत केली जाणार नाही.

विविध शिक्षणक्रमाच्या अभ्यासासाठी प्रवेश परीक्षेच्या आधारावरच प्रवेश दिला जातो. दिग्दर्शन, चित्रपट कथालेखन, चलच्चित्र छायालेखन, ध्वनीमुद्रण, ध्वनी स्थापत्यशास्त्र व चित्रसंकलन या परीक्षांकरिता लेखी व तोंडी परीक्षा द्यावी लागेल. लेखी परीक्षा अलाहाबाद, मुंबई, कलकत्ता, दिल्ली रांची व मद्रास येथे ९ मे १९७१ (रविवार) या दिवशी घेतली जाईल. या लेखी परीक्षेत लायक गुण मिळविणाऱ्या सर्व उमेदवारांस तोंडी परीक्षेसही बसावे लागेल व ती परीक्षा संस्थेत २१ जन १९७१ या दिवसापासून पुणे येथे होईल. चित्रपट अभिनयाकरिता ठेवलेल्या प्रवेश परीक्षेत आवाजाची चाचणी व पडद्यावरच्या हालचाली याबाबत विशेष लक्ष पुरविले जाईल. या चाचणी परीक्षा मुंबई, दिल्ली, कलकत्ता व मद्रास येथे मे १९७१ च्या सुरुवातीस होतील. निश्चित तारखा उमेदवारांना योग्य वेळी कळविल्या जातील.

विविध विषयांच्या बाबतीत विशेष आवड आणि उत्साह दाखविणाऱ्या आणि समाधानकारक प्रगती करणाऱ्या उमेदवारांना खास सवलती दिल्या जातील. केंद्र सरकार, आंध्र प्रदेश, हरीयाणा, ओरिसा, पंजाब, पश्चिम बंगाल व तामीळनाडू राज्ये आणि संगीत नाटक संगम पाँडिचरी व गोवा, दमण व दिव ही केंद्रशासित राज्ये यातर्फे लायक विद्यार्थ्यांसाठी पारितोषिके व शिष्यवृत्त्या ठेवलेल्या आहेत.

अभिनयाच्या अभ्यासक्रमासाठी आणखीही शिष्यवृत्त्या आहेत, त्या म्हणजे विद्यार्थिनीसाठी दरमहा रु. २५० ची हिंदुस्तान लीव्हर शिष्यवृत्ती आणि लायक विद्यार्थ्यांसाठी–विद्यार्थिनीला प्रथम पसंती–दरमहा रु. १५० ची गुरुदत्त स्मारक शिष्यवृत्ती.

मुलांमुलींकरीता संस्थेमार्फत वेगवेगळी हॉस्टले चालविली जातात.

**अर्ज कसा कराल**––संस्थेच्या माहिती पत्रकासोबतच अर्जाचा नमुना शिक्षणक्रमाची अधिक माहिती, प्रवेश परीक्षा, शिष्यवृत्त्या इ. इ. सर्व ती माहिती पुरविली जाते. हे सारे साहित्य **प्राचार्य, फिल्म इंन्स्टिस्टयूट ऑफ इडिया, पुणे ४** या पत्त्यावर १ रुपयाची क्रॉस पोस्टल ऑर्डर पाठवून मागविता येईल. क्रॉस पोस्टल ऑर्डर 'प्राचार्य, फिल्म इन्स्टिटयूट ऑफ इंडिया, पुणे' यांच्या नावानच असावी. आपल्या विनंती पत्रासोबतच २५ × १८ सें. मी. लांबी रुंदीचा स्वतःचा पत्ता लिहिलेला व ५० पैशांचे तिकीट लावलेला लखोटाही असावा. पोस्टल ऑर्डर व स्वतःचा पत्ता लिहिलेले तिकीट लावलेले पाकीट असल्याशिवाय कोणत्याच प्रकारचा पत्रव्यवहार केला जाणार नाही. १ रुपया मनीऑर्डर किंवा चेकन पाठविल्यास तो स्वीकारला जाणार नाही.

**उमेदवाराने आपला संपूर्ण प्रवेश अर्ज माहिती-पत्रकात दिलेल्या प्रमाणे ५ रुपयांच्या पोस्टल ऑर्डरसमवेत १ एप्रिल १९७१ पर्यंत संस्थेच्या कचेरीत पाठवावेत.**

अपूर्ण माहितीचे अर्ज, तसेच आवश्यक त्या पोस्टल ऑर्डर्स / छायाचित्रे सोबत नसलेले अर्ज स्वीकारण्यात यणार नाहीत.

**टीप** दी फिलम इन्स्टिटयूट ऑफ इंडिया हिचे आता नवे नामकरण झाले आहे ते म्हणजे **'दी फिल्म अँड टेलीव्हिजन इन्टिटयूट ऑफ इंडिया.'**

दूरचित्रवाणीच्या ( टलीव्हिजन ) नव्या विद्यार्थ्यांसाठी अशा प्रकारचे अभ्यासक्रम सध्या उपलब्ध नाहीत. ते शिकविण्याची व्यवस्था पूर्ण झाल्यावर दूरचित्रवाणी अभ्यासक्रम जाहीर करण्यात येतील. तेव्हां दूरचित्रवाणीच्या अभ्यासक्रमांबाबतच्या चौकशीला उत्तर पाठविण्यात यणार नाही. davp 70/581









अनुक्रमणिका

"जरूर, पण ते चित्र पूर्ण झाल्यावर. तोवर नाही !"

लिनी कॉटवर बसली. अनंता कसलं चित्र काढतो आहे, तिला मोठी उत्सुकता होती.

मास्टरपीस म्हणजे काय ? बहुतेक सर्वोत्कृष्ट चित्र असा अर्थ असावा; पण किती वेळ वाट पहायला लावायची! खिडकीतून मागील खेपी गुलमोहरचं झाड आणि त्याखाली पीच विकत बसलेली सिक्कीमी वृद्धा काढली होती अनंतानं ! ह्या खेपी हिमालयाच्या दूरच्या रांगा, उंच सुरूची झाडं, उतरणीवरची घरं, समोरचा रस्ता.....! काय काढतो आहे अनंता ?

लिनीला रहावेना, ती उठणार इतक्यात अनंता म्हणाला,

"नो, नो ! माणसानं इतकं उतावीळ असूं नये. झालंच चित्र ! मास्टरपीस बाय अनंत केशव गद्रे !"

चित्राच्या खाली त्यानं सही ठोकली आणि कागद फिरवून लिनीला दाखवला. हिरव्या पिवळ्या, लाल निळ्या रंगात अक्षरे होती.

a e

दोऱ्यानं दरवाजाला बाहेरच्या बाजूनं हे मास्टरपीस पेंटिंग लटकवून अनंतानं हळूच दार बंद करून टाकलं.

## [१०]

विजेरीच्या प्रकाशात पावसाचे थेंब चमकत होते. सरकणारी पायाखालची प्रकाशवर्तुळं सोडली तर बाकी सगळीकडे मिट्ट काळोख होता. आता पहाट व्हायला आली तरी त्याचा गडदपणा कायम होता. मी झपझप चालतो होतो, एकटाच होतो ना !

ह्या ढगाळलेल्या हवेतून रिपरिप पडत असलेल्या पावसातून कांचनगंगेची धवल शिखरे दिसण्याची शक्यता फारच कमी होती. पण तरीही आपला चालतो होतो. मोह सुटत नव्हता. पंधरा वर्षांपूर्वी पाहिलेला तो सूर्योदय एखाद्या सुंदर लेण्यासारखा माझ्या मनावर कायमचा कोरला गेलेला होता.

टायगर हिलला मी वेळेवर पोहोचलो. अशा पावसात कोण येणार इथं, हा माझा अंदाज चुकीचा ठरलेला दिसत होता. पूर्वीसारखी गर्दी नव्हती, पण अशी विचित्र हवा असतानाही सात आठ जोडपी, तीन चार परदेशी प्रवासी, आणखीन् काही माणसं टायगर हिलवर आली होती. कुणाच्या हातात छत्र्या होत्या, कुणाच्या अंगावर रेनकोट ! जी जोडपी होती त्यांना इतर कोणी आलेत ह्याची दखल घेण्याचं कारण नव्हतं. जे इतर लोक उभे होते त्यांच्यात चर्चा चालली होती, 'आज कांचनगंगा शिखरं दिसतील का ?'

ह्या मंडळींना टाकून मी बाजूस झालो, एकटाच फिरत पुढे निघालो आणि एकदम ती मला दिसली.

पहाताक्षणीच खात्री पटली की तीच ती ! मध्यंतरीची पंधरा वर्षे झपकन् पाखरांच्या थव्यासारखी उडून गेली. ह्या सर्वग्राही काळाचा तिच्यावर काहीच परिणाम झालेला दिसत नव्हता ! कांचनगंगाच जशी काही !

तोच गौर तांबूस वर्ण, सतेज कांती, मोठाले डोळे, विपुल केशसंभार ! कुठं चार दोन पौंड वजन वाढलं असेल तेवढाच फरक! एरवी मी पंधरा वर्षांपूर्वी त्या तरुणाला मिठी मारून असलेली जी तरुणी पाहिली, तिच्यात काहीही बदल झालेला नव्हता.

"हॅलो !"

तिचा चेहरा निर्विकार होता.

"ओळखलंत ?"

मी तिच्याशी बोलतो आहे हे आता तिच्या लक्षात आलं. एरवी स्वतःच हरवली होती ती ! टप्पोरे डोळे भूतकाळातल्या आठवणी शोधू लागले ! छे. नाही आठवत.

मी म्हणालो, "फार वर्षं झाली. आपण इथंच भेटलो होतो. मी येथून दिसणाऱ्या सूर्योदयाचं चित्र काढलं होतं....!"

"ओ येस्. आठवलं. नंतर त्याच रात्री आपण दार्जिलिंगला भेटलो होतो. तुमच्या मिसेसनी किमोनो घातला होता !" ओळख पटताच ती आनंदली. "कुठं आहेत त्या ?"

"नाही, मी एकटाच आलोय !"

"एकटेच–?" केवढ्यांदा दचकली ती !

"माझ्या मिसेसना एवढं चालणं झपायचं नाही, म्हणून मी एकटाच आलो. इथं दार्जिलिंगला हॉटेलमध्ये आहे ना ती !"

"आय् सी !" केवढं तरी ओझं उतरल्यासारखं तिनं दीर्घ निश्वास टाकला. संभाषण चालू ठेवण्यासाठी मी उगीचच विचारलं,

"सूर्योदय दिसेल का आज ? पाऊस तर थांबायला तयार नाही !"

"पाहू, कदाचित दिसेलही. ~~मी~~ पंधरा वर्षांनंतर येते आहे दार्जिलिंगला !"

"तुमच्याबरोबरचे ते गृहस्थ कुठं आले ?"

"नाही, मी एकटीच आले आहे !"

काही क्षण तसेच गप्पगप्प गेले. मग एकदम ती म्हणाली,

"तुमच्या मिसेसना तुम्ही आणायचं इथं !"

"खरंच तिला झेपत नसतं. अलिकडे फार थकते ती !"

"हळुहळू यायचं. पूर्वी जर त्या थकत असत्या तर तुम्ही आला असता का एकटे ?"

मी नुसताच हसलो. ह्या प्रश्नाच्या उत्तराची गरजच नव्हती !

अद्यापही समोर धुकं तसंच होतं. कोणत्याही क्षणी सूर्य उगवेल सूर्याची ती सुवर्ण किरणं त्या हिम शिखरापर्यंत पोहोचणार आहेत की नाहीत ? आम्ही खाली दूरवर हवेत तरंगणाऱ्या मेघ खंडांकडे पहात उभे होतो.

मी विचारलं. "तुम्ही एकट्याच कशा आलात ?"








"कारण मी सध्या एकटीच आहे!"

"म्हणजे ते . . तुम्ही लग्न . . . एकट्या . . . एकट्याच आल्यात तुम्ही?"

"हो एकटीच!"

मेघांनी गुरफटलेल्या हिमशिखरासारखी ती मला गूढ रम्य वाटू लागली. वाटलं, अधिक प्रश्न विचारून हा तिचा गूढतेचा घुंगट काढू नये!

पण तीच म्हणाली, "ब्रिगेडिअर जसवंतसिंगांची मी मुलगी!"

"ब्रिगेडियर जसवंतसिंग . . . म्हणजे ते—!"

"होय तेच!"

ब्रिगेडियर जसवंतसिंग ह्या नावाबरोबर कुणाही भारतीयाचं मस्तक आदरानं खाली झुकेल. इचीगोळ कालव्यावर मोर्चे बांधत असताना धारातीर्थी पडलेल्या ह्या सेनानीच्या शौर्याची वर्णनं त्यावेळी प्रत्येक वर्तमानपत्रांत आली होती.

"त्यांची मुलगी मी! पपांच्या मृत्यूपासून मी आणि आई दोघीच असतो या घरांत . . . एकमेकींच्याकडे पहात, कुणी कुणाचं सांत्वन करायचं ह्या विचारात!"

"पण त्या दिवशी तुमच्याबरोबर होते ते

"ते रॉबी अरोरा. तुम्ही मला त्यांच्याबरोबर पाहिलंत, तोच शेवटचा दिवस. त्यानंतर ते हिमालयात गेले ते परत आलेच नाहीत."

कुणीतरी हातोड्यानं घण घालावा तसा मी बधीर झालो.

"त्या धुक्याआड दडलेल्या हिमराशी एका रात्री अचानक कोसळल्या. त्यांना, त्यांच्या मित्राला जिवंत समाधी मिळाली!"

किती निर्विकारपणे हे सारं ती सांगत होती.

त्या पहाटे एकमेकांच्या आलिंगनात बिनदिक्कत बिसावलेल्या जोडप्यातली ही एकाकी तरुणी! मघाशी वाटलं, ही होती तशीच अद्याप आहे; पण तो केवळ वरवरचा देखावा. अंतर्यामी केवढे मोठे झंझावात हिचे जीवन उध्वस्त करून गेलेत.

तरीही अशी अलिप्तपणे कशी बोलू शकते ही!

[illegible]नाअगोद[illegible] विधवा झाले मी! आईच्या अगोदर माझा संसार संपला, सुरू होण्यापूर्वीच संपला! मग पपा गेले. आम्ही दोघीच उरलो [illegible] एकमेकींची समजूत काढायला! पंधरा वर्षं. केवढी कंटाळवाणी . . . संपता न संपणारी! कुणाला बोलले नाही, तुम्हाला सांगते . . . अलिकडे असं काहीतरी झालं, वाटलं की मी डळमळू लागलेय. स्वतःभोवती तयार केलेला हा वैराग्याचा कोष कुठंतरी उसवू लागला आहे. स्वतःला अंधारात गुरफटून घेतल्यावर येणारी ही प्रकाशाची तिरीप डोळ्यांना सहन होईना. म्हणून आले दार्जिलिंगला. माझ्याच शोकाचा रंग येथल्या वास्तूवर, निसर्गावर चढवून माझं दुःख उगाळायचा मी प्रयत्न करीत होते. ज्या ज्या जागी मी रॉबीबरोबर गेले होते, तेथे तेथे परत जाऊन आले. भरपूर उदासीनता मी गेले तेथे माझ्याभोवती विखरून टाकली. आणि आता पूर्वीचा रंग उरला नाही म्हणून स्वतःलाच सांगू लागले. पण आज पहाटे एक गम्मत घडली. वर येताना, एका ठिकाणी वाट वळते ना, तिथं एक जोडपं चक्क एकमेकांच्या मिठीत हे पाहिलं आणि मनात आलं ह्या तारुण्यात कुठं बदल झालाय? आपण कोमेजलो असू. तारुण्य आणि निसर्ग सारखाच उमलतो आहे . . ."

तिला आणखीनही काही सांगायचं असावं; पण मागं लोकांत एकदम हालचाल सुरू झाली. सगळे लोक एकदम पुढे येऊ लागले. धुकं विरळ झालं होतं. काही ठिकाणी हा धुक्याचा पडदा उघडला गेला होता. त्यामागच्या धवल हिम शिखरावर तप्त सुवर्णाचे तांबूस भगवे किरण पडले होते. कांचनगंगेची शिखरे सुवर्णाची झाली होती.

"मागच्यासारखं तुम्ही रंग सामान आणलंय?" तिनं विचा-विचारलं.

"हो, आणलंय!"

"मग काढा ना चित्र! मी धरते तुमच्यावर छत्री!"

मी हाललो नाही. कांचनगंगेच्या शिखराकडे पहात राहिलो.

ती परत म्हणाली, "काढता ना! फार वेळ नाहीत दिसायची ती शिखरे! सुरुवात करा!"

तिचा आग्रह असताही पेस्टल्स् पेटीतच राहिल्या. ड्रॉईंगपेपर्स बॅगेत! सुवर्णराशीचे रंग क्षणाक्षणाला पालटत होते. रुपेरी कडा चमकत होत्या. समोरचे दृष्य सारंच विसरायला लावणारे होते.

तरीही मनात कुठं तरी एक विचार येत होता. रॉबीबरोबर लग्न होऊन पंधरा वर्षांनी आज इथं ती दोघं आली असती तर ह्या अलौकिक निसर्गचित्रानं वेडं होणं साधलं असतं का दोघांना!

एकाएकी खालच्या दरीतून ढग वर उसळू लागले. त्या सुवर्ण-मांडाराला हळूहळू ग्रासू लागले. आणखीन थोड्याच सेकंदांत धुक्या-वाचून काहीच दिसेनासे झाले.

०

टॅक्सी वेगाने खाली उतरत होती. वेडीवाकडी वळणं तो चपटच। नाकाचा ड्रायव्हर मोठ्या सफाईने घेत होता. पाऊस थांबला होता. पण हवा कुंद होती. धुकं अजिबात नव्हतं. त्यामुळे खाली दूरवर छोटी छोटी घरं खेळ मांडल्यासारखी वाटत होती.

टॅक्सीनं वळण घेतलं आणि एकाएकी गाडी थांबली. फाटक बंद होतं. ड्रायव्हर स्वतःशीच बोलल्यासारखं म्हणाला,

"पहलेसे देर हुई है, और यह गेट अभी बंद है। क्या मुसीबत है?"

इतक्यात खालून गाडी आली. छोटीशी, खेळातली [illegible]टणारी, म्युझियममधून निघाली आणि थेट इथं आली—इतकी जुनी! ड्रायव्हर छोट्याशा इंजीनातून बाहेर डोकावून पहात होता. त्यानं शिटी दिली. भकभक करत. दमछाक होत आलेलं इंजीन पुढं निघून गेलं. मागून डब्यांच्या इवल्याशा खिडक्यांतून तरुण, उत्साही अनोळखी चेहरे फाटकाजवळ थांबलेल्या गाड्यांना हात करत, शिळा घालत, टाळ्या पिटत पुढे निघून गेले.

(पान ८९ वर पहा)



कै. दलाल यांच्यासमवेत मालपेकर बंधू

## साहेब तुमची आठवण येते

त्या अमंगल सकाळी फोन खणखणला आणि दलाल कालवश झाल्याची बातमी समजली. बराच वेळ कानावर विश्वास बसेना. हे कसे शक्य आहे ? कालच आम्ही भेटलो होतो. नवे मनसुबे ठरले होते आणि आज ? समोरच 'दीपावली' फेब्रुवारी अंकाचे कव्हर पडले होते. मनात आले, ते घेऊनच साहेबांकडे जाऊया, निदान कव्हर पाहण्यासाठी तरी साहेब उठतील, काळझोपेतून सुद्धा ! पण छे ! साहेब गेले हेच सत्य होते. साहेबांचे चित्र आणि आमची छपाई ही बऱ्याच वर्षांची वहिवाट. दीपावलीच्या दिवाळी अंकाचे कव्हर म्हणजे आमची वार्षिक परीक्षाच. साहेब रंगसंगतीचे हुकमतपन्हा ! कसोटी फार कडक, रंगाचा बेरंग व्हायला मुळीच वेळ लागत नसे, इतके साहेब मुडी. एका वर्षी छपाई पसंत येईना ! खूप प्रयोग केले, पण नाही ! शेवटी साहेब चिडले. खूप त्रागा केला. आमच्यावर देखील खूप रागावले—कधी नव्हे ते ! आम्ही म्हणालो "साहेब घरच्या माणसांवर देखील असेच रागावता का ? प्रश्न काळजाला भिडला असावा. साहेबांचा सूर लगेच खाली आला. त्यानंतर असा प्रसंग कधीच आला नाही. साहेबांनी पसंतीची पावती दिली की धन्यता वाटे. रंगीत छपाईत चुका काढावयास किंवा प्रशंसा करण्यास साहेबच हवेत.

धंद्यातील बऱ्या वाईट गोष्टींचा उबग आला की संध्याकाळी साहेबांच्या स्टुडिओत जाऊन मनसोक्त गप्पा माराव्यात. स्वार्थाचा स्पर्श न झालेल्या त्या हिरवळीवर साहेबांकडून नवा उत्साह, प्रेरणा मिळे. नवी दृष्टी मिळे. आज आम्ही या साऱ्या गोष्टींना पारखे झालो आहोत.

साहेबांच्या अशा एकाएकी मृत्यूनं आम्ही एका गुरुतुल्य मित्राला मुकलो आहोत. निरोप देखील घेता आला नाही. एरव्ही संथ जीवन जगणाऱ्या साहेबांनी एवढी घाई करावी ? साहेब गेल्या पासून आम्ही एका शून्य पोकळीमध्ये अत्यंत सुन्नपणे वावरत आहोत. अजून होश येत नाही. साहेबांबद्दलचा शोक व्यक्त करण्यास आमच्याकड आणखी शब्दच नाहीत––

शाम मालपेकर

सुरेश मालपेकर

● ● ●

# दलाल—

## एक 'माणूस-वेडा' माणूस

**राजाराम हुमणे**

आदल्या शनिवारीच दलालांनी 'दीपावली'चा रजत महोत्सव थाटाने साजरा केला होता. आणि त्यानंतरचा दुसरा शनिवार उजाडण्यापूर्वीच दीपावलीचे 'दीनानाथ' मावळले. त्या रजत रजनीचा थाटमाट एखाद्या लग्नसमारंभासारखा होता. दारात पाहुण्यांचं स्वागत, आत गेल्यावर शीतपेये, नंतर पंचपक्वान्नाचं सुग्रास भोजन. आमंत्रितांना वाटलेले फुलांचे गजरे आणि त्यानंतर जितेंद्रांची धुंद मैफल. मी दलालांना म्हटलं, "मुलीचे लग्नसुद्धा तुम्ही एव्हढ्या थाटात केलं नाहीत !" त्यावर दलाल म्हणाले, "दीपावली ही माझी सर्वांत लाडकी लेक !" या लेकीचं लग्न झालं ! आणि 'कन्या सासुरासी' जायच्या ऐवजी पिताच नासरी निघून गेला. आणि दु:खाची गोष्ट म्हणजे हा निरोप घेताना त्याने मागे परतोनिहि पाहिले नाही. आमच्या डोळ्यांतील अश्रू त्याने पाहिले नाहीत की हुंदके ऐकले नाहीत. कादाचित असंही असेल की त्याला ते अश्रू पाहवले नसते—हुंदके ऐकवले नसते. म्हणूनच तो तसा गेला—एकाएकी, सर्वांकडे पाठ फिरवून.

मुंबईत झालेल्या प्रत्येक राज्य संगीत महोत्सवाच्या प्रत्येक रात्री गोपालकृष्ण भोब्यांच्या बरोबर एक गृहस्थ येत असत. मी भोब्यांना विचारलं, "तुमच्या बरोबर हे कोण गृहस्थ येताहेत ?" भोबे म्हणाले, "ते आहेत दलाल, 'दीपावली'चे संपादक !" त्यानंतर संगीत–नृत्य वा नाटय महोत्सवात त्यांच्या माझ्या अनेकवार गाठीभेटी होऊ लागल्या. गोवा हिंदु असोसिएशनच्या कलाविभागाचे अध्यक्ष या नात्यानेही त्यांचे माझे संबंध आले. दलाल 'दीपावली'सारख्या एका प्रतिष्ठित मासिकाचे संपादक होते आणि मी एक लेखक होतो, तरीसुद्धा त्यांचा माझा प्रथम परिचय झाला तो एक रसिक म्हणून.

'दीपावली'सारख्या प्रतिष्ठित मासिकांत आपलं लिखाण यावं अशी कोणत्या लेखकाची महत्त्वाकांक्षा असणार नाही ? माझीही ती होती. परंतु नाटकाच्या प्रयोगाच्या वेळी वा संगीताच्या मैफलीत दलालांशी मी याबाबत कधी बोललो नाही [illegible] त्याबाबत त्यांनीही कधी विचारणा केली नाही. आणि एके [illegible] दीपावलीच्या दिवाळी अंकासाठी लिहिण्याचं दलालांचं आ[illegible]ऊन धडकलं. निळ्या शाईत लिहिलेलं आणि हि[illegible] दलालांची सही असलेलं. एका चोखंदळ संपादकाने आपल्याकडे लिखाणाची मागणी केलेली पाहून आपल्या लेखनाला अखेर प्रतिष्ठा लाभली म्हणून मला मनस्वी आनंद झाला. त्यानंतर गेली ४-५ वर्षे प्रत्येक दिवाळीला दलालांची हिरवी स्वाक्षरी असलेली अनेक पत्रं माझ्याकडे येऊ लागली. यानंतरही अशी पत्रं कदाचित येत रहातील. खंत एवढीच वाटते की आतां त्यावर दलालांची ती प्रसिद्ध हिरव्या शाईतील शैलीदार सही मात्र असणार नाही !

दलाल महान चित्रकार होते. साक्षेपी संपादक होते. दिलदार रसिक होते. परंतु ७–८ वर्षांच्या सहवासानं मला जाणवलं ते हे की 'दलाल माणूस–वेडा माणूस' होता.

● ● ●







# संतप्तांबद्दलही सहानुभूती

**श्रीकांत सिनकर**

"हॅलो, दलाल स्पीकिंग!"

"नमस्ते दलालसाहेब, मी श्रीकांत सिनकर बोलतोय!"

"बोला बोला....बंडखोर लेखक! तुम्ही कबूल करूनही आपल्या कार्यक्रमात बोलला का नाहीत?"

"दलालसाहेब, मोठा गोंधळच झाला तेव्हां! अहो, मी पान खायला बाहेर गेलो होतो. आणि जेव्हां परत आलो तेव्हां ग. रा. कामत बोलत होते."

"तुम्ही 'संतप्त' असेच असता! बरं, काय म्हणता?"

"तुम्ही उद्या पुण्याला येणार ना? "कुळकर्णी ग्रंथागारा"च्या कार्यक्रमासाठी?"

"हो, हो, येणार ना! मी उद्या डेक्कन क्वीनने निघणार आहे. तुम्ही येणार का?"

"मी सकाळच्या डेक्कन एक्सप्रेसने निघतोय! पण सकाळी जर मी गेलो नाही तर संध्याकाळी तुम्हाला डेक्कन क्वीनला भेटतो!"

"या! या!! जरा गंमत करू गाडीत!"

"दलालसाहेब, उद्या पंडितराव त्यांच्या पुस्तकांचे प्रदर्शन भरविणार आहेत. म्हणजे उद्या तुमचीच शेंदीडशे पुस्तकं एकत्र पहायला मिळतील. तुम्ही काढलेली चित्र तुमच्यावरोबर प्रदर्शनात पहायला खूप मजा येईल!"

"असं म्हणता? मग याच तुम्ही!"

"येतोच!"

"मी फोन बंद केला. १६ आणि १७ जानेवारीला पुण्याच्या "कुळकर्णी ग्रंथागार"ने आपला रौप्यमहोत्सव आयोजित केला होता. ९ तारखेच्या शनिवारी "दीपावली"चा रौप्य महोत्सव मुंबईत साजरा झाला होता. आणि १६ तारखेच्या शनिवारी पुण्यांत एक रौप्य महोत्सव साजरा होणार होता....

दुसऱ्या दिवसाचे बेत मनात आखूनच मी रात्री बिछान्यावर अंग टाकले.

रात्री-बेरात्री वाजणारी फोनची वेल हृदयाचा थरकाप उडविणारी असते, [illegible] अनुभव मला नवा नव्हता. रात्री २॥ वाजता फोन [illegible] लागली. मी फोन उचलला....

"हॅलो. [illegible]"

"[illegible] मराठा"तून नारायण पेडणेकर बोलतोय! श्रीकांत सिन[illegible]"

"मीच बोलतोय! काय रे नारायण?"

"अरे, तुला कळलं? दलाल गेले!"

सकाळपर्यंत सिगारेटच्या धुरांच्या वलयात दलालांच्या आणि माझ्या परिचयाचा चित्रपट 'फ्लॅशबॅक' पद्धतीने मूकपणे पहात होतो. आणखीन पाच तासांनी मी डेक्कन एक्सप्रेस पकडणार होतो; परंतु माझी डेक्कन एक्सप्रेस जागच्या जागीच थांवली आणि दलालसाहेबांची रूळ ठरलेली डेक्कन क्वीन चुकून भलत्याच दिशेला वळली....

माझा आणि दलालांचा परिचय जेमतेम ५।६ वर्षांचा होता. त्यावेळी मला केस दाढी वाढवून आणि रंगी बेरंगी कपडे घालून स्वतःचं प्रदर्शन करण्याची संवय लागली होती. आमच्या पहिल्या भेटीत अशाच अवतारात मी दलालांसमोर उभा राहिलो होतो. तेही माझ्या एका स्नेह्याची एक एकांकिका घेऊन! पुढे ती एकांकिका त्यांनी मला साभार परत केली; परंतु दलालांच्या स्वभावाला भुलून मी वारंवार त्यांच्याकडे जाऊ लागलो.

"दीपावली"त मी अगदी अलिकडे लिहू लागलो. परंतु त्यापूर्वी ४।५ वर्षे माझी आणि दलालांची केवळ मैत्री होती. साधारणतः संपादक-लेखक एकत्र आले, म्हणजे हमखास "साहित्य चर्चा" सुरू होते. परंतु अशी चर्चा आम्ही कधीच केली नाही. आमच्या बोलण्याचे विषय केवळ अजब असायचे.....नव्याने कुठेही सुरू असलेलं बांधकाम, उपवासाचे पदार्थ, क्रिकेट मॅच, "बॉम्ब डक्" (तळलेला बोंबील) मोटार गॅरेज, जुनं दादर, अशा अनेक विषयांवर आमच्या गप्पा रंगत होत्या. दादरला मी त्यांच्या घराजवळच रहात असल्याने दादरमधील नवं बांधकाम हमखासपणे त्यांच्या नजरेत यायचं. मग मी आणि दलाल त्या नव्या बांधकामाची पहाणी करायला जात होतो. दलालांना शिवाजी पार्क, गोखले रोड या भागात एक अखंड मजला हवा होता. त्यामुळे मीही जागरूक होतो. एखाद्या नव्या बिल्डिंगची पहाणी आम्ही अशी काही करीत होतो की, त्रयस्थांना वाटावं, हेच दोघं बिल्डिंगचे मालक आहेत.

दलालांनी माझ्यावर एवढा लोभ का करावा हे मला पडलेलं कोडं आहे. साधं घडयाळ जरी घ्यायचं असलं तरी ते मला बरोबर नेत होते. माझ्या दिवाळी अंकांत त्यांनी एका मोटर गॅरेजची जाहिरात पाहिली होती. ती लक्षात ठेवून एक दिवस सकाळीच ते माझ्या घरी आपली "फिआट" घेऊन हजर झाले. "चला, कोण आहे तुमचा गॅरेजवाला? आज गाडीचं थोडं काम करायचं आहे."

फूटपाथवर जुनी दुर्मिळ पुस्तकं चांगली मिळतात, म्हणून मी अनेकदा फूटपाथवरच्या पुस्तकाच्या दुकानात बराच वेळ उलथापालथ करीत असतो. परंतु दलालांनाही हा शौक आहे, हे मला माहीत नव्हतं. एकदा लॅमिंग्टन रोडवर दीडशे रुपयांची जुनी पुस्तकं खरेदी करून ते मला म्हणाले, "तुम्हाला काय माहित आहे, मला दीड लाखाचं मटेरियल यांत सापडलं आहे."

गेल्या दिवाळीला त्यांचं अचानक पत्र आलं, "दिवाळी अंकातील कवितांसंबंधी बोलायचं आहे. लवकर येऊन भेटा!" नव्या मंडळींच्या कविता मिळवून "दीपावली"ला देण्याची जबाबदारी माझ्यावर सोपविण्यात आली. दिवाळी अंकातील माझ्या कवितेवर दलाल बेहद्द खूष होते. चार ओळींच्या कवितेला आणि अर्धा पान पुस्तक परिक्षणाला भरपूर मोबदला देणारे एकटेच दलालच!

क्रिकेट हा खेळ मला आवडतो. पण क्रिकेट कॉमेन्ट्रीबद्दल मला तीव्र तिरस्कार वाटत आला आहे. क्रिकेटच्या सीझनमध्ये मी शक्यतो दलालांना भेटत नव्हतो. क्रिकेट सीझनमध्ये त्यांच्या टेबलावर हमखास छोटासा "ट्रान्झीस्टर" असायचा. मग आमच्या गप्पांपेक्षा त्यांचं लक्ष क्रिकेट कॉमेन्ट्रीवरच जास्त असायचं. रेडिओत ओरडा ओरड झाली म्हणजे...."थांबा थांबा, काही तरी झालं... हां....वाचला हं वाडेकर!" किंवा पुन्हा असा गोंधळ झाला म्हणजे ते मोठ्याने पेठेंना हांक मारायचे. पेठे घाईघाईने बाहेर आले म्हणजे म्हणायचे...."बघा, काय म्हणालो होतो मी?





अनुक्रमणिका

# उरल्या फक्त आठवणी

वि. वा. पत्की

तसं पाहिलं तर श्री. दीनानाथ दलाल यांचा आणि माझा तसा कांही दाट परिचय नव्हता आणि त्यांच्या अंतरंगातल्या मित्र-परिवारांपैकी तर मी खचितच नव्हतो. पण असं असूनही मला नेहमी वाटायचं की या माणसाचा आणि आपला स्नेह असावा आणि कधी तरी या स्नेहाचं दाट मैत्रीत रूपांतर व्हावं. त्यांच्याकडे कसलाही समारंभ असला, की त्यांचं मोठ्या अगत्याचं निमंत्रण यायचं आणि त्या समारंभाच्या घाई-गर्दीत दलाल क्षणभरही भेटले, त्यांचं ते दिलखुलास हसणं दृष्टीला दिसलं किंवा कानांना ऐकू आलं की वाटायचं निर्लोभ मित्र असावा तर असा !

दलालांचा आणि माझा दाट परिचय नव्हता असं मी म्हटलं ते लौकिक अर्थानं, पण प्रत्यक्ष न भेटताही दलालांचा आणि माझा परिचय झाला होता तो १९३८ साली, बत्तीस वर्षांपूर्वी ! त्यावेळी शिरोड्याहून येऊन कोल्हापुरांत नुकत्याच स्थायिक झालेल्या श्री. वि. स. खांडेकरांच्या घरी साहित्यप्रेमी विद्यार्थ्यांची जी वर्दळ असायची, त्या वर्दळीत मीही असायचा. अनेक नामवंत साहित्यिक, चित्रपट निर्माते, नट यांचं अनपेक्षित दर्शन तिथं घडायचं, पण एके दिवशी दीनानाथ दलालांचंही दर्शन घडलं ! प्रत्यक्ष नव्हे, तर चित्ररूपानं ! खांडेकरांच्या 'हिरवा चांफा' या कादंबरीच्या जॅकेट-वर घालायचं चित्र तयार होऊन आलं होतं आणि खांडेकरच आम्हांला म्हणत होते, 'किती सुरेख चित्र आहे, पाहिलंत ?' चित्रकलेतलं ओ की ठो न कळणारा मी, पण मलाही वाटलं, कधीं तरी प्रसिद्ध होणाऱ्या माझ्या पुस्तकांवरही चित्रं असावी ती या चित्रकाराचीच ! अशीच सुंदर, अशीच वेधक ! पुढे पंचवीस वर्षांनी माझ्या एका कादंबरीवर घालण्यासाठी दलालांनी चित्र तयार करून दिलं तेव्हां ते दृष्टीस पडल्यावरोबर माझ्याही मुखांतून शब्द बाहेर पडले होते, 'किती सुरेख !...'

पण माझ्या 'साक्षात्कार' कादंबरीवरचं हे चित्र दलालांनी तयार केलं आणि त्यांचा माझा प्रत्यक्ष परिचय झाला तरी त्यापूर्वीच त्यांची-माझी भेट एकदा अनपेक्षितपणे झाली होती. आयुर्विमा कॉर्पोरेशनच्या प्रसिद्धी खात्यात मी काम करतो, त्या ठिकाणी दलालांच्या नावाचं एक 'व्हिजिटिंग कार्ड' शिपायानं माझ्या हातांत दिलं, तसा मी एकदम चमकलो. माझ्या खोलीवाहेर वाट पहात बसलेल्या दलालांच्या जवळ येत मी त्यांना हाताला धरून माझ्या खोलीत नेलं आणि ते आसनस्थ होण्याच्या आतच मी मोठ्या आढ्यतेनं म्हणालो, "छे, छे, दलाल, तुम्ही असं जाहिराती मागण्या-साठी कधी येता कामा नये. जाहिराती तुमच्याकडे चालून यायला हव्यात !" दलाल हसले आणि म्हणाले, "मी जाहिरात मागण्या-साठी नाही आलो ! न मागताही जे मला जाहिराती देतात त्यांचे आभार मानण्यासाठी आलोय् मी !" दलालांच्या त्या शब्दांनी मी अवाक् झालो, कारण आपल्या सौजन्यानं दलालांनी मला जिंकलं होतं !....

मी दलालांना भेटायचा, तो बव्हंशी केनेडी ब्रिजवरच्या त्यांच्या स्टुडिओत, पण त्यांच्या खोलीचं ते झुलतं दार लोटून आत गलं कीं हातातल्या कामात गढलेले दलाल चष्म्याच्या काचांवरून पाहात हसत, एकच शब्द म्हणायचे, 'या !' या एका अक्षरात त्यांचं प्रेम, त्यांचं अगत्य, त्यांचा जिव्हाळा, त्यांची आपुलकी, यांचा साक्षात्कार माझ्या मनाला व्हायचा आणि मग गप्पा रंगायच्या त्या वेळेचं भानच राहू नये अशा मिजाशीत ! या मनमोकळ्या गप्पांतूनच दलालांचं खरं दर्शन व्हायचं ! या गप्पांत मग हजार विषय निघायचे. वास्तविक दलाल एक चित्रकार, पण गप्पांच्या ओघात लक्षात यायचं की हा माणूस क्रिकेटवेडा आहे, नाट्यरसिक आहे, संगीतज्ञ आहे ! तसं पाहिलं तर प्रा. ना. सी. फडक्यांचा आणि माझा ऋणानुबंध दलालांच्यापेक्षाही थोडा तरी अधिक, पण दलालांच्या तोंडून फडक्यांच्या रसिकतेचं वर्णन ऐकायची संधि म्हणजे एक महापर्वणीच ! "वूलनची पँट आणि रेशमी शर्ट घालून खुर्चीवर बसलेले आप्पासाहेब हळूच कुपीतलं सुगंधी अत्तर तुमच्या हाताला लावतात ना, तेव्हां वाटतं आयुष्याचा जाणतेपणानं उपभोग कसा घ्यावा हे शिकावं ते फडक्यांच्यापासूनच !" दलालांच्या शब्दात फडक्यांचं हे वर्णन ऐकताना माझ्या मनात यायचं, दलालांना कृपणपणा माहीत नाहीच ! त्यांच्या चित्रांच्या [illegible]त जशी सहजता, तशी त्यांच्या शब्दात सुजनता !

दुसऱ्यांच्या गुणपरमाणूचा पर्वत करणार [illegible] पर्वत-प्राय गुणांचा अणूएवढाही उल्लेख होऊ नये [illegible] दक्ष अस-णारे दलाल समकालीनांना चटका लावून गेले ते [illegible] दुर्मिळ गुणां-मुळे. ना. सी. फडक्यांच्या समग्र साहित्याचा परामर्ष घेणारा सुमारे हजार पृष्ठांचा 'युगप्रवर्तक फडके' हा ग्रंथ मी लिहिला आणि त्याचं जॅकेट दलालांनीच करावं म्हणून वेळ नव्हता तरीही त्यांना आग्रह केला तेव्हा हे काम करायचं मान्य करून ते मला म्हणाले, 'फड-क्यांच्यावरील तुमच्या भक्तीसाठी त[illegible] मला हे काम करायलाच हवं. फडक्यांच्यावर हा ग्रंथ लिहून तुम्ही त्यांना गुरुदक्षिणा दिलीत, तिला माझाही हात लागणार आहे यात मला केवढा तरी आनंद आहे !' दलालांचे हे सहजोद्गार मला आता आठवतात तेव्हां मला वाटतं, हवं असलेलं जॅकेट तयार करून दलालां[illegible] मला ऋणी केलं, पण हे ऋण फेडण्याची संधी मात्र त्यांनीं मला कधी दिली नाही ! आता उरल्या त्या फक्त आठवणी ! • • •

---

पतौडीने दोन बाऊन्ड्र्या मारल्या !" मला पतौडी हे नाव शर्मिला टागोरचा नवरा म्हणून माहित होतं. परंतु दलालांच्या तोंडावर जणू भारतीय क्रिकेटचा इतिहासच होता. अशा क्रिकेटवेड्या माण-साने दर डिसेंबरला "दीपावली"चा "क्रिकेट विशेषांक" न काढावा तरच नवल ?

साहित्य प्रांतातील निरनिराळ्या मंडळींच्या माझ्या ओळखी दलालांमुळेच झाल्या. न्यायमूर्ति उर्सेकर, सुरेश वेंगुर्लेकर, श्रीराम कामत, वसंत कामत, मालपेकर, अशोक परांजपे, "वहिर्जी नाईक" प्रभाकर अत्रे यांच्या ओळखी दलालांच्या स्टुडिओतच झाल्या. आणि कुणावरोवरही ओळख करून देताना "हे संतप्त साहित्यिक, बंडखोर लेखक, तापसी लेखक, नवकवि...." अशी मला पदवी लावीत होते. हिंदीतील लोकप्रिय कादंबरीकार गुलशन नंदांची आणि माझी मैत्री जडली ती दलालांमुळेच ! नंदांची "कटी पतंग" मी दीपावलीसाठी भाषांतरीत करणार होतो. दलालांचीच ती योजना होती. पण माझा आळस आड आला.

दलालसाहेब गेले, हे अजूनही खरं वाटत नाही, परंतु या महान रंगसम्राटाला रंगीबेरंगी अग्नीज्वाळा आपल्यामध्ये हळुवार-पणे सामावून घेताना माझे डबडबलेले डोळे मूकपणे पहात होते. आणि मग मन ओरडून सांगत होतं, हे सत्य आहे. खरंच दलाल गेले आहेत.






# उणीव सदाची

## चित्रकार वि. सी. गुर्जर

करीयर इन्स्टीटयूट ऑफ आर्टमध्ये "स्टडी फरॉम लाइफ" हा पीरीयड मी घेत असतानाच एका विद्यार्थ्याने चित्रकार दलाल गेल्याची दुःखद वार्ता सांगितली आणि धक्काच बसला. गेल्या ३५ वर्षांच्या आमच्या मैत्रीचा स्मृतीपट आजही डोळ्यासमोर येत आहे.

३४ साली मला पहिल्यांदा पेस्टल्सचे गव्हर्नर्स प्राइज मिळाले होते, त्या प्रदर्शनात पोरसवदा दिसणाऱ्या दलालांनी माझी ओळख करून घेतली. त्यावेळी ते नुकतेच जी. डी. आर्ट ही चित्रकलेची परीक्षा पास झालेले होते. आम्ही त्यावेळी ढवळे प्रकाशनांसाठी साहित्यचित्रे, कव्हरचित्रे, इत्यादि स्वतंत्रपणे करीत असू. पुढे लौकरच त्यानी स्वतंत्र व्यवसाय सुरू केला.

त्याकाळी त्यांची महिना पंधरा दिवसांनी कुठेतरी गांठ पडे; कुठल्या प्रदर्शनासाठी काय चित्र पाठवले? नवीन काय सुरू केले आहे, इत्यादि बोलणे होई. त्याकाळी कलकत्ता, म्हैसूर, सिमला, मद्रास, अमृतसर, पुणे इ. आठ-दहा प्रदर्शने वर्षभर एकामागून एक चालू असत आणि या अखिल भारतीय पातळीवरील प्रदर्शनातील स्पर्धेत सर्व भारतातील चित्रकार-शिल्पकार भाग घेत. वॉटरकलर, ऑईलकलर, पेस्टल्स, एचिंग, वुडकट इत्यादि सर्व माध्यमातील लँडस्केप, भारतीय कला, पोर्ट्रेचर, सबजेक्ट चित्रे, वगैरे चित्र प्रकार प्रदर्शनात येत. कोणी गव्हर्नर, महाराजा इत्यादि मान्यवर मातबर व्यक्तींच्या हस्ते उद्घाटन होई. पाने भरभरून प्रदर्शनाचा अहवाल प्रसिद्ध होई. नावलौकिक मिळे.

अशा एका भेटीत कुणाकडून समजले की, न्यू बुक कंपनीत डेव्हीड लो या जगप्रसिद्ध व्यंगचित्रकाराची पुस्तके आली आहेत. आम्ही ती पुस्तके तावडतोब विकत आणली. मोठी पुस्तके सात रुपये आणि पेंग्विन सीरीज लहान आवृत्ती २ रुपये, आम्ही चार चार पुस्तके खरेदी केली. त्यानंतर चारसहा महिन्यांनी जेव्हां त्यांच्या स्टुडिओमध्ये भेट झाली तेव्हां दलालांनी ती चारही पुस्तके अभ्यासून लो यांची शैली आत्मसात केली होती. त्यांच्या "व्यंगचित्रकला" या विषयाचा ध्यास घेऊन जो अभ्यास केला होता त्याचा मला अचंबा वाटला; कारण ती पुस्तके मी अजून नीटशी पाहिलीही नव्हती.

माझा पिंड धीमेपणे मॉडेलच्या पोजवरून पेस्टल वा "तैलचित्र" तयार करण्याचा, तर दलाल यांचा जलद कल्पना चित्र करणाऱ्या धावत्या कुंचल्याचा होता. त्याला लो यांच्या कलेच्या आदर्शाची जोड मिळताच त्यांच्या रेखाचित्रात उत्कट, चपल, चालणाऱ्या, धावणाऱ्या, भयभीत, चकित, टवाळ, चावट, पोरकट, वायकी-

**आकृती लहान...**




**...अर्थ महान**

**वरची रांग (डावीकडून) : श्री. केतकर, श्री. लालकाका, श्री. करमरकर, श्री. देऊसकर.**
**खालची रांग (डावीकडून) श्री. हळदणकर, श्री. कामत, श्री. परांडेकर, श्री. गुर्जर.**





अनुक्रमणिका

# किमयागार दलाल

**--सिताराम फातर्फेकर**



एक दिवस केनेडी पुलावरून जात असताना माझे लक्ष 'दलाल आर्ट स्टुडिओ' या पाटीकडे गेले आणि माझे मित्र गोपालकृष्ण भोबे यांची मला आठवण झाली. त्यांचे निधन होऊन थोडेच दिवस लोटले होते. त्यांच्या मुखातून नेहमी दलालांच्या नावाचा जप चालत असे.. त्यांनीच एकदा दलालांची ओझरती ओळख मला करून दिली होती. भोबे यांच्या स्मृतीने दीनानाथांना भेटण्याची जिज्ञासा माझ्या मनात उत्पन्न झाली आणि त्याबरोबरच माझी पावले स्टुडिओच्या दिशेने वळली. पूर्वसूचनेशिवाय भेटणे शिष्टाचाराला धरून होणार नाही अशी शंका मनात येऊन गेली. चित्रकलेच्या क्षेत्रात अलौकिक प्रसिद्धी मिळविलेल्या एका थोर कलाकाराला भेटण्यास माझ्यासारख्या नादसमुद्राच्या भरती ओहोटीत गटांगळ्या खात जीवन जगणाऱ्या सामान्य संगीत सेवकाने भेटणे आणि त्यांचा अमूल्य वेळ घेणे रास्त नव्हे अशा विचारतरंगात असतानाच मी स्टुडिओत प्रवेश केला आणि काय आश्चर्य माझ्यावर त्यांची नजर पडताच त्यांनी माझे आनंदाने स्वागत केले. माझ्या संगीत व्यासंगाविषयी त्यांनी औपचारिकरीत्या विचारपूस केली. कै. गोपालकृष्ण भोबे यांचे पुष्कळ गुणगान केले. त्यांच्या मृत्यूने ते बेचैन झालेले दिसले. संगीतविषयातही ते रस घेतात एवढेच नव्हे तर शास्त्रीय संगीतातील कलात्मक दृष्टिकोन या विषयावरही त्यांनी बरेच मनन केलेले मला दिसले. मी ऐकलेल्या प्रसिद्ध कलाकारांचे किस्से त्यांना सुनविले ते त्यांना फारच आवडले. त्यात ते रंगून गेले. माझे संगीतातील अनुभव शब्दरूपात मांडण्याचा त्यांनी मला आग्रह केला.

त्यांनी मला कर्तृत्वाचा मार्ग दाखविला. 'दीपावली' संगीत विशेषांकातील श्री. रामकृष्ण बाक्रे यांनी घेतलेली माझी 'शास्त्रीय संगीत' या विषयावरील मुलाखत आणि 'गोवा हिंदु असोसिएशन' तर्फे साजऱ्या झालेल्या श्रीमती केसरबाई केरकर यांच्या सत्कार समारंभाच्या निमित्ताने त्यांच्यावरील 'महाराष्ट्र टाइम्स'मध्ये प्रसिद्ध झालेला माझा लेख,—हे दलालांच्याच मार्गदर्शनाचे फल होय. दीनानाथ दलाल यांना माणूसवेडा अशी संज्ञा सूज्ञ माणसाकडून दिली जाते. परंतु माझ्या मते वेड्या माणसाला शहाणे करण्याची किमया त्यांच्या अंगी होती. • • •

---

पुरुष व पुरुषीबायका, अति खिन्न, हर्षोत्फुल्ल, इत्यादि भाववैशिष्ट्ये आणि जाड, रोड, तरुण, नरठ, इत्यादि व्यक्तीवैचित्र्ये सर्व बारकाव्यांसह अति त्वरेने रेखाटण्याची हातोटी त्यांनी अभ्यासाने हस्तगत केली.

४० साली भायखळ्याच्या ह्यूम हायस्कूलचे प्रि. रे. रामदास यांनी अति नावीन्यपूर्ण असे कलाप्रदर्शन दिवाळीच्या सुटीत आयोजित केले होते. वैशिष्ट्य असे की दर दिवशी एकेका मान्यवर चित्रकाराचे कला-प्रात्यक्षिक ठेवले होते. कलाविषयक व्याख्याने, परिसंवाद असा मोठा रंजक, रसिकाभिमुख कार्यक्रम होता; त्यात देऊस्कर (पोर्ट्रेट ऑइल्स), हळदणकर (जलरंग पोर्ट्रेट), हैदराबादचे रेड्डी (स्टिल लाइफ), मी स्वतः (पेस्टल व्यक्तीचित्र) आणि त्यावेळी उदयाला येत असलेले श्री. दलाल यांचे व्यंगचित्राचे प्रात्यक्षिक (पेन अँड इंक).

या प्रदर्शनाची आणि प्रात्यक्षिकांची जाहीरात फार मोठ्या प्रमाणात झाली होती. प्रदर्शनाला प्रात्यक्षिकाला तिकीट ठेवले होते. तरीही प्रदर्शनाला रसिकांची रीघ असे आणि प्रात्यक्षिकाला तोबा गर्दी असे.

देऊस्कर यांचे तैलचित्राचे, करमरकरांचे (शिल्प) बस्ट करून दाखविण्याचे माझे पेस्टल्सचे, हळदणकरांचे जलरंग पोर्ट्रेट इत्यादि सर्व प्रात्यक्षिके पार पडली, रसिकांना आवडली. दलाल यांचा प्रात्यक्षिकाचा कार्यक्रम दोन दिवसांवर आला. त्यासाठी त्यांनी किती कल्पकतेने पायाशुद्ध पूर्वतयारी केली, हे केवळ अविस्मरणीय होय. हळदणकर, केतकर, परांडेकर, लालकाका, करमरकर या त्यावेळच्या श्रेष्ठ गाजलेल्या चित्रशिल्पकारांची एकेकाची भेट घेऊन त्यांची अभ्यासपूर्वक स्केचेस केली, मजकडेसुद्धा येऊन माझे विवक्षित पोजचे स्केच केले आणि त्याबरोबरच त्यांच्या त्या प्रात्यक्षिकाला अवश्य हजर राहाणे किती व कसे महत्त्वाचे आहे हे आम्हाला सर्वांना वेगवेगळे भेटून पटवून दिले. आम्ही सर्वजण आवर्जून हजर राहिलो—त्यांच्या पूर्वसूचनेनुसार विवक्षित पेहेराव, कपडे पेहेरून आलो होतो. प्रेक्षागृह पूर्ण भरून गले होते. सर्व अग्रगण्य कलावंत, बातमीदार हजर होते.

व्यासपीठावर इजलवर मोठा बोर्ड ठेवला होता. बाजूला शाईची बाटली, ब्रश, पेन्सिली इत्यादि सुसज्ज होते. बोर्डावर २२"×३१" इंच कागद लावलेला होता. वेळ ली. लाऊड स्पीकरवरून श्री. दलाल यांचा अल्पपरिचय आणि प्रात्यक्षिक सुरू करावे, ही विनंती झाली. दलाल व्यासपीठावर आले, व्यंगचित्र ात्यक्षिक सुरू ले.

दोन तीन मिनिटांत पेन्सिलने साधारण रे टन करून, ब्रश शाईत बुडवून केवळ मेमरीने एका एका व्यक्तीचे व्यंगचित्र सुरू होई. शाई सुकण्यापूर्वीच ते पूर्ण होई. ज्या व्यक्तीचे व्यंगचित्र पूर्ण झाले त्याच्या नावाचा पुकारा होई. ती व्यक्ती व्यासपीठावर हजर होई. ती पोज घेई. व्यक्तीचा लाइकनेस लकब वैशिष्ट्य हुबेहूब पाहून प्रेक्षकांना न भूतो [illegible] चमत्कार वाटे. टाळ्यांचा कडकडा[illegible] एका तासात त्यां[illegible] पूर्ण करून दाखविली. [illegible] श्रेष्ठ कलावंतसुद्धा [illegible] वेग पाहून थक्क झाले.

श्री. दलाल यांनी कधीही एकही वनमॅन शो भरवला नाही, पण तरीही 'अग्रगण्य चित्रकार' म्हणून दिगंत कीर्ती मिळवली.

अशा निष्ठावंत, योजनाचतुर, सिद्धहस्त कलावंताच्या साहित्यरंजन— Illustration क्षेत्रातील कलागुणांची जे. जे. कलामहाविद्यालयाने वा जे. जे. उपयोजित कलामहाविद्यालयाने कदर केली नाही; आणि नव्या पिढीला त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ मिळाला नाही. ही खंत र मो ी आहे. खरोखर साहित्यचित्रण " या विषयात त्यां ी उणीव भरून काढील असा महारा त आज कोणी नाही.

• •







# वाहतो ही सुमनांजली....

चित्रकार दीनानाथ दलाल यांच्या दुःखद निधनामुळे महाराष्ट्राच्या कलाक्षेत्राची अपरिमित हानि झाली आहे. त्यांच्या कुंचल्यातून निर्माण झालेल्या चित्रांची मोहिनी ज्याला पडली नाही, असा रसिक विरळाच. त्यांनी चालविलेल्या 'दीपावली' या दर्जेदार मासिकाने प्रत्येक मराठी भाषिकाच्या घरांत स्थान मिळविले होते. अशा श्रेष्ठ कलावंताचे अकाली निधन होणे हा दुर्दैव विलासचं म्हणावयास पाहिजे.

चित्रकार दलाल यांच्या आत्म्यास ईश्वर चिरशांति देवो हीच प्रार्थना!

मुंबई–३२ — **वसंतराव नाईक**

दि. १९ जानेवारी '७१ — मुख्यमंत्री, महाराष्ट्र

श्री. दलाल यांच्या देहावसानाची वार्ता अत्यंत अनपेक्षित, त्यामुळे मन फार अस्वस्थ झाले. त्यांचे माझे संबंध घरोब्याचे होते, तेव्हां मुंबईला येणे अवश्य होते; पण प्रवास करण्याच्या स्थितीत मी अद्यापि नाही....

**वि. स. खांडेकर**

कोल्हापूर.

'दीपावली'चा फेब्रुवारी अंक मिळाला. दीपावली–दलालांशिवाय निघालेला–अंक पाहूनच कसेतरी वाटले... माझ्यासारख्या दूरस्थ मित्रांनाही या घटनेने अत्यंत व्यथित केले... फारशा गाठीभेटी होत नव्हत्या तरी दलाल खूप जवळ आहेत असे वाटायचे... त्यांच्या स्नेहशील, अनौपचारिक स्वभावामुळे. आपल्या मनमोकळ्या बोलण्याने व हसण्याने मधल्या अनेक वर्षांचे अंतर ते चटकन भरून काढीत... स्वतःच्या यशापासून स्वतःला विभक्त ठेवण्याची त्यांची वृत्ती असाधार[illegible] स्वीकारलेल्या कामाशी आणि आपल्या कले[illegible] [illegible]क्तपणे [illegible]ने घेणारे असे व्यक्तिमत्व दुर्मिळ... असा चित्रकार, [illegible] सुरुम[illegible]प्रेमी आणि स्नेहभावाचे चांदणे सतत समोवार फुलवि[illegible] असा मित्र–आता 'होता' म्हणावे लागते हे दुर्दैव....

**वि. वा. शिरवाडकर**

नासिक.

चित्रकार दलाल यांच्या आकस्मिक निधनवार्तेने भयंकर धक्का बसला! चित्रकलेची अपरिमित हानी झाली... माझा मामुली चित्रसंग्रह पाहण्यास ते एकदा अगत्याने आले होते. त्यांनी 'भेट' म्हणून दिलेले आपले एक प्रदर्शनीय चित्र माझे अभिमान-स्थान आहे.....

**यशवन्त दि. पेण्ढारकर**

पुणे.

श्री. दलालसाहेब गेल्याचे दुःखद वृत्त तारेने समजले; घरचे वडीलधारे माणूस जावे असेच वाटले, मन सैरभैर झाले. त्यांच्या-माझ्या स्नेहाच्या असंख्य आठवणी मनात गर्दी करीत आहेत... त्यांचा लोकसंग्रह मोठा होता. ऐहिक संपत्तीपेक्षा मित्रमंडळी हीच त्यांची मोठी संपदा होती. त्यांचा स्नेह, त्यांचे गोड वर्तन सतत स्मरणात राहील....

**श्री. बा. जोशी**

कलकत्ता.

दोन दिवसांपूर्वी ती दुःखद बातमी ऐकली तेव्हांच ती खरी वाटू नये एवढा धक्का बसला... काही सुचेनासे झाले. मित्रवर्य दादांची मूर्ती सारखी डोळ्यापुढे उभी होती... त्यांच्या एवढा रसिक प्रेमळ दिलदार कलावंत माणूस दुसरा होणे नाही.... कलावंताना प्रोत्साहन द्यावे तर ते त्यांनीच! त्यांची सारी जीवनप्रणालीच संयमी आणि शिस्तबद्ध होती. त्यांनी कधीही कसलाही अतिरेक केलेला मला आठवत नाही, मग त्यांच्याच वाट्याला हे अकाली मरण का यावे?... आता त्यांची उणीव पदोपदी जाणवेल. दलालांच्या मृत्यूची वार्ता ऐकल्यापासून माझ्या सगळ्या आनंदातील चवच गेल्यासारखी झालीय....

**वसन्त कानेटकर**

नासिक

हे पत्र लिहिण्याची पाळी येईल अशी स्वप्नातही कल्पना नव्हती. आमच्या रौप्य-महोत्सवी समारंभाला दलालसाहेब येणार होते. तसे त्यांनी फोनवरून सांगितलेही होते. त्यांच्या सहकार्यामुळेच आमची 'रौप्यमहोत्सवी कादंबरी योजना' पुरी होऊ शकली. त्यांच्या मृत्यूची वार्ता ऐकून आम्ही हबकलोच. आमच्याकडील समारंभ चालू ठेवणे शक्यच नव्हते. तो ताबडतोब बंद ठेवला...

**पंडित अनंत कुळकर्णी,**

**सौ. सुमति पं कुळकर्णी**

पुणे

कै. दीनानाथ दलाल यांची कलेच्या क्षेत्रातील कामगिरी फार मोठी असून, महाराष्ट्राच्या कलेच्या वैभवात त्यांचा फार मोठा भाग आहे. त्यांच्या कलाकृतींची आठवण महाराष्ट्रातच नव्हे, तर सर्व भारतात निरंतर राहील. त्यांचे अकाली निधन ही आज कलेच्या क्षेत्रात मोठी आणि कधीही भरून न येणारी घटना आहे...

**वि. ना. आडारकर**

मुंबई

चित्रकार दीनानाथ दलाल यांच्या आकस्मिक निधनाची वार्ता ऐकल्यापासून मन बेचैन आहे.. मराठी साहित्याला सुंदर सजावटीची परंपरा दलालांनीच दिली. आजच्या अनेक चित्रकारांचे दलाल हे स्फूर्तीस्थान आहेत. कृतज्ञता आणि दुःख मनात बाळगूनच त्यांना ही श्रद्धांजली!

**शि. द. फडणीस**
पुणे

श्री. दलाल यांच्या निधनाने फार वाईट वाटले... चित्रकार म्हणून त्यांची ख्याती ऐकून होतो, पण पुढे क्रिकेटच्या निमित्ताने त्यांचा प्रत्यक्ष परिचय झाला. ते मी माझे भाग्यच समजतो. एक संवेदनाक्षम चित्रकार, साक्षेपी संपादक व एक क्रिकेटप्रेमी रसिक दलालांच्या निधनाने हरपला आहे...

**बाळ ज. पंडित**
पुणे

काय लिहावे तेच सुचेनासे झाले आहे. एका कलावंत हृदयाची रंगसमृद्ध साथ आपण हरवून बसलो आहोत. दीनानाथजी गेले हे मला खरंच वाटत नाही. महाराष्ट्रातील गुणसंपन्न माणसे अशी क्षितिजाआड का होताहेत?

**शिवाजी सावंत**
कोल्हापूर

पुणे-मुंबई सामानाची ने-आण करण्याचे काम मी करतो. श्री. दलालकाका मला काम देत असत. एकदा त्यांनी दिलेले डिझाईन चुकून गाडीतच राहून गेले. ते कुणीतरी नेले. दुसऱ्या दिवशी दलालकाकांना सर्व हकिकत सांगितली. ते न रागावता म्हणाले, 'भिसे, ठीक आहे. कोणतेही काम काळजीपूर्वक करीत जा.' नंतर त्यांनी लगेच डिझाईन तयार करून दिले. मी विचारले, 'काका, याचे किती बिल द्यावयाचे?' तेव्हा ते हसत म्हणाले, 'भिसे, तुमच्याकडून याचे बिल कसे घेऊ? पुन्हा असे होऊ देऊ नका!' ही माझी आठवण हीच श्रद्धांजली!



आपल्या कन्यांसमवेत श्री दलाल

**मधुकर कृ. भिसे**
पुणे

• • •

(पान ८२ वरून)

मृणाल गप्प बसली होती. वेळ झाला तर विमान मिळणार नाही ही काळजी आम्हा तिघांनाही लागली होती. तरीही ती गाडी पाहून मला मजा वाटली.

करशांगची घरं दिसू लागली. हॉटेल्स् आणि रेल्वे स्टेशन! गाडीचा वेग कमी करत ड्रायव्हर म्हणाला, "फक्त पाचच मिनिटे हं साहेब!"

मी खिशातून दादाजींचा, त्यांच्या मुलानं दिलेला पत्ता काढला. ड्रायव्हरच्या हाती देत म्हणालो, "ह्या पत्त्यावर जायचं आहे!"

मृणाल एकदम म्हणाली, 'नको, आपण सरळ जाऊ या विमानतळावर!'

"का, पांच मिनिटं आपण इथं थांबू शकतो!"

"नको."

"पण का?"

"दादाजी माझ्या नजरेसमोर आहेत तसेच असू देत. विकलांग होऊन बिछान्यात पडलेले दादाजी मला पहावणार नाहीत."

आम्ही करशांगला थांबलो नाही.

दूरवर खाली सपाट जमीन दिसू लागली. पहिल्यांदा मला हिमालय जेवढा आकर्षक वाटला तेवढीच ही सखल सपाट मैलचे मैल पसरलेली जमीन सुंदर वाटू लागली. गरम कपड्यांचं अंगावरचं ओझं आता उतरणार ह्या कल्पनेनं बरं वाटलं.

मी मृणालला म्हणालो,

"ती पहा सपाट जमीन. तीही सुंदर दिसते आहे, नाही?"

"अं, हो!" जागी झाल्यासारखी मृणाल म्हणाली. दार्जिलिंग सोडल्यापासून ती प्रथमच बोलत होती.

"हो. ती जमीन सुंदर दिसते आहे. दार्जिलिंग मागं पडलं, हिमालयही आता संपेल. ही थंड कुंद हवाही संपेल. उंच, हिरवीगार सुरूची झाडं मागं पडलीत. दाट धुकंही आता दिसायचं नाही. रिमझिम पडणारा पाऊस आणि आपल्याच तंद्रीत संथ तरंगत चाललेले ढग आता पहायला मिळायचे नाहीत. बरं झालं. आपण स्वप्नसृष्टीतून खऱ्याखुऱ्या जगात येत आहोत. आणि माणसानं नेहमी वास्तवतेत सौंदर्य शोधावं, खरं ना!"

मी मृणालकडे पहातच राहिलो. असं काही बोलताना मी मृणालला आज पहिल्यांदाच पहात होतो.

"तीन प्लेट चीज पकोडे... हसरे, क[illegible] तेनसिंग... बर्च हिल, म्युझियमबवला तो शेर्पा [illegible] त बसलेली म्हातारी... गरम डोसा—खिमा भ[illegible] आणि ते रेल्वे डब्यांतल्यासारखे खोलीतले झोपण्याचे बर्थ.... रात्री गालावर हुळहुळलेले खोटे खोटे झुरळ..! पंधरा वर्षापूर्वी जेव्हां आपण दार्जिलिंग सोडलं तेव्हां हे सारं मागं राहिलं. नाही संपलंच! आणि त्यांच्या शोधात मी उगाचच आले दार्जिलिंगला!"

आम्ही डाकोटा विमानात पोहोचलो तेव्हा सगळे प्रवासी आपापल्या जागेवर बसलेले होते. पट्टे बांधून तयारीत होते.

एअर-होस्टेसनं आम्हाला आमच्या सीटस् दाखवल्या. विमानांचं पहिलं इंजीन सुरू झालं आणि त्या पाठोपाठ दुसरं! प्रॉपेलरची मोठाली पाती फिरू लागली तसा कान बधीर करणारा आवाज सुरू झाला. ती पाती जशी अधिक वेगाने फिरू लागली तसा तो वाढत राहिला.

मी मृणालला म्हणालो, "विमान एवढा का आवाज करतं माहीत आहे?"

"नाही, का करतं?" "पडू नये म्हणून!"

"म्हणजे!"

• •







# क्रिकेटप्रेमी दलाल

—प्रा. अविनाश कंळकर

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांच्याशी माझा परिचय झाला तो दिवस आजही मला आठवतो. नऊ वर्षे झाली त्याला. सुप्रसिद्ध क्रिकेट समीक्षक माझे मित्र वाळ ज.पंडित ह्यांच्याबरोबर मी त्यांच्या कार्यालयात गेलो. सायंकाळची वेळ होती. दलाल घरी जाण्याच्या तयारीत होते. परंतु आम्ही गेल्यामुळे थांबले. जवळजवळ तासभर आमची बैठक रंगली. गप्पांचा विषय अर्थात क्रिकेट हाच होता. त्या पहिल्या भेटीत दलाल हे क्रिकेटचे चोखंदळ अभ्यासक आहेत आणि त्यांनी त्या विषयावरील बरीच इंग्रजी पुस्तके वाचली आहेत याची कल्पना आली. त्यावेळी माझ्या हातात जागतिक कीर्तीचा ख्यातनाम स्कोअरर आणि बॅगेज मास्तर बिल फर्ग्युसन याचे आत्मचरित्र ( "मि. क्रिकेट" ) होते. दलालांचे लक्ष त्या नव्या पुस्तकाकडे गेले व ते वाचण्याची त्यांनी उत्सुकता दाखविली. मला पुन्हा चार दिवसांनी या अशी आग्रहाची विनंती केली. पुढच्या बैठकीत त्यांनी त्या पुस्तकावर मला लेख देण्याची सूचना केली. 'दीपावली'चा क्रिकेटविषयक अंक निघणार होता. त्यासाठी अवघ्या चार पाच दिवसात त्यांना लेख हवा होता. मी तावडतोब ते पुस्तक पुन्हा वाचून त्यांना लेख नेऊन दिला. या लेखातील बरीच माहिती मराठीत त्यावेळी नवीन होती. हा लेख दलालाना खूप आवडला. ते म्हणाले, "असं काहीतरी वैशिष्ट्यपूर्ण मला द्या. प्रत्येक लेखात काहीतरी नवीन लिहा. ह्या लेखात "बिझी"ना तुम्ही चांगलं एक्स्पोज केलंय. आणि असं पाहा लिहिताना अगदी मोकळेपणानं लिहा. मी छापीन तुमचं लिखाण.

त्यानंतरच्या प्रत्येक भेटीत क्रिकेटवर चर्चा करण्याची आमची पद्धतच पडून गेली. त्यांच्याच प्रेरणेने मी क्रिकेट-विषयक लेखन करीत होतो. एकदा त्यांनी इंग्लंडचा माजी कर्णधार टेड डेक्स्टरचे 'डेक्स्टर डिक्लेअर्स' हे पुस्तक मला दिले. त्या पुस्तकात वेस्ट इंडीजमध्ये भारतीय कर्णधार नरी कॉंट्रॅक्टर जखमी झाला, तो ग्रिफिथमुळेच असे मत व्यक्त केले होते. या विवेचनांच्या अनुरोधाने मी खुद्द कॉंट्रॅक्टरलाच भेटून त्याची मुलाखत घेण्यास त्यांनी सुचविले. ते म्हणाले, "आपल्या क्रिकेटपटूंची बाजू आपणच घेतली पाहिजे." दलालांना आपल्या क्रिकेटपटूंचा अभिमान होता. कॉंट्रॅक्टरला भेटून मुलाखतीत कोणते प्रश्न विचारायचे व कोणत्या मुद्यांवर भर द्यायचा याच्याही खास सूचना त्यांनी दिल्या. त्याप्रमाणे मी 'दीपावली'साठी नरी कॉंट्रॅक्टरप्रमाणेच इंग्लंडला गेलेल्या भारतीय शालेय संघाचा कप्तान अजित नाईक, रंगा सोहोनी, माधव मंत्री, बापू नाडकर्णी, मनोहर हर्डीकर, रमाकांत देसाई, उमेश कुळकर्णी, सदा मोहोळ या प्रख्यात क्रिकेटपटूंच्या मुलाखती घेतल्या. वेळोवेळी त्या 'दीपावली'त प्रसिद्धही झालेल्या आहेत. इतरही क्रिकेट विषयक लेखन प्रसिद्ध झाले आहे. या सर्वांची प्रेरणा दलाल यांचीच होती. दलालांच्यामुळेच मी अनेक क्रिकेटपटूंच्या सहवासात आलो.

दलालांना क्रिकेटपटूंच्याबद्दल कमालीचा आदर वाटे. कसोटी सामना चालू असला की ते रेडिओ लावून कॉमेंट्री ऐकत बसत. त्यावेळी ते क्रिकेटने झपाटलेले असत. पतौडी, सुर्ती, मांजरेकर, बोर्डे, दुराणी, वाडेकर, एंजिनियर हे त्यांच्या विशेष मर्जीतले खेळाडू !

• • •

## मर्मभेदी व्यंग-चित्रकार

सी. ग. मणेरकर

कुणी लिहिले, "दलाल दि. १५ जानेवारी १९७१ शुक्रवारी निधन पावले, कुणी म्हणाले, दलाल काळाच्या दरबारांत गेले !" नाही हो ! गोमंतक भू जननीचे सु-पुत्र दीनानाथ दामोदर दलाल [illegible] विलीन पावले, चिरंजीव झाले.

विद्वान [illegible]क, प्रथितयश लेखक, कलातज्ज्ञ चित्रकार, त्यांच्या [illegible] मुक्त चित्रदर्शनाने आनंद भोगणारे प्रेक्षक, या सर्वांना वा[illegible]सृष्टी सृजणारे चित्र-तपस्वी विश्वामित्र दलाल, यांची विस्मृती होईल काय ?

चित्रकार दलाल केवळ विविध रंगी चित्रनिर्मितीने विख्यात झाले नाहीत तर दोन तपांपूर्वीपासून नुसत्या एकच काळ्या रंगाची कुंचली फिरवीत रेखाचित्रांनी राजकारणी दोष दाखविणारी मर्मभेदी चित्रे रेखीत, राज्यकर्त्यांना, समाजधुरीणांना, रेशमी चिमट्यांनी गुदगुदल्या करीत राजकारण-रसपट्ट मर्मभेदी चित्रकार म्हणून कीर्तीमंत झाले होते, सद्यकालीन विख्यात व्यंगचित्रकार त्यांना मर्मभेदी चित्रसृष्टीचे गुरु-आचार्य मानीत असत, अशा राजकारणांतही रस घेणाऱ्या मर्मभेदी चित्रकार दलालांच्या स्मृतीचा विसर पडेल काय? असे कालत्रयीही घडणार नाही.

• • •

## —क्षमस्व—

श्रद्धांजलि अंकासाठी अनेक दलाल–दीपावली प्रेमी मित्र-सुहृदांनी आठवणी, लेख आदि साहित्य पाठविले. परंतु स्थलाभावी त्या साऱ्याच मजकुरास स्थान देता आले नाही. त्यांच्या सद्भावनांचा योग्य तो आदर करून आम्ही त्यांची क्षमा मागतो.

'दीपावली'वरील लोभ असाच कायम ठेवावा ही वि.

अनुक्रमणिका





भारताचे विख्यात
रंग सम्राट
आमचे स्नेही

# कै. दीनानाथ दलाल

यांच्या स्मृतीस
आमची हार्दिक
श्रद्धांजली

**शिवाजी वर्क्स लिमिटेड,**
शिवशाही सोलापूर.

REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment MARCH

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay 4.

अनुक्रमणिका